# अभिनव भारत

अथवा

## सावरकरांची क्रांतिकारक गुप्त संस्था

लेखक

**डॉ. विष्णू महादेव भट,**

बी. अे., अेम्. बी. बी. अेस्., येवलें



प्रकाशन-क्रमांक ३९

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबअी ४

मूल्य चार रुपये

# प्रस्तावना

राज्यक्रांतिकारक गुप्त सस्थांचे अितिहास क्वचितच लिहिले जातात. त्यांच्या गुप्ततेमुळें, त्यांच्या अितिहासाचीं साधनें जतन करून ठेवणें धोक्याचें असतें. कारण जर तीं सांपडलीं तर ज्या राजसत्तेविरुद्ध त्या संस्था क्रांति करूं अिच्छित असतात तिच्या हातांत या साधनांचा पुरावा आयताच मिळून, अशा संस्था नामशेष करणें, सत्ताधिशांना शक्य असतें. **अभिनव भारत** या सावरकरांनीं अिंग्रजी राज्य अुलथून पाडण्यांकरितां स्थापलेल्या गुप्त संस्थेचा अितिहास लिहिणें या कारणानेंच दुष्कर झालें आहे. या संस्थेबद्दल जीं कांही हस्तलिखित साधनें क्वचित् होतीं तीं आम्हीं, आपल्या हातानें, वरील कारणांकरितांच नष्ट केलीं, आणि कांहीं सरकार-जमा झालीं. त्यामुळें आतां, त्या संस्थेचे जे कांही थोडे सभासद आज हयात आहेत त्यांच्या माहितीवरच विसंबून, जीं कांहीं पुटपुंजीं साधनें मिळालीं तीं जमेस धरून, मीं हा प्रयत्न केला आहे. अुपर्युक्त कारणांनीं तो पुष्कळच अपुरा आहे हें सांगणें नकोच.

साधनांच्या अपूर्णतेचीं आणखीहि दोन कारणें आहेत. राज्यक्रांति ही कांहीं लौकर साध्य होणारी गोष्ट नाहीं. त्यांतूनहि हिंदुस्थानांत सशस्त्र व प्रबल अिंग्रजी साम्राज्याला, त्यांनीं हेतुपुरःसर निःशस्त्र केलेल्या प्रजेनें, सशस्त्र क्रांति करून सुरूंग लावणें हें तर महादुर्घट काम होतें. किंबहुना सशस्त्र व प्रचंड राजसत्तेला निःशस्त्र प्रजेनें राज्यक्रांति करून अुखडल्याचें हिंदुस्थान हें, आजपर्यंतच्या अितिहासांत, अेकच अुदाहरण आहे. पण ही अघटित घटना घडून यावयाला ९० वर्षें — १८५७ ते १९४७ पर्यंत — लागलीं. अर्थात् त्यांत निदान तीन तरुण पिढ्या खर्ची पडल्या. या अेवढ्या प्रदीर्घ काळांत, पहिल्याच काय पण दुसऱ्याहि पिढींतलीं क्रांतिकारक माणसें जिवंत राहणें प्रायः अशक्यच. आणि माणसाच्या सामान्य आयुर्मर्यादेमुळें मागच्या १ ल्या पिढींतले तर कोणी जिवंत राहिलेच नाहींत, पण आमच्या पिढींतलेहि आम्ही फारच थोडे विद्यमान आहोंत. त्यामुळें या ९० वर्षांचा अितिहास संपूर्णतया लिहिणें, या दोन पिढ्यांतले पुष्कळसे क्रांतिकारक दिवंगत झाल्यानें,

आणि त्यांच्याबरोबरच त्यांची माहितीहि नष्ट झाल्यानें, शक्य नाहीं. त्यांतूनहि आम्ही जे कांहीं थोडे अवशिष्ट राहिलों आहों त्यांची, ६० नंतरच्या वयोमानाप्रमाणें, स्मृति पूर्वीइतकी तीव्र राहिली नाहीं. त्यामुळें बराचसा अितिहास विस्मृतीच्या सागरांत लुप्त होअून गेलेला आहे. स्मरणशक्तीच्या या वठत चाललेल्या वृक्षास जी कांहीं पालवी शिल्लक आहे, तिलाच टवटवीत करून, तिला लागलेलीं पुष्पें खुडून, ही माळ मीं तयार केली आहे. ती भरगच्च असती तर तिचा सुगंध व तिचें स्वरूप अधिक मोहक झालें असतें. पण तें तसें असणें शक्य कां नाहीं याचीं कारणें वर दिलींच आहेत.

साधनांच्या अपूर्णतेचें तिसरे कारण म्हणजे अभिनव भारताला सोसावा लागलेला पराजय हें आहे. आणि मनुष्यस्वभावच असा आहे कीं, तो विजयी वीरांचे पोवाडे गातो, पराजितांचे नाहीं. कुस्तींत पडलेल्या माणसाला शेलापागोटें कोणी बांधीत नाहीं. पण जाणते तज्ज्ञ असतात त्यांना पराजितांतहि गुण दिसतात, आणि ते पडलेल्या मल्लालाहि अल्पसें पारितोषिक देतात. राज्यक्रांतीच्या चिरकालीन युद्धांत यश हें अखेरच्या प्रयत्नालाच मिळतें. त्याच्या पूर्वीचे सर्व प्रयत्न, सर्व बंडें, सर्व चकमकी, सर्व अुठावण्या यांच्या वांट्याला अपयशच आलेलें असतें. पण या अपयशी बंडांनीं, चकमकींनीं, अुठावांनीं क्रांतीची ज्वाला धगधगलेली, भडकलेली, राहते. स्वातंत्र्यलालसेचा नंदादीप सारखा तेवत ठेवण्याला या सर्व प्रयत्नांचें तेल अेकसारखें घालावेंच लागतें. आणि या दृष्टीनें तरी त्यांचें महत्त्व अितिहासाला मान्य असतें. म्हणून या १८५७ प्रमाणें पराजित बंडांचा अितिहासहि लोकांना आदरणीयच वाटतो. अेतदर्थ या पराजयाचा अितिहास शक्य तितका ग्रथित करून ठेवणें, हें अेक राष्ट्रेतिहासाचें साधनच आहे. तें साधन पुरेसें हातीं यावें म्हणून मी माझ्या सहकाऱ्यांना विनंत्या केल्या, पत्रें लिहिलीं, वृत्तपत्रांतूनहि माहिती मागवली. पण आमच्या पराजयानें निराश झालेल्या कित्येकांनीं ती पाठवली नाहीं, याचें मला वाअीट वाटतें.

पण त्यांनीं लिहिली नाहीं म्हणून आपणहि ती लिहूं नये हें मला प्रशस्त वाटेना. माझी कल्पना अशी होती कीं, सावरकरच हें काम हातीं घेतील. अभिनव भारत हा त्यांचाच मानस पुत्र. त्याच्या पराक्रमाचें, त्यागाचें, धैर्यशौर्यादिकाचें खरें कौतुक त्यांनाच अधिक. म्हणून तो जरी अल्पायुषी

ठरला तरी त्याचें गुणवर्णन त्यांनींच जितकें सहृदयतेनें केलें असतें, आणि त्यांच्या अुपजत काव्य-प्रतिभेनें तें जसें मोहक व भव्य मनोहर झालें असतें, तसें व तितकें माझ्यानें होणार नाहीं. म्हणून मीं त्यांनाच त्याबद्दल वारंवार लिहिलें. 'त्यांचें आत्मचरित्र' प्रसिद्ध झाल्यावर माझी आशा द्विगुणित झाली. पण शेवटीं त्यांच्या प्रकृतीनें त्यांच्या हातून तें होअीलसें दिसेना. म्हणून त्यांनीं अुलट मलाच गळ घातली कीं, "बाबा गेले, बाळहि गेला, मीहि दुर्बल झालों, तूंच तें पुरें अपुरें कसें होअील तसें लिहून काढ." त्यांच्याप्रमाणेंच माझ्या अितर स्नेह्यांनीहि मला लकडा लावला कीं, मीच तें पुरें करावें. म्हणून मीं तें काम १९४८ च्या प्रारंभीं हातीं घेतलें. अितक्यांत गांधीजींच्या वधानंतर झालेली कॉंग्रेस गुंडांची हुल्लड मलाहि भोंवली; ८ दिवस तुरुंगवासहि झाला. त्यामुळें मी मोठ्या प्रयासानें मिळवलेलीं तुटपुंजी साधनें, आणि लिहिलेला मजकूरहि मला मित्रांच्या सहाय्यानें दडवून ठेवावा लागला. सावरकरांवरहि सरकारनें खुनशीपणानें खटला चालवला. त्यामुळें गोडसे खटल्याचा निकाल लागेपर्यंत हें काम मला स्थगित करावें लागलें. सावरकर त्यांत निर्दोषी ठरून सुटून आल्यावर मग पाहतों तों लिहिलेलीं २ प्रकरणें व माझ्या सहकाऱ्यांच्या माहितीचीं कांहीं पत्रें, या गडबडींत गहाळ झालेलीं. म्हणून मला तीं प्रकरणें पुन्हां लिहावीं लागलीं. असा हा द्राविडी प्राणायाम झाला. पण तो अेकदां करावयाचाच असें ठरवून तो आज पुरा केला आहे. मला जेवढी माहिती होती ती यांत संक्षेपानें आढळेल. सावरकर विलायतेंत होते तोंपर्यंतचा अितिहास अर्थात् त्यांनाच माझ्यापेक्षां अधिक माहीत असणार. म्हणून त्यांना तो तरी लिहून पाठवा म्हणून लिहिलें. पण ते वरील कारणांनीं, आणि प्रकृतीच्या अस्वास्थ्यानें, लिहूं शकले नाहींत. म्हणून सेनापति बापटांना तो लिहून पाठवण्यास विनंती केली. आणि सावरकरांचे त्यावेळचे अितर सहकारी मद्रासचे मंत्री डॉ. राजन्, आफ्रिकेंतले बॅ. पाथर, मुंबअीचे डॉ. अेरुळकर यांनाहि विनंतिपत्रें पाठवलीं. पण फक्त बापटांनींच थोडीशी माहिती पाठवली. बाकी-च्यांचीं अुत्तरेंहि आलीं नाहींत. त्यामुळें विलायतेंत, व अितरत्र, ज्या क्रांति-कारक खटपटी सावरकरांनीं केल्या त्यांपैकीं थोडीशीच माहिती मी येथें देअूं शकलों. सावरकरच जर ती लिहितील तरच ती पूर्णपणें अितिहासांत जमा होअील.

'मुहूर्तं ज्वलितं श्रेयो न च धूमायितं चिरं' या सुभाषिताला अनुसरून, अभिनव भारताची कारकीर्द जरी १० च वर्षांची असली तरी त्यानें प्रचलित केलेलें सशस्त्र राज्यक्रांतीचें नाणें पुढें बरींच वर्षें तरुणांच्या व्यवहारांत होतें. स्वातंत्र्यकवि गोविंद यांचीं काव्यें जशीं राज्यक्रांतिकारक तरुण गुणगुणत, तसें अभिनव भारताचें नाणेंहि त्यांच्या अकमेकांच्या देवघेवींत असे. आणि तें, किंवा त्याच किमतीचें व जातीचें, नाणें नेताजी सुभाषचंद्रांच्या सैन्यांतहि खुळखुळत होतें. हिंदुस्थानांतली राज्यक्रांति ही सशस्त्र किंवा निःशस्त्र साधनांनीं घडून आली, हा वादाचा प्रश्न आपण सोडून देअू. दोन्ही तऱ्हेच्या साधनांनीं ती घडली, हा समन्वयच स्वातंत्र्याचा अितिहास मान्य करील. त्या प्रश्नांतर्गत अहिंसेचा अूहापोह पुढें अेका प्रकरणांत मीं केला आहे. म्हणून येथें त्याची द्विरुक्ति करीत नाही. पण या समन्वयांत, सशस्त्र साधनांचा जो भाग आहे त्यांत, अभिनव भारताचा अंश थोडा तरी आहे हें खचित. आणि त्याची तत्त्वप्रणालीच पुढें आजहि चालत आहे, हें हैड्रोजन बॉंबची जी तयारी राष्ट्राराष्ट्रांत चालली आहे तिच्यावरून सिद्ध होत आहे. अहिंसा हा परम धर्म खरा. पण तो धर्म मानणारे दोन विरोधी पक्ष असतील तरच त्याला यश आहे. तसे धर्मप्रवण लोक जगांत नाहींत. तोंवर सशस्त्र साधनांवरच विसंबणें भाग आहे.

क्रांतिवीर बाबा आणि स्वातंत्र्यवीर विनायकराव सावरकर यांचीं जीं चरित्रें माझे मित्र रा. गोखले व करंदीकर यांनीं लिहिलीं आहेत त्यांत, व विशेषतः सावरकरांच्या 'आत्मचरित्रांत', अभिनव भारताच्या कार्याबद्दल बरीच माहिती आलेली आहे. त्यांत मीहि कांहींशी पुरवली होती. म्हणून या ग्रंथांत त्याची कांहींशीं पुनरुक्ति आढळेल. पण ती शक्य तितकी कमी करून, त्यांत न आलेली, पण खरी महत्त्वाची, माहिती, म्हणजे अभिनव भारताखेरीज दुसऱ्या गुप्त संस्था, शस्त्रास्त्रांची सिद्धता, बॉंबचे कारखाने, ज्याक्सन वधाचा कट, खटल्यांतली अंतस्थ माहिती वगैरे यांत दिलेली आहे. यांपैकीं पुष्कळशा गोष्टी गोखले किंवा करंदीकरांना प्रसिद्ध करणें शक्य नव्हतें. हिंदुस्थान आतां स्वतंत्र झाला असल्यानें त्या प्रसिद्ध करण्यास हरकत नाहीं. त्यांपैकीं अभिनव भारताच्या बॉंबच्या कारखान्यांबद्दल माझे मित्र, आणि अभिनव भारताचे जुने सभासद, रा. रामभाअू भाटे

यांनी पुष्कळच गोष्टी अगदी नव्यानेंच अुजेडांत आणल्या. ते आणि त्यांचे सहकारी ह्यांच्याशिवाय त्या कोणासहि माहीत नव्हत्या. म्हणून त्यांचें महत्त्व विशेष आहे.

त्यांतहि आम्ही आमच्या खटल्यांत गायडरचे अुजवे हात असलेले पोलीस अिन्स्पेक्टर सदावर्ते यांस फितवून, बॉंबच्या कारखान्याबद्दल अेक अवाक्षरहि पोलिसांपुढें, आणि म्हणून आमच्यावरील खटल्यांत, कसें येअूं दिलें नाहीं, आणि त्यामुळें त्या बॉंबच्या कारखान्यांतले आमचे अभिनव भारताचे सभासद कसे अजिबात सरकारच्या तावडींतून निसटले, आणि म्हणून रा. भाटे नुसते सुरक्षित राहिले अितकेंच नव्हें, तर अिंग्रज सरकारच्याच नोकरींत शिरून सुखानें आज कसें निवृत्तवेतन खात आहेत, याची सत्यकथा प्रथमच आज अुजेडांत येत आहे. कल्पित कादंबरी-सारखी ती आश्चर्यकारक, मनोरंजक, तशीच अुद्बोधकहि वाटेल आणि आमच्या कार्याच्या व्यापाचीहि कल्पना त्यानें स्पष्टपणें येअील. शिवाय त्या बॉंबच्या कारखान्यांत गुप्तपणें कार्य करणाऱ्यांचें समाधानहि होअील. रा. भाटे यांनीं जी माहिती दिली ती त्यांच्याच शब्दांत दिली आहे. त्यांच्या अुपकारांचें ऋण मी कसें फेडूं ? वाअीट अितकेंच वाटतें कीं, हें प्रकरण भाट्यांचें बॉंबच्या कलेंतले गुरु रा. कृष्णाजी गोपाळ खरे, वकील यांना, मी रा. डावरे यांच्या मार्फत, वारंवार विनंती केली असतांहि, त्यांनी तें लिहिलें नाही. त्यांनीं तें लिहिलें असतें तर अधिक स्पष्ट व भव्य तें झालें असतें.

असो. ज्या माझ्या मित्रांनीं मला बरीच माहिती देअून अुपकृत केलें त्यांचीं नांवें योग्य त्या ठिकाणीं मीं दिलींच आहेत. त्याबद्दल त्यांचें प्रसिद्धपणें आभार मानणें माझें कर्तव्य आहे. तसेंच रा. गोखले व करंदीकर यांनीं लिहिलेल्या चरित्रांचा मीं थोडासा अुपयोग केला असल्यानें त्यांचेहि आभार मानतों. सावरकरांसारख्या अलौकिक क्रांतिवीरांचीं चरित्रें त्यांनीं प्रथमच प्रसिद्ध करून जनतेला त्यांचें कार्य व त्यांचें महत्त्व पटवून दिलें. या ग्रंथांत त्या चरित्रांत नसलेला भाग प्रसिद्ध होत असल्यानें अभिनव भारताचें कार्य व माहात्म्य प्रथमच कांहींसें जनतेला समजेल, अशी आशा आहे.

तुरुंगांत व सुटकेनंतर जे आमचे हाल पोलिसांनीं व अधिकाऱ्यांनीं केले त्याबद्दलची माहिती, प्रकाशक रा. परचुरे व विश्वासराव सावरकरांच्या

आग्रहावरून, त्रोटक रूपानें १ ल्या परिशिष्टांत दिली आहे. न्यायदानांत खास न्यायालयानें कशा कायद्याच्या कसरती केल्या तेवढ्यापुरतीच माहिती २ ऱ्या परिशिष्टांत घातली आहे. कोल्हापूर प्रकरणाची माहिती १९४८ पासून मी मागत होतों, ती माझे मित्र गंगाधरपंत गोखले यांनी नुकतीच पुरवली म्हणून तिचें ३ रें परिशिष्ट केलें आहे. हस्तलिखितें पाहून माझे मित्र व सहकारी रा. कृ. गो. खरे, विश्वासराव डावरे, वामनराव जोशी, गोपाळराव धारप व कोल्हापूर केसमधले रा. गोविंदराव बापट यांनी ज्या सूचना केल्या त्याप्रमाणें दुरुस्त्या, शक्य तेथें, केल्या आहेत. कोल्हापूर प्रकरणावरूनहि लो. टिळक व गंगाधरराव देशपांडे यांचे क्रांतिकारकांशीं किती दृढ संबंध होते हें वाचकांच्या लक्षांत येईल. रा. गंगाधरपंत गोखल्यांचे त्याबद्दल मी आभार मानतों.

ग्वाल्हेरच्या कटाची हकीकत लिहून धाडावी म्हणून प्रा. डॉ. हरी रामचंद्र दिवेकर यांना मी वारंवार विनंत्या केल्या. पण त्यांनीं ती पाठवली नाहीं याबद्दल खेद होतो. ती आली असती तर कोल्हापूर, ग्वाल्हेर, नासिक, सातारा येथल्या उघडकीस आलेल्या सशस्त्र क्रांतीच्या प्रयत्नांची संगतवार हकीकत पुरी मिळाली असती. पण ग्वाल्हेरचें गालबोट राहिलेंच.

अभिनव भारताचे बरेचसे सभासद आतां दिवंगत झाले आहेत. त्यांना, व ज्यांनीं आमच्याबरोबर देहदंड व सर्वस्व हानि आनंदानें पत्करली त्या आमच्या विद्यमान ज्ञाताज्ञात सहकाऱ्यांना, कृतज्ञतेनें शतशः अभिवादन करून ही प्रस्तावना संपवतों.

अक्षय्य तृतीया,<br>
शके १८७२,<br>
येवलें

विष्णू महादेव भट

# अनुक्रमणिका

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | वरून ११ | आगरकरांच्यासारखे रोगजर्जर | 'सुधारका'चे संपादक |
| १५ | वरून ५ | त्याग | धैर्य |
| ४४ | वरून १७ | आठवले यांच्यापुढें | ग. र. वैशंपायन (हिंदी-कोशकर्ते) व रा. आबा-साहेब सहस्रबुद्धे (बेला-पूर) हीं नांवें हवींत |
| ७० | वरून ९ | प्पारिस | प्यारिस |
| ७२ | शेवटची | आधारानें | आधारापूर्वींच |
| ७३ | वरून २ | बांधला | बांधला होता |
| ७४ | ,, ४ | बाबूरावांच्या | बाबूरावांच्या व कर्व्यांच्या |
| ,, | ,, १७ | मुंबई | मुंबई, पुणें |
| ८१ | ,, ८ | अडनांव | आडनांव |
| ८९ | ,, ४ | खून | वध |
| ९० | ,, १२ | अहोरात्र | ५–६ तास |
| ९९ | ,, १२ | करून जेरबंद | जेरबंद करून |
| १०१ | खालून ८ | आरंभापासूच | आरभापासून |
| १०४ | वरून ७ | आहीं | नाहीं |
| १११ | ,, १२ | गुदगुदल्या | गुदगुल्या |
| ११९ | खालून ६ | आपल्या | आमच्या |
| १२२ | ,, ५ | न्याय | न्याय्य |
| १२५ | शेवटची | हजार | हजारों |
| १२६ | वरून ४ | वाढेल | वाढलें |
| १२९ | खालून २ | अभिवन | अभिनव |
| १३६ | ,, ७ | संस्कृतज्ज्ञ | संस्कृतज्ञ |

| | | | |
|---|---|---|---|
| १३९ | वरून १५ | सुलभ | सुलभ |
| १४२ | ,, १५ | पहुाणे | पाहुणे |
| १६६ | खालून ११ | off | oft |
| १८० | ,, १० | नताजी | नेताजी |
| २०२ | ,, १४ | त्यांतहि | त्यांतली |
| २१६ | शेवटची | लागाल | लागला |

# अभिनव भारत

अथवा

## सावरकरांची क्रांतिकारक गुप्त संस्था



### प्रकरण पहिलें

## अभिनव भारताची पार्श्वभूमि

स्वराज्येच्छुनें पाहिजे युद्ध केलें। – गोविंद

१८५७च्या सशस्त्र स्वातंत्र्ययुद्धांत हिंदुस्थानाला रजपूत, शिंदे, शीख आणि अितर संस्थानिक यांचें साहाय्य न मिळाल्यानें अपयश आलें; आणि त्याचा सूड अिंग्रजांनीं अितक्या अघोर कृत्यांनीं घेतला कीं, पुढें स्वातंत्र्यवादी पिढी निर्माण होअूं नये म्हणून त्यांच्यांतल्या कित्येक राक्षसांनीं हिंदी स्त्रियांचे स्तनहि कापून टाकले! त्यानंतर कित्येक वर्षेपर्यंत सर्वसामान्य जनतेनें स्वातंत्र्यार्थ कोणतेहि प्रयत्न केले नाहीत. जवळजवळ अेक पिढीपर्यंत ही अनास्था टिकली. त्या कालांत राणीचा जाहीरनामा, शस्त्रबंदीचा कायदा, संस्थानें खालसा करण्याचें रहित करणें, आणि जनतेला संतुष्ट राखणें हें धोरण अवलंबून अिंग्रजांनीं आपलें आसन पुनः स्थिरावलें. पण स्वातंत्र्याची अुपजत लालसा कांहीं काळ प्रसुप्त झाली असली तरी ती ठार मेली नव्हती. कांहीं सरकारी नोकरांतच त्या स्वातंत्र्याच्या लालसेच्या स्फुल्लिंगानें पेट घेतला! 'लोकहितवादी' गोपाळराव देशमूख आणि प्रसिद्ध बंडखोर वासुदेव बळवंत फडके हे सरकारी नोकरच होते. देशमुखांना स्वातंत्र्याचीं सुखस्वप्नें पडत होतीं, असें त्यांच्या हल्लीं प्रसिद्ध झालेल्या चरित्र-लेखांवरूनच दिसतें.

वासुदेव बळवंत फडक्यांनीं तर अिंग्रजांविरुद्ध खास बंडाचा झेंडाच अुभारला ! रा. जोशी यांनीं जें फडक्यांचें चरित्र लिहिलें आहे त्यांत स्वातंत्र्यप्राप्तीबद्दलच्या फडक्यांच्या मनोवृत्तींचा सुंदर आविष्कार सापडतो. विष्णुशास्त्री चिपळूणकर हेहि प्रथम सरकारी नोकरींतच शिरले होते. पण सरकारी नोकरींत असतांना देशस्वातंत्र्याची हुरहुर त्यांना स्वस्थ बसूं देत नव्हती. प्रसिद्ध ज्योतिराव फुले यांनाहि अिंग्रजांचा कांटा काढण्याची स्फूर्ति अेकदां झाल्याचें त्यांच्या अुद्गारांवरून दिसतें. सुप्रसिद्ध माधवरावजी रानडे हे जरी त्या वेळीं सरकारी नोकर होते तरीहि, ते वासुदेव बळवंतांना मदत करितात या संशयावरून, अिंग्रज सरकार त्यांच्या पाळतीवर होतें, व त्यांचा पत्रव्यवहारहि फोडून पाही. यावरूनच असें दिसतें कीं, स्वतंत्र, जिवंत, प्रतिभासंपन्न माणसांना स्वातंत्र्यप्राप्तीशिवाय देश अूर्जितावस्थेला यावयाचा नाहीं, हें कळून चुकलें होतें. आणि जो तो आपापल्या परीनें त्या दृष्टीनें लोकशिक्षणाचें काम करीत होता.

## टिळकांची पिढी व क्रांतीची स्फूर्ति

या कालांतच चिपळूणकर, टिळक व आगरकर यांसारख्या स्वयंप्रभ विभूतींना 'लोकहितवादी' व माधवरावजी रानडे याचें मिळमिळीत धोरण न पटून त्यांनीं त्यांच्यापेक्षां अेक पाअूल पुढें टाकलें. 'निबंधमाला', 'केसरी' आणि 'सुधारक' या वृत्तपत्रांतून अिंग्रज सरकाराविषयीं द्वेष अुत्पन्न होअील असे लेख येअूं लागले. निःशस्त्रता आणि राजद्रोहाच्या कायद्याचें कांटेरी कुंपण यांच्या कचाट्यांत सांपडलेल्या असहाय्य, असंघटित, अज्ञानी जनतेला हळूंहळूं देशभक्तीचें, स्वार्थत्यागाचें, प्रतिकारक्षमतेचें बाळकडू पाजून भारतीय जनता, विशेषतः महाराष्ट्रीय जनता, त्यांना क्रांतिपथावर आणावयाची होती. १८५७ च्या सशस्त्र क्रांतीच्या आठवणी पुसट होत जात होत्या, पण वासुदेव बळवंतांच्या प्रयत्नांची स्मृति ताजी होती. त्या स्मृतीच्या स्फुल्लिंगाला देशभक्तीचा फुंकर घालून तो प्रज्वलित ठेवणें अवश्य होतें. या पेटत्या देशभक्तीच्या ज्वाळेंत अिंग्रजसरकारच्या हरअेक दुष्कृत्यांच्या अिंधनावर, कडक टीकेचें पेट्रोल ओतून, क्रांतीचा वणवा पेटवण्याचें व्रत ह्या टिळकांच्या पिढींतील देशभक्तांनीं केलें. आणि त्यांच्या लेखांमुळेंच चाफेकर व सावरकर यांना क्रांतिप्रवण केलें, हें अितिहासच सांगतो.

चाफेकरांनीं र्‍यांडचा वध केल्याच्या आरोपाच्या खटल्यांत आपल्याला 'केसरी'मुळें स्फूर्ति मिळाली हें स्पष्टच सांगितलें होतें. स्वातंत्र्यवीर सावरकरहि आपल्या आत्मचरित्रांत लो. टिळकांना "गुरूणां गुरुः" असाच मान देतात (सावरकर आत्मचरित्र पृ. ८९). त्यांच्या 'लेखाचीं पारायणें' ते करीत होते. आणि 'टिळक आंतून सदैव राजद्रोहीच होते' असाच संस्कार त्यांच्या मनावर या 'टिळकपणा'मुळें झाला होता (तोच ग्रंथ पृ. २१६). चिपळूणकरांच्या निबंधमालेंतील "आमच्या देशाची स्थिति" या, त्यावेळीं व नंतरहि, जहाल गणलेल्या लेखावर अिंग्रजसरकार कैक वर्षें प्रेस ॲक्टचा घण मारीत होतें, हा अेकच पुरावा चिपळूणकरांच्या ज्वलंत देशभक्तीच्या पुरस्काराचा अुत्कृष्ट पुरावा आहे. आणि र्‍यांडशाहीमुळें आगरकरांच्यासारखे वृद्ध व रोगजर्जर देशभक्तहि अितके खवळले होते कीं, त्यांचे त्या वेळचे 'सुधारकां'तील लेख हे केसरींतल्या लेखांपेक्षांहि अधिक कडक व भडक होते, असें दिसून येतें.

पण या देशभक्तांनीं अिंग्रजसरकारांविरुद्ध पेटवलेल्या वणव्यांत सशस्त्र क्रांतीच्या विचारांचा भडका अुठवण्याचें प्रत्यक्ष कार्य 'काळ' कर्ते शिवरामपंत परांजपे यांचेंच होय. र्‍यांडसारख्या जुलमी अधिकार्‍याचा शिताफीनें वध करणार्‍या चाफेकरांस सर्व नरमगरम पत्रकार खुनी, माथेफिरू, असें म्हणत असतां, चाफेकरांच्या देशप्रेमाचा गौरव करून त्यांना 'हुतात्मा' 'देशवीर' martyr या आदरदर्शक विशेषणांनीं परांजप्यांनींच प्रथम संबोधलें! आणि म्हणूनच सावरकर म्हणतात कीं, माझ्या क्रांतिकारक जीवनाचें गुरुपद "मी काळासच देअू शकेन" (सा० आ० पृ. ८८). पण तेंहि 'स्फूर्तीचें, कृतीचें नव्हे.' आणि शेवटच्या शब्दांतच खरी मख्खी आहे; कारण पुढें शिवरामपंतांचें चरित्र या पूर्वध्येयापासून अलग झालें, हें पुष्कळांस माहीतच आहे. पण 'क्रांतिकारकांची पिढी' महाराष्ट्रांत निर्माण करण्याचें श्रेय त्यांनाच पुष्कळांशीं दिलें पाहिजे, हेंहि खरें आहे.

## महाराष्ट्राला क्रांतीचा अग्रमान

क्रांतिकारक जीवनाच्या 'स्फूर्तीचें' ऋण जरी अभिनव भारताच्या जनकांनीं — सावरकर, म्हसकर, पागे यांनीं — या सर्वांपासूनच घेतलें असलें तरी 'कृतीचें' ऋण फडके, चाफेकर यांच्यापासूनच सावरकरांनीं घेतलें

हें अुघड आहे ( सा० आ० पृ. ७८, ८१ ). आणि त्याचा प्रत्यक्ष परिणाम म्हणजे 'राष्ट्रभक्तसमूह' या अभिनव भारताच्या पूर्वीच्या रूपांतल्या गुप्त संस्थेची १८९९ च्या अखेरीस नाशिकक्षेत्रांत झालेली स्थापना, हा होय. तिचें ' स्वातंत्र्य हेंच साध्य, आणि सशस्त्रक्रांति हेंच साधन होतें. ( सा० आ० पृ. १३८ ) '. सावरकरांच्या आत्मचरित्रांत ( पृ. २१३–२३३ ) हें ध्येय व हेंच साधन ठरवणें कां अवश्य होतें, याची उत्कृष्ट मीमांसा केली असल्यानें त्याची पुनरावृत्ति मी करीत नाहीं. वाचकांनीं तें वर्णन मुळांतूनच वाचावें अेवढीच शिफारस मी येथें करूं शकतों. अभिनव भारताच्या तत्त्वप्रणालीचें सारच त्यांत आलें आहे. आणि तदनुसारच त्याचा पुढला १० वर्षांतला प्रचंड विस्तार पाहिला पाहिजे.

स्वातंत्र्यप्राप्तीच्या ध्येयाचा अुगम प्रथम महाराष्ट्रांतच झाला, याला अिंग्रज सरकारच्या दप्तरांतलाच प्रत्यक्ष पुरावा आहे. हिंदुस्थानांत जेव्हां राजद्रोहाचा कल्लोळ अुठून अिंग्रज सरकारविरुद्ध सशस्त्र क्रांतीची चौफेर अुठावणी होअू लागली, तेव्हां त्यावर अुपाययोजना सुचवण्यासाठीं सरकारनें १९१८ सालीं रौलेट कमिटी नेमली होती. तिनें जो अहवाल प्रसिद्ध केला त्यांत राजद्रोहप्रसाराच्या अग्रपूजेचा मान महाराष्ट्रांतल्या चित्पावन ब्राह्मणांनाच दिला आहे. तसेंच Indian Unrest म्हणजे " हिंदुस्थानांतली अशांतता " या चिरोलच्या ग्रंथांत या " अशांततेच्या जनकत्वाचा मान "हि त्यानें टिळकांनाच दिला आहे. आणि त्यांत 'केसरी', 'काळ', 'विहारी' यांनींच हा प्रसार केला, आणि चाफेकरांना व सावरकरांच्या अभिनव भारताला टिळक-परांजपे यांनींच स्फूर्ति व अुत्तेजन दिलें, असा स्पष्ट अुल्लेख आहे. बंगाल व मद्रास या प्रांतांत अिंग्रजी शिक्षणाचा प्रसार ५०–७५ वर्षें अगोदर झाला असला तरी, तिकडे स्वातंत्र्याच्या कल्पनेचा अुदय न होतां, महाराष्ट्रांतच तिचा अुदय झाला, ही घटना खरोखरच महत्त्वाची आहे. असा अेक अैतिहासिक गैरसमज निबंधमालाकारांनींहि पसरविला होता आणि आहे कीं, केवळ अिंग्रजी शिक्षणानेंच स्वातंत्र्याच्या विचारांचा सुशिक्षितांत अुदय झाला. पण केवळ तेंच कारण असतें तर बंगाल व मद्रासमध्येंच या स्वतंत्रतेच्या कल्पनांचें बीजारोपण प्रथम व्हावयास पाहिजे होतें. पण तें झालें नाहीं, त्यावरून केवळ अिंग्रजी शिक्षण हें स्वातंत्र्याच्या कल्पनेचें अेकमेव कारण नव्हे हें अुघड ठरतें. आणि अुपर्युक्त सर-

कारच्या " राजद्रोही कमिटीचा " निर्णयहि तसाच आहे. महाराष्ट्रांतल्या ब्राह्मणवर्गांत पेशवाअीच्या वेळची स्वातंत्र्यलालसा जागृत असल्यानें, त्या पुढारलेल्या वर्गांतच तिनें, शिक्षणाच्या साहाय्यानें, प्रक्षोभ अुत्पन्न केला, आणि बेडरपणें त्याच मार्गानें तिचा प्रसार केला, हें खरें अैतिहासिक सत्य आहे. मराठ्यांत ही स्वातंत्र्यप्रीति आणि लढाअूवृत्ति अुपजत व जागृत नसती तर अिंग्रजी शिक्षणानें त्यांच्यावरहि फारसा परिणाम होण्याचें कारण नव्हतें. तेव्हां मराठ्यांच्या रक्तांतच स्वातंत्र्यप्रेमाची लाली चमकत होती, आणि अितर प्रांतांत असलीच तर ती पंडुरोग्याच्या रक्ताप्रमाणें निस्तेज होती, हें अुघड आहे. असो.

## क्रांतीची स्मरणी

अभिनव भारताच्या पूर्वपीठिकेचा हा थोडक्यांत आढावा आहे. सावरकर हे या सशस्त्र क्रांतिकारक संस्थेचे जनक असल्यानें त्यांनीं आपल्या आत्मचरित्रांत तो विस्तारानें, त्यांच्या अुपजत काव्यमय भाषेंत, सांगितला आहे. तेव्हां त्याची द्विरुक्ति येथें करण्याचें कारण नाहीं. त्या संस्थेचें मूळ नांव 'राष्ट्रभक्तसमूह' आणि उघड टोपणनांव 'मित्रमेळा'. या मित्र-मेळ्याचेंच रूपांतर कालांतरानें १९०४ मध्यें 'अभिनव भारता'त झालें, आणि पुढें तेंच गाजलें. या संस्थेंत माझा प्रवेश १९०१ मध्यें झाला आणि तो अखेरपर्यंत टिकला. हिंदुस्थानांतला, विसाव्या शतकांतला, हा स्वातंत्र्य-प्राप्तीचा पहिलाच अुठाव असल्यानें त्याचा अितिहास विस्तृत लिहिणें योग्य. पण सावरकरांच्या आत्मचरित्रांत, (पृ. १११, १७१, १८३) आणि पुढें या ग्रंथांतहि, सांगितल्याप्रमाणें त्या अितिहासाचीं साधनें आम्हींच आपल्या हातानें नष्ट केलीं असल्यानें, आतां केवळ यमराजाच्या तावडींतून अद्याप सुटलेलों, व साठीच्या पैलतीरावर गेलेलों, असे जे काय आम्ही दोघे-चौघे आहोंत त्यांच्या "आठवणी"वरच विश्वासून राहणें अपरिहार्य आहे. मूर्ख ब्राह्मणांच्या आज्ञेनें तुकाराममहाराजांनीं जशा आपल्या अभंगांच्या वह्या अिंद्रायणींत बुडविल्या त्याचप्रमाणें आम्हींहि आमच्या दैनंदिन्या, टांचणें, टिपणें, अग्नये स्वाहा करून टाकलीं. तुकोबांना खुद्द परमेश्वराचें पाठबळ असल्यानें त्यांच्या वह्या अगदीं कोरड्या व जशाच्यातशाच राहिल्या. आम्हांला अीश्वराचें साहाय्य नसलें तरी आमच्या सर्व दिव्यांतून बचावलेल्या

स्मृतिशिलांवर कोरलेले जे संस्कार आहेत तेच अुजळून वाचकांपुढे ठेवण्या-वरच आम्हांस समाधान मानून घेणें भाग आहे. आणि या आठवणींनाच शक्य तितकें नीटनेटकें स्वरूप देअून त्यांचीच स्मरणी मी वाचकांना सादर करीत आहें. खुद्द सावरकरांनीं व अितरांनीहि अनेकवार सूचना करून गळ घातली म्हणूनच मीं ही स्मरणी जुळवली. या स्मरणींतहि सर्व मणी अेक-सारखे व सलग ओंवलेले नाहींत. थोडेच पण ठसठशीत आहेत ते, येतील तसे, ओंवून :ही मुक्तांची माला स्वातंत्र्याच्या प्राप्तीकरतां सशस्त्र वा निःशस्त्र क्रांतीच्या यज्ञकुंडांत ज्यांनी अक्षरशः, कणशः आणि क्षणशः, आपलें आयुष्य भस्मसात् केलें त्या मुक्तात्म्यांच्यां चरणांवर अर्पित आहे. १८५७ तले नानासाहेब पेशवे, बहादुरशहा, तात्या टोपे आणि झांशीच्या लक्ष्मीबाअी-पासून तों तहत १९४७त स्वातंत्र्य प्राप्त होअीपर्यंत, ९० वर्षांच्या या काळांत, ज्यांनीं ज्यांनीं स्वातंत्र्यार्थ आत्मबलिदान केलें ते सर्व पुण्यात्मे वंदनीयच आहेत. या स्वातंत्र्यार्थ चाललेल्या यज्ञांत आम्हीहि आमच्या कर्तृत्वाच्या ज्या कांहीं आहुति टाकल्या त्यांची अल्पशीच माहिती या स्मरणीत आहे. तिचा योग्य तो अुपयोग भावी सरकारी अितिहासकार करो हीच इच्छां.

ही स्मरणी शक्य तितकी पुरी व सर्वांगसुंदर व्हावी म्हणून मीं अनेक प्रयत्न केले. जे कांहीं थोडेफार आमचे देशभक्त यावेळीं जिवंत आहेत त्यांना पत्रें लिहिलीं. वृत्तपत्रांतून विनंती करून माहिती मागविली. पण त्याचा फारसा अुपयोग झाला नाहीं. फारच थोड्या मित्रांनीं लेख पाठ-वले. त्यांचा शक्य तो अुपयोग मीं या ग्रंथांत केला आहें. आणि त्यांचे त्याबद्दल मी आभारहि येथें मानतों. या अभिनव भारताचे खरे जनक म्हणजे स्वातंत्र्यवीर सावरकर. त्यांनींच वास्तविक हा ग्रंथ लिहावयाचा. पण त्यांनीं आपल्या आत्मचरित्राचा १९०२ पर्यंतच जो अर्धविराम केला आहे तो अद्याप तेथेंच आहे. त्यांना मीं वारंवार सांगितलें कीं, तुम्हीच हा ग्रंथ लिहा. निदान तुमची विलायतेंतली कामगिरी आम्हांला पुरी माहीत नाहीं ती तरी तुम्ही लिहून काढा; बाकीची आम्ही लिहितों. पण त्यांच्या प्रकृतिमानामुळें, अिच्छा असूनहि, त्यांना तें करणें अशक्य आहे, असें त्यांनीं मला कळवलें, आणि " तूंच तुला जितकी माहिती आहे तितकी लिहून काढ व प्रसिद्ध कर " अशी मलाच अुलट गळ घातली. कै. डॉ. नारायणराव अूर्फ

बाळ सावरकर यांनाहि मी त्यांची माहिती कळवण्याबद्दल लिहिलें होतें. पण महात्मा गांधीवधानंतर त्यांच्यावर अधम कॉंग्रेसगुंडांनीं हल्ले करून त्यांना ज्या प्राणांतिक जखमा केल्या, त्यामुळें मरेपर्यंत पुरती त्यांची प्रकृति बरी झालीच नाहीं, आणि त्यांच्याहि हातून कांहीं लिहिलें गेलें नाहीं. म्हणजे ज्यांच्याकडून हा ग्रंथ वास्तविक पुरा लिहिला जावयाचा त्यांना प्रकृतीच्या अस्वास्थ्यानें तें शक्य झालें नाहीं. मीहि आतां ६५ व्या वर्षांत आहें. माझीहि प्रकृति बरी नाहीं व नसते. तरी पण आपण आपलें कर्तव्य करावें, त्याचें चीज होवो न होवो, अशा अीर्षेनें मी हें लिहून काढीत आहें. आमचे सर्वच प्रयत्न जेथें विफल झाले तेथें हा तरी सफल होओील याची आशाच कशाला ! प्राप्त कर्तव्य करीत रहावयाचें अेवढेंच आमचें व्रत. तेंच आमचें ब्रीद. त्याप्रमाणेंच हा यत्न करीत आहें. आणि तो ज्या देशस्वातंत्र्यासाठीं आम्हीं आमच्या संसाराची, आयुष्याची, सर्वस्वाची होळी केली, त्या स्वातंत्र्यलक्ष्मीच्या चरणांवर अर्पित आहे. विस्मृतीमुळें यांत बऱ्याच अुणीवा राहिल्या आहेत, हें मीच कबूल करतों. पण आतां विस्मृति वाढणार, कमी होणार नाहीं. म्हणून तिचा फारसा पगडा बसला नाहीं तोंच आठवते ती कथा येथें अुतरून ठेवीत आहें.

## प्रकरण दुसरें

# महाराष्ट्रांतल्या गुप्त संघटना व त्यांचें कार्य

मामनुस्मर युध्य चं । —गीता

फडके, चाफेकर, टिळक, परांजपे वगैरे प्रसिद्ध महाराष्ट्रीय क्रांतिप्रचारकांच्या कार्यांचा अिष्ट तो परिणाम म्हणजे सुशिक्षित तरुणांच्या अंतःकरणांत सशस्त्र क्रांतीची ज्योत पेटवणें, हाच होता. आणि त्यांनीं पेटवलेल्या या ज्योतीवर, आपल्या अंतःकरणांतील ज्योत पेटवून, हजारों सुशिक्षित तरुण क्रांतिप्रवण झाले होते. या क्रांतीचा अुद्देश अिंग्रज सरकारची जुलमी परकी राजवट अुलथून पाडणें हाच होता. असे प्रयत्न कोणतेंहि जुलमी सरकार अुघडपणें करूं देत नाहीं. अिंग्रज सरकार तरी ते कसें करूं देणार? म्हणून हे प्रयत्न गुप्तच करणें भाग होतें. पण गुप्त प्रयत्न करणें म्हणजे खालीं, वर, मागें, पुढें, चोहोंबाजूस, सरकारच्या रोषाचा अग्नि पेटलेला असतां त्यामध्यें बसून पंचाग्निसाधनाअितकीच त्रासदायक व धोक्याची तपश्चर्या होती. असले प्रयत्न करणाऱ्या लोकांस फांशी, जन्मठेप, व सर्व अिस्टेट जप्ती वगैरे अत्यंत दारुण शिक्षा, दंडविधीमध्यें ( पीनल कोडमध्यें ) सांगितलेल्या होत्या. त्यामुळें सामान्य अशिक्षित माणसें या असल्या भयंकर साहसी प्रयत्नांत पडणें शक्य व अिष्टहि नव्हतें. सर्वस्वाचा होम करण्यास सदैव तत्पर असे त्यागी, धाडसी,

हजरजबाबी, सुशिक्षित व निष्ठावंत तरुणच या कामास हवे असतात. आणि असे शेकडों तरुण मातृभूमीच्या स्वातंत्र्यार्थ महाराष्ट्रांत तयार होअूं लागले होते.

या सुविद्य तरुणांना अेकत्र आणून त्यांची सर्वसमर्थ अशी गुप्त संघटना घडवून आणणें म्हणजे सुळावरची पोळी होती. पण तीहि घेण्याचा प्रयत्न करणें अवश्यक होतें. सुसंघटित, प्रबळ आणि, सशस्त्र सरकारला अुलथून पाडण्यास तितकीच, किंबहुना अधिक विशाल व अधिक जोरदार, सशस्त्र संघटना हवी. म्हणून विस्कळितपणें भडकलेल्या या तरुणांना अेकत्र आणण्याचे, लोकसंग्रहाचे, संघटित प्रयत्न सुरू झाले. प्रथमश्रेणीचा मान, या बाबतींत वासुदेव बळवंत फडक्यांचा. त्यांच्या चरित्रांत तो सविस्तर दिला आहे. नंतरचा, आधुनिक काळांत तरी, चाफेकरांच्या संघटनेला द्यावा लागेल. त्यांच्या खटल्यांत शिवाजीवरचे काव्यात्मक अुद्गार जे त्यांचे दिलेले आहेत त्यांवरून, आणि त्यांनीं ज्या हिकमतीनें ऱ्यांड व आयर्स्ट यांच्या वधाचा घाट रचला त्यावरून, ही त्यांची गुप्त संस्था चांगलीच संघटित आणि दक्ष असावी, असें वाटतें. शिवाय त्यांचें नांव सांगणाऱ्या देशद्रोही, विश्वासघातकी, द्राविडांचा वध वासुदेव चाफेकर, रानडे व साठे यांनीं ज्या युक्तीनें केला त्यावरून, तर ह्या अनुमानाला अधिकच बळकटी येते. आणि पिस्तुलें, तरवारी वगैरे शस्त्रें जमवण्याच्या त्यांच्या गुप्त प्रयत्नास गुप्त संघटनेचा आधार असलाच पाहिजे, असेंहि निर्विवाद म्हणतां येतें. असो. ही त्यांची संघटना त्यांच्या फांशीच्या शिक्षेनंतर लौकरच विरून गेली. आज त्या संघटनेपैकीं कोणी शिल्लक असतील तर रा. साठे हे हयात आहेत. त्यांनीं आपले अनुभव आतां प्रसिद्ध करण्यास हरकत नाहीं. मला स्वतःला त्याबद्दल कांहींच माहिती नाहीं.

## नाशिकचा मित्रमेळा – अभिनव भारत

क्रांतिवृक्षाची चाफेकरांची शाखा सरकारी दडपशाहीनें जरी तुटली तरी त्याला मित्रमेळ्याची किंवा अभिनव भारताची नवी शाखा १८९९ तच लौकर फुटली. सावरकर नाशकास विद्यार्जनासाठीं आल्यानंतर त्यांचा व नाशिकचे रा. त्र्यंबकराव म्हसकर व रावजी कृष्ण पागे यांचा स्नेहसंबंध लौकरच जुळला. हे दोघेहि गृहस्थ त्यावेळीं सरकारी नोकरींत

होते. पण 'केसरी', 'काळ' वगैरे वर्तमान पत्रांच्या वाचनानें त्यांनाहि देशाच्या स्वातंत्र्यासाठीं कांहीं करावें, अशी मनापासून कळकळ होती. म्हणून तिघां-च्या विचारविनिमयानंतर प्रथम 'राष्ट्रभक्तसमूह' या नांवाची अेक गुप्त संस्था १८९९ च्या नोव्हेंबरांत या तिघांनीं काढली, आणि हे तिघेहि त्या संस्थेचे शपथबद्ध सभासद झाले. स्वातंत्र्य, स्वराज्य हे शब्दहि त्या कालांत सामान्य लोकांस परिचित नव्हते. त्यांतहि अिंग्रज सरकारशीं झगडूनच स्वातंत्र्य मिळणें शक्य असल्यानें अुघडपणें कोणतीहि चळवळ त्यासाठीं अिंग्रज सरकार करूं देणें हेंहि शक्य नव्हतें. म्हणून संस्थेचें सर्व कार्य गुप्त-पणेंच चालें.

पण 'गुप्त' संस्था लोकांना कळणार कशी, आणि कळल्याशिवाय तिला लोक मिळणार कसे? हा पेंच या तरुणांना अडवीत होता. म्हणून स्वराज्याचा आणि स्वातंत्र्याचा अुघडपणें प्रचार करणारी, आणि त्या प्रचारानें आकृष्ट झालेल्या देशभक्तांतून राज्यक्रांतीच्या प्रचंड दीर्घोद्योगाला लागणाऱ्या कस-लेल्या युयुत्सु वीरांना चांगल्या कसोटीवर परीक्षून अेकत्र करणारी, अशी अेक अुघड कार्यकर्ती संस्था हवी, असें या संस्थापकांना वाटूं लागलें. आणि या विचारांचा परिपाक म्हणजेच १९०० च्या प्रारंभींच "मित्रमेळा" या साध्या सोंवळ्या नांवाची अुघड कार्य करणारी संस्था प्रस्थापिण्यांत आली. वरील तीन संस्थापकांशिवाय या अुघड संस्थेंत तात्या सावरकरांचे वडील बंधु गणेश दामोदर अुर्फ बाबा सावरकर, वैद्यभूषण वामन केशव व त्यांचे वडील बंधु रामचंद्र केशव दातार, त्र्यंबक रघुनाथ व त्यांचे वडील बंधु नाना वर्तक व अितर कांहीं हे प्रारंभीचे सभासद होते.

### प्रतिकूल परिस्थिति

अुघड आणि गुप्त कार्य करणाऱ्या अशा या दोन संस्था स्थापल्या खऱ्या. पण तो काळच राजकीय चळवळीच्या अगदीं बाल्यावस्थेचा होता. अनेक वर्षांच्या पारतंत्र्यांत कावळ्याकुत्र्यांप्रमाणें जगण्यापलीकडे कांहीं ध्येय नसल्यामुळें, शिक्षणाच्या अभावामुळें, आणि जाति – धर्म – भाषा – आचारविचार यांच्या भेदामुळें, समाज शतशः विदीर्ण आणि निर्बल कुजट झाला होता. कोणतीहि संघटित चळवळ चालू ठेवण्याचें, समाजकार्य कर-ण्याचें, शिक्षण, वळणच, लोकांना नव्हतें. त्यामुळें कोणतेंहि कार्य जाणते-

पणानें, नेटानें, कष्टानें, त्यागानें सतत होत नव्हतें. सुशिक्षित मंडळीहि थोडी आणि त्यांतली बरीचशी आळशी, चैनी, स्वार्थलंपट आणि व्यसनी होती. समाजांतला जाणता वर्गच जर असा नीति आणि विवेकभ्रष्ट,तर खालच्या अज्ञानी थरांबद्दल तर विचारावयासच नको. न कळतच, शाक्त पंथांतल्या पंच मकारांनीं, आणि तदुद्भव गुह्य रोग, आपापसांतलीं भांडणें, मारामाऱ्या यांनीं समाज अगदीं पोखरून कुजून गेला होता. कोणत्याहि सार्वजनिक चळवळीला त्यामुळें जोर चढत नव्हता. आपणांस काय हवें, हेंच बहुजन समाजाला कळत नव्हते! त्यामुळें लोकसत्ता, स्वातंत्र्य, स्वराज्य म्हणजे काय, याचा बोधच लोकांना होईना. मग त्याकरितां करावा लागणारा प्राणत्यागापर्यंतचा स्वार्थयज्ञ याची कल्पनाच लोकांना कशी येणार? अशा स्थितींत गुप्त राष्ट्रभक्तसमूह किंवा प्रकट मित्रमेळा, या संस्थांना सभासद मिळणार कसे? त्यांतहि या संस्थांचे सभासद नुकतेच विशी-तिशीच्या आंतले. पोरसवदाच लोकांना ते वाटत. त्यामुळें सभासदांची संख्या फारशी त्यावेळीं लौकर वाढत नव्हती. अितकेंच नव्हे तर मिळविलेले सभासदहि चुकारपणा करीत. सावरकरांच्या आत्मवृत्तांत व बाबाराव सावरकरांच्या चरित्रांत, खुद्द बाबा, रामभाअू दातार, नाना वर्तक यांसारखी जरा वडील-धारी मंडळी, मित्रमेळ्याच्या साप्ताहिक बैठकीलाहि, पोरखेळ समजून, अनेक बयादी सांगून, कशी हजर रहात नसत, याचें वर्णन वाचकांनी पहाण्यासारखें आहे. जाणत्या वर्गातल्या लोकांची, साप्ताहिक सभांसारख्या साध्या लोक-संग्रहाच्या व शिक्षणाच्या प्रकट कार्याविषयीं, ही अनास्था, तर मग त्या कार्यांतून त्यागानें तावूनसुलाखून आणि अभ्यासानें घासूनपुसून, सुसंस्कृत होअून, रेखीव सतत कार्य करणारी आणि स्वातंत्र्य-संपादनाच्या कार्याला अेकनिष्ठेनें शिस्तीनें दीर्घोद्योगी असलेली मंडळी मिळणें किती दुष्कर होतें, याची वाचकांना कल्पना येअील.

## गुप्त-प्रकट-विरोधी कार्यें

या सभासदत्वाच्या अल्पसंख्येमुळें प्रथमतः गुप्त व प्रकट कामें त्याच त्याच माणसांना करावीं लागत. घरांतल्या कर्त्यासवरत्या व जबाबदार अशा अेकाच माणसाला ज्याप्रमाणें बाहेरचा बाजारहाट आणि घरांतले कुलुपबंद जडजवाहिराचे व अितर गुप्त व्यवहार करावे लागतात, त्याप्रमाणेंच, नाअि-

लाजाने, याहि दोन्ही संस्थांत मंडळी थोडीच असल्यानें, त्यांनाच हीं परस्परविरोधी कामें करणें भाग असे. नटांची संख्या कमी असली म्हणजे नाटकांत अेकाच नटाला ज्याप्रमाणें परस्परविरोधी दिसणारीं कामें करणें जरूर असतें, तसेंच येथेंहि होअी. त्यांतहि, दुष्काळांत तेराव्या महिन्याच्या अडचणीप्रमाणें, कार्याचा व्याप वाढलेला असतांच त्र्यंबकराव म्हसकर प्लेगने वारले, पागे बदलून गेले, आणि वर्तनानेंहि अगदीं बहकले. त्यामुळें या नवीन असंस्कृत, अननुभवी, तरुणांनाच कोणतेंहि काम निघालें म्हणजे वेठीस धरावें लागे. सुदैवानें लोकसंग्रहासारखें प्रकट कामच त्यावेळीं करणें जरूर होतें म्हणून फारशी अडचण किंवा कार्यांत फारसा परस्परविरोध, निर्माण झाला नाहीं. कारण साप्ताहिक गुप्त सभांत तरी, पण जरा जीभ अधिक सैल ठेवून, मनःक्रांतीचें शैक्षणिक कार्यच चालू असे. अिंग्रजी राज्याबद्दल तिरस्कार, द्वेष निर्माण करणें, त्यांच्या अन्यायांचें खत घालून स्वातंत्र्यप्राप्तीच्या कल्पनांचें शेत पिकवणें, अितर परतंत्र राष्ट्रांनीं आपलें गतस्वातंत्र्य कोणत्या मार्गांनीं व साधनांनीं मिळवलें ते अितिहास सभासदांपुढें: व्याख्यानरूपानें मांडणें, अडीअडचणीच्या प्रसंगीं प्रसंगावधान राखून त्यांतून कसें निसटून जावें हें शिकवणें, अेवढेंच मुख्य कार्य मित्रमेळ्याच्या साप्ताहिक गुप्त सभांतून तेव्हां चालत असे. पण तें अुघडअुघड राजद्रोही असे; आणि म्हणून तें गुप्तच करावें लागे. गुप्त व प्रकट अशीं विरोधी कार्यें अेकाच व्यक्तीनें किंवा समुदायानें करणें हें तत्त्वतः चूक खरें. पण पुरेशा संख्याबळाच्या अभावीं, मित्रमेळ्याच्या आरंभकाळांत, तें परस्परविरोधी दिसणारें कार्य सावरकर-मंडळाला करणें अपरिहार्यच होतें. पुढें पुढें जेव्हां गुप्त मंडळाचे सभासद वाढत गेले तेव्हांच या दोन विरोधी कार्यांसाठीं निरनिराळ्या व्यक्तींची योजना करण्यांत आली. त्याला अवधीहि बराच लागला. पण या मध्यंतरींच्या काळांत लोकसंग्रहासाठीं केलेलीं अुत्सव, मिरवणुकी, व्याख्यानें, मेळे, दौरे, ग्रंथप्रकाशनें वगैरे प्रचाराचीं प्रकट कार्यें या मित्रमेळ्याच्या सभासदांनाच करावीं लागलीं. क्रांतीच्या गुप्त कार्याला सभासद मिळवण्यासाठीं हा प्रचार जरी अुपयुक्त झाला तरी तो थोडाफार बाधक झाला हेंहि नाकारतां येत नाहीं. पण परिस्थितीच अशी होती कीं, त्यावेळीं हीं दोन्ही कार्यें अेकाच मंडळाला करणें भाग होतें. त्यांतून सुटकाच नव्हती.

## सुशिक्षितांत प्रक्षोभ

राष्ट्रभक्तसमूह किंवा मित्रमेळा ज्या परिस्थितींत स्थापला गेला ती परिस्थिति मात्र अशी होती कीं, सुशिक्षित तरुणांची मनें प्रक्षुब्धच व्हावींत. चाफेकरांनीं केलेले र्‍यांड-आयर्स्टचे वध हे प्लेगप्रतिबंधक अुपायांच्या नांवाखालीं गोर्‍या सोल्जरांनीं निःशस्त्र आणि असहाय लोकांवर केलेल्या जुलुमाचा धडकबंद प्रतिकारच होता. आणि म्हणून लोकांना चाफेकर हे आदरणीय, पूजनीय वाटूं लागले होते. र्‍यांडच्या वधानंतर हा जुलूम थंडावला, हेंच त्या वधाच्या विजयी सुपरिणामाचें प्रत्यक्ष गमक होतें. त्या वधाच्या निमित्तानें टिळकांवर सरकारनें राजद्रोहाचा खटला भरून त्यांना १८ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा दिली. हा लोकांना जुलूम तर वाटलाच; पण 'वडाची साल पिंपळाला' लावण्याअितकें अिंग्रज सरकार मूर्ख व खुनशी आहे, हेंहि लोकांना समजलें. त्यामुळें विचारी मनें जळफळतच होतीं. मला आठवतें कीं, आमच्या सरकारी हायस्कूलचे मास्तर रा. बेळगांवकर व गद्रे यांनीं, सरकारच्या या असल्या कृत्याबद्दल, अितिहास शिकवतांना, अनेक वेळां जळजळीत राजद्रोहाचे अुद्गार काढले होते. गद्रे मास्तरहि अशाच राष्ट्रीयत्वाच्या गोष्टी मधून मधून आम्हांला सांगत. राष्ट्रीय शिक्षणाबद्दल पुढें १९०५ नंतर जी चळवळ झाली ती योग्यच होती. पण राष्ट्रीय शिक्षण हें गुरुनिष्ठ असतें, केवळ दगडामातीच्या निर्जीव भिंतींतल्या संस्थेंत नसतें, हें या अुदाहरणांनीं आम्हांला सरकारी हायस्कुलांतल्या गुरुजींनींच शिकवलें होतें. असो. या शिकवणीमुळें आम्हीं त्या वेळच्या तरुण मुलांनीं "अैक्यवर्धक संस्था" म्हणून मित्रमेळ्यापेक्षां अेक निराळी संस्थाहि काढली होती. तिच्याहि साप्ताहिक, पाक्षिक बैठकी भरत. त्यांत मी एक निबंध वाचलेलाहि मला आठवतो. मित्रमेळ्याप्रमाणें गणेशोत्सवहि आम्हीं त्या संस्थेमार्फत १–२ वर्षं केला. सारांश अितकाच कीं, सावरकरच काय पण अितरहि शिक्षित गुरुशिष्यांच्या मनांत कालमाहात्म्यानेंच राष्ट्रीयत्वाची ज्योत पेटत होती.

## तरुण क्रांतिकारकांचा संग्रह व शिक्षण

सावरकरांचें व माझें थोडेसें नातें असल्यानें बाबा हे प्रथम आमच्या घरीं येअूं लागले. माझी आअी व त्यांची आअी या आतेमामे बहिणी.

सावरकरांच्या आअीचे वडील लौकरच वारल्यानंतर त्या दोघी माझ्या आजोळींच लहानाच्या मोठ्या झाल्या. त्यामुळें त्या सख्या बहिणीं-प्रमाणेंच वागत. सावरकरांची आअी वारल्यानंतर माझी आअी अवढीच त्यांना मावशी अुरली. म्हणून नाशकास त्यांनीं बिऱ्हाड केल्यावर अधूनमधून ते आमच्याकडे येअूं लागले व आमचा घरोबा वाढला. १९०१ पर्यंत बाबाहि मित्र-मेळ्यांत फारसें लक्ष घालीत नसत. पण या सुमारास त्यांचें मत निश्चित बनत चाललें होतें. तात्यांचें अगोदरच ठाम ठरलें होतें. त्यामुळें होतकरू तरुण मुलें दिसलीं कीं, राजकीय स्वातंत्र्याच्या, देशाभिमानाच्या, गोष्टी सांगून ते अशा मुलांना मित्रमेळ्याचे सभासद करून टाकीत. १९०१ च्या सुमारास तात्यांचें लग्न झालें तेव्हां सावर-करांचा वऱ्हाडी म्हणून मी होतों. त्यावेळीं केव्हांतरी तात्यांनीं मला मित्र-मेळ्याची दीक्षा दिली. त्यावेळच्या कांहीं साप्ताहिक गुप्त बैठकींना मी अुपस्थितहि होतों. म्हसकर पागे गेल्यानंतर, आणि राष्ट्रभक्तसमूह व मित्र-मेळा यांचें "लोकसंग्रह व राजकीय शिक्षणानें मनःक्रांति" हेंच कांहीं काल मुख्य प्राथमिक अुद्दिष्ट ठरल्यानंतर, दोन नांवांच्या दोन संस्थांची गरज फारशी अुरली नव्हती. त्यामुळें राष्ट्रभक्तसमूह हें नांवहि विसरून जाअूं लागलें होतें. आणि "मित्रमेळा" हेंच प्रचलित नाणें वापरण्यांत येअूं लागलें होतें. १९०१ सालीं म्हणजे मित्रमेळ्याच्या पहिल्याच वर्षी त्याच्या-तर्फे पुण्याच्या धर्तीवर गणेशोत्सव साजरा झाला होता. श्रीशिवाजी महा-राजांचा अुत्सवहि दुसऱ्या वर्षी मित्रमेळ्यानें मोठ्या थाटानें साजरा केला. या दोन्ही अुत्सवांमुळें मित्रमेळ्याचें नांव नाशकास सर्वतोमुखीं झालें.

मित्रमेळ्याच्या साप्ताहिक गुप्त बैठकी कोणाच्या तरी घरीं प्रारंभीं भरत. नंतर धोंडभट विश्वामित्रांच्या घरांत राहणारे गोविंदराव दरेकर, गोविंद कवि, हे शपथबद्ध सभासद झाल्यावर त्यांच्या घरींच त्या नित्यनेमानें भरूं लागल्या. हिंदुस्थानचे पराक्रमी वीर, स्वातंत्र्यसंपादक श्रीशिवाजीमहाराज, राणा प्रताप, बंडवाले नानासाहेब व तात्या टोपे, वासुदेव बळवंत फडके आणि श्रीकृष्ण, श्रीराम यांसारख्या देवदेवतांच्या चित्रांनीं सभास्थान शृंगारलेलें असे. पाळीपाळीनें कोणी तरी एक विषय अभ्यासून तो मांडावा व नंतर त्यावर सभासदांनीं चर्चा करावी, असा साप्ताहिक शैक्षणिक

कार्यक्रम अखंड चालू होता. हेतु हा कीं, मित्रमेळ्याच्या सभासदांना प्रचारकार्य करण्यासाठीं अनेक विषयांचें, वक्तृत्वाचें, वादविवादाचें, समयसूचकतेचें, सभाधीटपणाचें, लोकसंग्रहाचें, शिक्षण मिळावें; अनेक देशांनीं केलेल्या स्वातंत्र्ययुद्धाचें व त्यासाठीं लागणाऱ्या संघटना, काटकपणा, निष्ठा, स्वार्थत्याग, शिस्त, त्याग, प्रसंगावधान, साहस या गुणांचें संवर्धन त्यांनीं करावें; आणि अशा रीतीनें मित्रमेळ्याचा सभासद बुद्धीनें, मनानें आणि शरीरानें सर्वतोपरी स्वातंत्र्ययुद्धाच्या कामीं लायक पुढारी व सैनिक बनावा. अपेक्षेप्रमाणें सर्वच सभासदांना जरी हे गुण संपादतां आले नाहींत तरी त्या काळच्या अितर लोकांपेक्षां मित्रमेळ्याचा सामान्य सभासद हा या साप्ताहिक बैठकींतल्या नुसत्या श्रवणभक्तीनें, वादविवादांत किंवा अितर बाबतींत, सहजच सरस ठरे. आमच्यापैकीं पुष्कळांना समयसूचकता, साहस, बहुश्रुतपणा, वक्तृत्व, वादकुशलता, लेखनकौशल्य, सभाधीटपणा या गुणांचें शिक्षण या शाळेंतच मिळालें. आणि त्यामुळें आयुष्यांत सर्वांनाच, शाळांतून किंवा अन्यत्र न मिळणाऱ्या, या शिक्षणानें फारच फायदा झाला. मित्रमेळ्याचा व नंतरच्या अभिनव भारताचा हा कटाक्षच होता कीं, शाळा-कॉलेजांत काय किंवा अितरत्र काय, त्याच्या सभासदांनीं शक्य तर पहिल्या किंवा निदान दहा क्रमांकांत तरी वर्गात असलेंच पाहिजे. देशभक्ति म्हणजे गांवगुंडांचा अखेरचा आश्रय ( Patriotism is the last refuge of a scoundrel ) हें जें जॉन्सनचें वाक्य त्याला मित्रमेळ्याचे सभासद अपवादच ठरले पाहिजेत, असा आमचा निर्धार होता.

## अभिनव भारतांतील प्रसिद्ध व्यक्ति

या बौद्धिक अुत्कर्षाच्या नियमानुसार बऱ्याच सभासदांनीं आपापल्या परीं विविध क्षेत्रांत कोणतें ना कोणतें तरी मानाचें, विद्वत्तेचें, स्थान पटकावण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांतलीं कांहीं नांवें येथें देतों :– स्वातंत्र्यवीर व त्यांचे दोघेहि बंधु सावरकर, स्वातंत्र्यशाहीर कै. गोविंद कवि, वैद्यभूषण कै. वामनशास्त्री दातार, वैद्यरत्न विष्णुशास्त्री केळकर, बडोद्याचे वकील व ज्योतिषाचार्य दाजी नागेश आपटे, सेवाग्रामचे आचार्य काका कालेलकर, १९४६–४७ तले कॉंग्रेसचे अध्यक्ष किरपालानी, मुंबईचे पंतप्रधान बाळासाहेब खेर, फर्ग्युसन कॉलेजचे कै. प्रो. डॉ. गुणे, जुनागड कॉलेजचे प्रो. एच्. बी. भिडे,

अमळनेरचे चिंचाळकर व पाठक वकील, साताऱ्याचे डॉ. आठल्ये, बाला-घाटचे: खाडिलकर वकील, खामगांवचे खोपकर वकील, सॉलिसिटर थत्ते, डॉ. थत्ते, बडोद्याचे कै. प्रो. केतकर, सरदार आबासाहेब मुजुमदार, कै. डॉ. आठवले, पुण्याचे कै. श्री. शि. परांजपे वकील, जुन्नरचे वकील ग. वा. जोगळेकर, अुमरावतीचे माजी मंत्री ना. बाबासाहेब खापर्डे, नागपूरच्या लॉ रिपोर्टरचे रा. चितळे, तेथले अॅडव्होकेट, कै. वि. वि. केळकर, नाशिकचे श्री. र. वर्तक वकील, महाबळ गुरुजी, श्रीकिसन तिवारी, हरिजनसेवक काकासाहेब बर्वे, कै. वामनराव खरे, दादासाहेब गद्रे, गोसावी, भाअूसाहेब अकूत वकील, सोलापूरचे रा. मोहोळकर, अंत्रोळीकर, खडकीकर व केळकर वकील, व रा. लिमये, ठाण्याचे अेंजिनिअर घाटे, पंजाबचे सर शिकंदर हयातखान, जबलपूरचे बॅ. ग्यानचंद वर्मा, मद्रासचे व्ही. व्ही. अेस्. अय्यर, पिले व डॉ. राजन्, गुरुकुल हृषीकेशचे महेश चरणसिंह, बॅ. मिर्झा अबास, मुंबअी कॉर्पोरेशनचे अन्यालिस्ट कै. डॉ. जोशी, बॅ. भेदवार, आफ्रिकेंतले बॅ. फडके व पाथर अशीं शेंकडों नररत्नें मित्रमेळा किंवा अभिनवभारताच्या छत्राखालीं येअून, सुसंस्कृत होअून, हिंदुस्थानांत माननीय म्हणून गणली गेलीं किंवा जात आहेत. कालौघाप्रमाणें कित्येकांचीं मतें बदललीं आणि कार्यक्षेत्रेंहि विविध ठरलीं. तरी या सर्व देशभक्तांनीं देशसेवेचें कंकण जें 'अभिनव भारता'ची शपथ घेअून बांधून घेतलें, तें आजवरहि सुटलें नाहीं. मित्रमेळा किंवा अभिनवभारत या संस्थांना याबद्दलचा अभिमान व गौरव वाटला तर त्यांत नवल तें कसलें ?

### मरावें परी किर्तिरूपें नुरावें !

मित्रमेळ्याच्या साप्ताहिक गुप्त बैठकींतल्या व्याख्यानचर्चांचें मासिक समालोचन प्रारंभीं कांहीं काळ तरी करण्यांत येत असे. चिटणीसांनीं तें लिहून वाचावें, आणि सभासदांच्या गुणंदोषांचीहि चर्चा त्या प्रसंगानें करावी, असा प्रघात होता. बरेंच महिनेपर्यंत हा रिवाज चालू होता. आणि त्या मासिक समालोचनांचें दप्तरहि बरेंच मोठें झालें होतें. पुढें पोलिसांच्या हातांत हे गुप्त दप्तर पडेल अशा भीतीनें त्याचाहि नाश नंतर करण्यांत आला. ज्या राजसत्ते-विरुद्ध क्रांति करावयाची तिला प्रत्यक्ष लेखी पुरावा आपल्याविरुद्ध मिळूं नये म्हणून प्रत्येक देशांतल्या राज्यक्रांतिकारकांना आपापल्या कृत्यांचा व विचारांचा लेखी पुरावा असाच नष्ट करावा लागला आहे. आणि म्हणूनच कोणत्याहि

राज्यक्रांतीचा संपूर्ण अितिहास हा नेहमीं अलभ्यच असतो. गुप्त क्रांतिकारक संस्थांची व व्यक्तींची ही अैतिहासिक व अैच्छिक जलसमाधीच होय. आणि याचें कारण प्रकट आणि गुप्त कार्य अेकाच क्रांतिकारक व्यक्तीनें किंवा समूहानें करूं नये, हें जसे कार्यसुरक्षिततेच्या दृष्टीनें अवश्य, तसेंच आपल्या हातानें लेखी पुरावा न ठेवणें हेंहि गुप्ततेच्या, सुरक्षिततेच्या आणि कार्यसिद्धीच्या दृष्टीनें अवश्य. त्यामुळें वैयक्तिक किंवा सामुदायिक महत्त्वाकांक्षेचा व कार्यप्रसिद्धीनें मिळणाऱ्या कीर्तीचा चक्काचूर होतो ही गोष्ट खरी. पण त्याला अिलाज नाही. "मरावे परी कीर्तिरूपें अुरावें" हा मनुष्यस्वभाव असला तरी असल्या कार्यांत "मरावे परी कीर्तिरूपे नुरावे" हाच अुलट दंडक असतो. मनुष्य अेकवार प्राणत्यागहि सुखानें ध्येयासाठीं करील, पण कीर्तीचा त्याग करणें हा महत्तम त्याग आहे. तो करणारीं माणसें फारच थोडीं असतात. कीर्तिलोलुप असणारेच पुष्कळ. आणि आम्हांला ही कीर्तिलोलुपताच कशी नडली, याचें वर्णन पुढें येअीलच.

### मित्रमेळ्याची प्रगति

यानंतर पुन्हा आपण १९०२ च्या कालाकडे वळूं. मित्रमेळ्यांत आतां बरेच नवे तरुण सभासद झाले होते. त्यांत शंकरराव वाघ आणि गणपतराव व गंगाराम मगर हे तिघे न्हावी होते. तुकाराम खाडे, शंकरगीर गोसावी, खुशालसिंग, गोपाळसिंग, व देवीसिंग परदेशी, सखाराम सरोदे, गणपतराव ओक, पुढें सबजज्ज झालेले बाळकृष्णपंत गोडबोले, सखारामपंत गोऱ्हे, विष्णुशास्त्री केळकर, जयवंत, खोपकर, काशीकर, बाबासाहेब खरे वकील, माधवराव गाडगीळ, दामूअण्णा चंद्रात्रे, आबा गायधनी वगैरे मंडळी प्रमुख होती. शंकरराव वाघ हे आपल्या धंद्यांत फारच कुशल असल्यानें त्यांना श्रीसयाजीराव गायकवाड या बडोदानरेशांनी, "व्हीं फ्युझाअील" या मुंबअींतल्या अिटालियन कंपनींत शिकवावयाला ठेवून, त्यांना आपल्या धंद्यांत तरबेज केलें, व नंतर आपल्याजवळ ठेवून घेतलें! श्मश्रुकाराच्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें हे श्रीसयाजीमहाराजांपर्यंतहि कधीं कधीं मित्रमेळ्याच्या गोष्टी हळूच पोहोंचवीत. पण हे लौकरच कालवश झाले. दुसरे आमचे सभासद गणपतराव मगर यांनीं पळण्याची संवय अितकी केली कीं, ते नाशिक ते त्र्यंबक मधलें १९ मैल अंतर १। तासांत तोडीत व त्याच द्रुतगतीनें परतहि

येत. कोणत्याहि अडीअडचणीच्या कामाला त्यांचा या दृष्टीनें फारच अुपयोग होअी. बुवा गोसावी, खुशालसिंग, खाडे, सरोदे, देवीसिंग हीं माणसें अत्यंत विश्वासू, कर्तबगार व अेकनिष्ठ होतीं. त्यांच्या अंगावर कोणतेंहि काम सोंपवा कीं तें झालेंच म्हणून समजावें, अितके ते कार्यतत्पर होते. त्यांतहि देवीसिंगांच्या नेतृत्वाखालीं अेक तालीम असल्यानें ते वस्ताद म्हणून बरेच अुपयोगी पडत. दांडपट्टा, लाठीकाठी वगैरे मर्दानी खेळांत हे लोक प्रवीण होते. आणि जुनीं हत्यारें – बंदुका, तरवारी, जंबिये, भाले वगैरे – मोठ्या प्रमाणावर गोळा करण्याचाहि यांनीं धंदा चालविला होता. अितर सभासदहि मिळेल तेथें खाजगी किंवा सरकारी नोकरी करून बाकीचा वेळ पडेल त्या देशकार्याला देत. बाबासाहेब खरे हे नाशकांतले त्यावेळचे नामांकित वकील व पुढारी. त्यांच्या वशिल्यानें नंतर दादासाहेब गद्रे, भाअूसाहेब अकूत हेहि प्रसिद्ध वकील मित्रमेळ्याचे शपथबद्ध सभासद झाले. अशा रीतीनें हळूहळू मित्रमेळ्याचें बस्तान खालच्या व वरच्या थरांत बसत चाललें होतें; आणि त्यामुळें त्याच्या बाह्य प्रचारकार्याला बाळसेंहि चांगलें चढलें.

### अिंग्रजांची नोकरी, नव्हे नाकेबंदी व हेरगिरी

आमच्यापैकीं रामभाअू दातार, त्र्यंबकराव वर्तक, सखारामपंत गोऱ्हे, हरि अनंत रिसबुड, लक्ष्मणराव डांगे, सखारामपंत सरोदे, गणपतराव ओक वगैरे कांहीं मंडळी सरकारी नोकरींतहि होती. राजकीय चळवळ, आणि तीहि अिंग्रज राज्यकर्त्यांना सिंहासनावरून खालीं ओढणारी चळवळ, अिंग्रज सरकारच्या नोकरांनीं करणें हें थोडें अवघड होतें. पण तें पोटासाठीं करणें भाग होतें.

मागें सांगितलेंच आहे कीं, "राष्ट्रभक्त-समूहाचे" तिघांपैकी दोन अुत्पादकच सरकारी नोकर होते. पुढें अनेक सभासदांना पोटाकरितां सरकारी नोकऱ्या धराव्या लागल्या. अुलट कांहीं सरकारी नोकरच या राजद्रोही संस्थेचे सभासद झाले. जसजसें राजकीय चळवळीचें तारूं मवाळांच्या राजनिष्ठेच्या किनाऱ्यावरून, राजद्रोहाच्या सागरांतून, राज्यक्रांतीच्या अुद्दिष्टाकडे चालूं लागलें, तेव्हां सरकारी अधिकाऱ्यांनीं 'सरकारी नोकरांनीं कोणत्याहि राजकीय चळवळीशीं संपर्क ठेवूं नये' असे सक्त नियम केले. राजकीय विषयांचा वाग्

असलेल्या साध्या सभांना सुद्धां हजर राहूं नये, राजद्रोही वृत्तपत्रें घेअूं नयेत, असे हुकूम फर्मावले गेले. चोरूनमारून, किंवा चुकूनमाकून, अेखाद्या अशा सभेला हजर राहणारांविरुद्ध कडक अुपाय योजण्यांत आले. कोणी बडतर्फ झाले, कोणाची बहाली-बढती रद्द झाली, कोणाला सक्तीनें निवृत्त करण्यांत आलें, कोणाचें निवृत्तवेतनहि खालसा झालें. अशा अनेक शिक्षांच्या कांटेरी लगामांनी सरकारी नोकरांना मारूनमुटकून राजनिष्ठ बनवण्याचा सपाटा सुरू झाला. त्यामुळें राजकीय चळवळींत, आणि तेंहि राजद्रोही चळवळींत, गुप्तपणे शिरलेल्यांना मोठाच पेंच पडला. अिंग्रजांच्या नोकरी-शिवाय अुदरभरणाची सोय नाही, आणि राष्ट्रसेवेशिवाय मनाचें समाधान नाहीं; व्यक्तीच्या संसारासाठीं राजसेवा व राष्ट्राच्या संसारासाठीं राजद्रोह, असा हा नित्य व्यवहारांतला, पण कांहींसा नैतिक विरोधाचा भास अुत्पन्न करणारा, प्रश्न होता. दुर्बल, भेकड मनाच्या कैक लोकांना त्यानें भेवडावून टाकलें आणि राष्ट्रसेवेपासून सपशेल परावृत्त केलें. अर्थात् परस्परविरोधी दिसणाऱ्या या व्यवहारांत फार सावध, खंबीर, व तारेवरची कसरत करण्या-अितकीं दक्ष व कुशल माणसें ही थोडींच असणार. पण तींच आम्हांस हवीं होतीं. सरकारच्या गोटांत नाकेबंदी हेरगिरी करणारे देशसेवक हे प्रत्येक देशाला हवेच असतात. तसेच हे होते. आणि केवळ या हेरगिरीच्या भूमिकेवरून पाहिलें तरी आम्हांस आमचीं विश्वासू माणसें सरकारी नोकरींत मुद्दाम पेरणें, किंवा अगोदरच सरकारी नोकर असलेल्यांना आमच्यांत ओढणें, हें प्राप्त कर्तव्यच होतें. याचा फायदा कसा झाला याचीं कांहीं अुदाहरणें पुढें येतीलच.

## मित्रमेळ्याचें प्रचारकार्य

असो. अशा रीतीनें आमच्या संस्थेंत शेंकडों लोक गोंवले गेले. त्यांत सरकारी नोकर, तरुण विद्यार्थी व अठरापगड जातींचे लोक होते. सावर-करांचे व गोविंद कवींचे पोवाडे, मेळे, मेळ्यांतील पदें, व्याख्यानें, अैतिहा-सिक, व स्वराज्यसंपादक व रक्षक विभूतींचें अुत्सव, मिरवणुकी, सभा, या प्रचाराच्या साधनांनीं नाशिक शहर १९०१ ते १९०८ पर्यंत सारखें गरजलें होतें. त्यांतहि वंगभंगाच्या चळवळींत प्रसृत झालेल्या राजकीय चतुःसूत्रीचा — स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण यांचा — प्रचार सर्व हिंदुस्थानभर

दुमदुमला. मित्रमेळ्यानें १९०७ मध्यें त्यातहि लक्ष घालून, वामनराव खरे वकील व दातार शास्त्री यांना सर्व जिल्हाभर दौरे काढावयास लावून, व्याख्यानें देऊन सर्व जिल्हा हलवून सोडला. कै. बाबासाहेब खरे व दातार शास्त्री यांची ही कामगिरी अत्यंत प्रभावी झाली. या सर्व प्रचारकार्यांचे सूत्रधार बाबा सावरकर हेच असत. स्वतः प्रसिद्धिपराङ्मुख राहून त्यांनीं १९०२ ते १९०९ पर्यंत अभिनव भारताच्या प्रत्येक चळवळींत तनमनधन वेंचलें. १९०९ मध्यें जन्मठेपीच्या शिक्षेनंतर अंदमानांतहि जसे ते देश-हितार्थ झिजले तसेच रात्रंदिवस ते या स्वातंत्र्ययज्ञांत आपल्या प्राणांची कणशः क्षणशः आहुति टाकीत होते.

त्यांच्याबरोबरच आमचे पांगळे कवि गोविंदराव दरेकर यांनीहि या रणयज्ञांत उडी घेतली होती. त्यांनीं काव्यप्रतिभेच्या जोरावर तरुणवर्गावर आपल्या पदांनीं अितकी मोहनी घातली होती की, नाशिक हायस्कुलांतील व मराठी शाळांतील मुले त्यांची देशभक्तिप्रचुर काव्यें रात्रंदिवस गुणगुणत असत. आमच्या मित्रमेळ्यांतील गोविंदांची पदें पुण्यास लोकमान्य टिळक व काळकर्ते परांजपे यांनीहि मुक्तकंठानें प्रशंसिलीं होती. खुद्द श्रीशिवाजी अुत्सवाच्या वेळीं, निमंत्रणावरून, रायगडावरहि या मेळ्याच्या मुलांनीं आपल्या स्वातंत्र्यगानाचा नजराणा अर्पिला होता व अखिल महाराष्ट्राचें मन आकर्षून घेतलें होतें.

## मित्रसमाज

हीं पदें म्हणणारीं मुलें हायस्कुलांत अुच्च वर्गांत शिकत होतीं. शिवाय मित्रमेळ्याच्या धर्तीवर त्यांनींहि आपापल्या वर्गांतल्या तरुणांची गुप्तसंस्था 'मित्रसमाज' या नांवानें काढली होती. त्यांपैकींच आज प्रौढ झालेले रा. श्रीधरपंत वर्तक, वकील, लिहितात कीं, "मित्र-मेळ्याच्या धर्तीवर नाशिक हायस्कूलमधील प्रत्येक वर्गांत अशी गुप्त संस्था काढावी, असें आमच्या मनानें घेतलें; बाळ (आतां कै. डॉक्टर) सावरकर व (आतां कै.) दत्तू केतकर (नंतर बडोद्यास प्रोफेसर झालेले) यांनीं त्यांच्या वर्गांत त्याप्रमाणें गुप्त संस्था काढल्या. मीहि रा. (आता कै. बापूराव खरे, नंतर अिंपीरिअल सेक्रेटरीअेटमध्यें असलेले), बा. ज. मराठे, चितळे (पोस्टल सुपरिंटेंडंट), दीक्षित, बर्वे यांच्या सहकार्यानें अेक गुप्त संस्था

काढली." या सर्व गुप्त संस्थांचा मेळावा म्हणजेच मित्रसमाज होता. त्यावेळीं हायस्कुलांत असलेल्या ३०० मुलांपैकीं हीं शेंदीडशें तरुण मुलें दांडपट्टा, तरवार, बोथाटी, फरीगदगा, कुस्ती वगैरे शारीरिक शिक्षण नियमानें घेत. शिवाय रात्रीं-बेरात्रीं किल्ल्यावर, अरण्यांत, मैदानावर, लटकी लढाअीहि खेळत. त्यांच्या या शिक्षणासाठीं बडोद्याहून प्रो. माणिकरावांनीं अिब्राहिमभाअी म्हणून अेक मल्लविद्याविशारद पाठवला होता. त्यानें आपली कामगिरी चोख बजावली होती. नाशिक शहरांतल्या अुच्च वर्गांतले सुशिक्षित तरुण हे याप्रमाणें कोठें ना कोठें तरी अभिनव भारताच्या कक्षेखालीं आले होते. यांतच पुढें खुनासाठीं फांशी गेलेले हुतात्मे कृष्णाजी गोपाळ कर्वे व विनायक नारायण देशपांडे हेहि होते. आणि राज्यक्रांतीच्या कटांत गोवले गेलेले अनेक तरुण – पुरुषोत्तम लक्ष्मण दांडेकर (५ वर्षे शिक्षा झालेले), सदाशिव दांडेकर, गोपाळ गोविंद धारप (३ वर्षे शिक्षा), शंकर रामचंद्र सोमण (जन्मठेप शिक्षा), काथे, मनोहर अंबेडकर, व अितर होते. (वर्तक व धारप यांच्या लेखांवरून).

मित्रमेळ्याच्या धर्तीवर नाशकास स्त्रियांनींहि एक समाज स्थापला होता; पण तो फार दिवस टिकला नाहीं. मित्रमेळा किंवा अभिनव भारताचा हा कटाक्ष असे की, शक्यतों शाळाकॉलेजांतले भावी तरुण आपल्या कक्षेंत, चांगले परीक्षून, ओढावेत. कारण हेच पुढें राष्ट्राच्या स्वातंत्र्यसंग्रामांतले नेते, सैनिक, किंवा सहानुभूतिक होणार. म्हणून विद्यार्थी, शाळामास्तर, प्राध्यापक यांच्यावर क्रांति-विचारांचें जाळें टाकण्यांत येअी. आणि परिस्थितीच अशी होती कीं, अिंग्रजांविरुद्ध सुशिक्षित समाजांत धुमसत असलेल्या असंतोषाला क्रांतिकारक विचारांचें अिंधन मिळालें कीं, तें क्रांतीची ज्योत भडकवूनच अुठे. म्हणून मराठी-अिंग्रजी शाळांतले प्रौढ विद्यार्थी व शिक्षक, आणि कॉलेजांतले तरुण विद्यार्थी ह्यांच्यांतूनच आमचे 'रंगरूट' मिळत. शाळा, हायस्कुलें, व कॉलेजें ह्या आमच्या मोक्याच्या जागा. तसेंच सरकारी नोकरांपैकीं पोलीस, न्यायखातें, तारखातें, लष्कर, तुरुंग, रेल्वे वगैरे खात्यांतूनहि अभिनव-भारतांत शक्य तर भरती करावी, किंवा अुलट अभिनव-भारतीयांनीं त्या मुख्य मोक्याच्या खात्यांत शिरावें, व अभिनव-भारताला शक्य ती माहिती पुरवावी, आणि ती

खातीं शक्य तेवढी आत्मसात् करावीं, या प्रयत्नांना बरेंच यश येत चाललें होतें. आमच्याप्रमाणेंच विचारसरणी असणारे अितर विचारी सुज्ञ तरुण याप्रमाणेंच वर्तत होते. अभिनव-भारताशीं समांतर चाललेल्या बंगाल, पंजाब, व महाराष्ट्रांतल्या अितर संस्था हाच कार्यक्रम आंखून तो अमलांत आणीत होत्या. अर्थात् प्रत्येक संस्था गुप्तपणें आपापलें कार्य करीत असल्यानें अेक-मेकांची माहिती अेकमेकांना फारशी नसे; पण कार्य मात्र तेंच चाले.

## मुख्य प्रकट कार्यें

वर निर्दिष्ट केलेल्या रिक्रूट-भरतीच्या कामीं प्रकट कार्य करावेंच लागे. मित्रमेळ्यानें (नंतर अभिनव भारतानें) त्यासाठी सभा, व्याख्यानें, प्रकाशनें, अुत्सव, मेळे हे कार्यक्रम ठरवले होते. आमच्या आधींच हे अुत्सव लो. टिळकांनीं दूरदर्शीपणानें सुरू केले होते. त्या प्रसंगीं आम्ही नाशकास दरवेळीं बाहेरच्या कोणा ना कोणा तरी प्रसिद्ध देशभक्तांना व्याख्याना-साठीं बोलवीत होतों. नाशकास तदर्थ वाअीचे काशिनाथशास्त्री लेले ("धर्मा"चे संपादक), धुळ्याचे समर्थभक्त शंकरराव देव, दिल्लीचे सय्यद हैदर रेझा, पुण्याचे देशभक्त काळकर्ते अण्णासाहेब परांजपे, लोकमान्य टिळक यांना व्याख्यानासाठी आम्ही बोलावलें होतें. बाबा सावरकरांच्या चरित्रांत त्यांचें वर्णन आढळेल. धर्मकार लेलेशास्त्री यांना केवळ बाबांनीं ते धर्मिष्ठ म्हणूनच बोलावलें होतें. आणि ते शास्त्रीहि अेवढे कर्मठ की त्या वेळीं (१९०३।४ साल असेल) वाअीहून नाशकास येतांना ३६ तासांच्या प्रवासांत, आगगाडीत पाणी पितांना पाण्यास अब्राह्मणांचा स्पर्श होअील या भीतीनें, शास्त्रीबोवा पाणीहि प्यायले नाहींत! अर्थात् बाबांव्यतिरिक्त आम्हां अितरांना अितका कर्मठपणा आवडला नाहीं. आणि शास्त्रीबोवा आपला हा सनातनी पराक्रम मिटक्या मारून वर्णन करीत असतां आम्ही सर्व कुचेष्टेनें हंसत होतों! विनायकराव सावरकरांनीं तर शास्त्रीबोवांची थोडीफार कुचाळीहि केली; पण बाबांच्यासाठीं नंतर आम्ही तें आवरते घेतलें. पुढें बाबांनीच हे असले सनातनी विचारहि सोडून दिले. ते अितके कीं, नंतर त्यांना गण-पति-अुत्सवांत, हिंदु-मुस्लिम-अैक्य दर्शविण्यासाठीं, आणि त्या अुत्सवाचा केवळ राजकीय हेतु प्रस्थापण्यासाठीं, सय्यद हैदर रेझा हे मुसलमान पुढारीहि पसंत व पचनीं पडूं लागले. असो. या दोन टोकांशीं असलेल्या या पुढाऱ्यांनीं

देशभक्तीचा संवादी सूर मात्र आपापल्या व्याख्यानांतून काढला होता. आणि जनसमूहालाहि हे अुत्सव राजकीय क्रांतिप्रवण आहेत हें, या हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांच्या गणेशोत्सवांत झालेल्या व्याख्यानांनीं, पटलें होतें. या सर्व पुढाऱ्यांच्या व्याख्यानांतून 'स्वातंत्र्य' हा शब्द, ही कल्पना, ध्वनित सूचित केली जाअी. स्पष्टपणें ती बोलण्याची सोयच तेव्हां नव्हती. दे. भ. शंकरराव देवांनीं आपलें ध्येय हे 'अनिर्वाच्य', पण सर्वांना माहीत आहे असें आहे, असें त्याचें वर्णन केल्याचे मला अजून आठवतें. अण्णासाहेब परांजप्यांचीं व्याख्यानें तर त्यांच्या अत्यंत सुंदर वक्रोक्ति, व्याजोक्ति, अुपहास, अुपरोध वगैरे अप्रतिम काव्यगुणसमुच्चयानें अितकीं लोकप्रिय झालीं कीं, त्यांच्या व्याख्यानांना हजारों लोकांचा समुदाय जमत असे. आणि ३-३ तास तो चित्रासारखा तटस्थ राही. त्यांच्या 'काळां'तल्या लेखांनीं, व या असल्या वक्रोक्ति व अुपहासपूर्ण व्याख्यानांनीं, अिंग्रज सरकारचें कातडें सोलल्याप्रमाणें होअी. अिंग्रज अधिकारी जळफळत, पण त्यांचा अिलाज नसे. हिंदी अधिकारी मात्र मनांतल्या मनांत खूष असत पण वरकरणीं दाखवीत नसत. शिवाय मराठी लघुलेखकहि फारसे नसल्यानें सरकारला काय किंवा परस्थांना काय, असल्या ज्वलंत व्याख्यानांच्या सारांशाच्या ताकावरच आपली तृप्ति करून घेणें भाग पडे. शिवरामपंतांचीं सर्व व्याख्यानें जर मराठी लघुलेखकांनी टिपून प्रसिद्ध केलीं असतीं तर वक्तृत्वकलेंत प्रतिभेचा पूर्ण विलास व नवविकासच दृष्टीस पडला असता.

टिळकांच्या व्याख्यानासंबंधानें बोलणें, लिहिणें म्हणजे सूर्याला निरांजन दाखवणेंच होय. जनतेवरचा त्यांचा पगडा अलौकिक होता. ते म्हणतील ती पूर्व दिशा अशी लोकांची भावना होती. त्यांच्या व्याख्यानांच्या परिणामांबद्दल मीं काय व किती लिहावे? आमच्या अुतास चाललेल्या घाअीला त्यांनींच १९०६मध्यें त्याचवेळीं पायबंद घातला होता. त्यांच्या मार्गदर्शनासाठीं आम्ही अेक गुप्त बैठक घेतली होती. त्यांत त्यांनीं सांगितलें होतें कीं, " आम्हीहि अशा गुप्त चळवळी, शस्त्रास्त्रांची जमवाजमव, केली होती. तुम्ही अुतावळेपणानें फार घाअी करूं नका. कार्य योग्य आहे. पण धिमेपणानें शिस्तीनेंच चला. "

## वार्षिक वा अर्धवार्षिक बैठकी-संमेलनें

प्रतिवर्षी अेकदां किंवा दोनदां निवडक प्रतिनिधींची गुप्त षाण्मासिक वा वार्षिक बैठक कोणत्या तरी ठिकाणी आम्ही भरवीत होतों. अुद्देश हा कीं, वर्षांत झालेल्या कार्याचा आढावा काढतां यावा, नव्या योजना आंखतां याव्या, आणि कोठें अडचणी व चुका होत असतील तर त्या कशा दुरुस्त कराव्या, हें ठरवतां यावें. नव्या निवडक शपथबद्ध सभासदांची दाट मैत्री व्हावी हाहि अुद्देश सांगावयास नकोच. पहिली बैठक १९०३ मध्यें धुळ्यास रा. रणदिवे वकील यांच्या घरी आम्हीं भरवली. त्यांचे बंधु व ते आमच्या संस्थेंत होते. या सभेस वऱ्हाडांतले वीर वामनराव जोशी, बाबासाहेब खापर्डे, पृथ्वीराज व्यास, सदाशिवराव बल्लाळ, रा. पांडे वगैरे मंडळी हजर होती असें आठवते. पुणें, नाशिक, कोठुरें, त्र्यंबक, भगूर वगैरे ठिकाणचे ६०–७० निवडक सभासद अुपस्थित होते. फर्ग्युसन कॉलेज आणि डेक्कन कॉलेज, व धुळ्याचें ट्रेनिंग कॉलेज यांतले बरेच सभासद होते. पहिलीच बैठक ही असल्याने अेकमेकांच्या कार्याचा आढावा घेण्यापलीकडे आणि परस्पर विचारविनिमयापेक्षां अधिक कांही कार्यक्रम नव्हता. तरी तो पार पाडावयास दोन दिवस लागले.

## मित्रमेळ्याचें ' अभिनव भारत ' झालें

नंतर १९०४ मध्यें आम्ही नाशकासच, मी रहात होतों त्य भागवतांच्या वाड्यांत, जमलो होतों. दोनशें प्रतिनिधि सभासद अजमासें असतील. त्याच सभेंत मित्रमेळ्याचें नवें नामकरण ' अभिनव भारत ' हें झालें. अिटलीच्या ' तरुण अिटली ' या माझिनीच्या संस्थेची हकीकत सांगून त्या धर्तीवर आपण ही काढीत आहों, असें विनायकराव सावरकरांनीं सांगितलें. अितरहि वक्त्यांनीं ज्वलज्जहाल भाषणें करून सशस्त्र क्रांतीची आवश्यकता पटवली. या सभांस मुंबअी, पुणें, सोलापूर, खानदेश, वऱ्हाड व अितर जिल्ह्यांतील प्रतिनिधि आले होते. १९०५ मध्यें कोठुऱ्यास हा वार्षिक मेळावा भरला होता. १९०६ मध्यें मुंबअीस शीव येथें खिमजी आसरवीरजी यांच्या बंगल्यांत ही बैठक भरवली होती. १९०७ मध्यें सुरतेस कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या निमित्तानें आम्ही जमलों होतों. त्यापूर्वी मी व बाबासाहेब खरे वकील असे १९०६ च्या डिसेंबरांत कलकत्त्यास कॉंग्रेसच्या बैठकीस गेलों होतों, आणि

तेथल्या गुप्त मंडळ्यांशीं संधान जमवून आलों होतों. अनुशीलन समिति, स्वाधीन भारत वगैरे संस्थांच्या प्रमुखांशीं ५।६ दिवस वाटाघाटी केल्या व सर्वांनीं मिळून, अेकाच वेळीं, हिंदुस्थानांत सशस्त्रक्रांतीची अुठावणी करावी, अगोदर कांहीं करूं नये, असें ठरवून आलों होतों. बाबांनीं त्यांचे एक मित्र सदाशिवराव ( अिष्टंगुंड्र ) यांनाहि बंगाल्यांत पाठवलें होतें. बंगाली पुढाऱ्यांपैकीं बरेच बॅरिस्टर, वकील, डॉक्टर वगैरे सुशिक्षित मंडळी गुप्तपणानें या कार्यास बरीचशी मदत करीत होती. ही मंडळी १९०७ च्या सुरतेच्या कॉंग्रेसच्या अधिवेशनास आली होती. म्हणून त्यांच्या पुनर्भेटीसाठीं आम्ही सुरतेस मुद्दामच गेलों होतों. तेथल्या गुप्त बैठकींत २–३ शें माणसें निरनिराळ्या प्रांतांतलीं आलीं होतीं. सुप्रसिद्ध बाबू अरविंद घोष, त्यांचे बंधु बारिंद्रकुमार घोष वगैरे प्रसिद्ध क्रांतिकारक तेथें जमले होते. मद्रासचे क्रांतिकारक चिदंबरं पिले हे तेथेंच अभिनव भारताचे सभासद झाले. या आमच्या वार्षिक अधिवेशनांत गतकार्याचा आढावा घेअून किती सभासद, किती शाखा, कोणकोणतीं शस्त्रास्त्रें जमवलीं, याचा अंदाज घेतला जात असे. नवीन काय करावयाचें तेंहि ठरवीत असूं. निरनिराळ्या जिल्ह्यांतल्या, प्रांतांतल्या, सुशिक्षित पुढाऱ्यांची आपल्यासारखीच विचारसरणी व कार्यप्रणालि आहे, असे सदस्यांना समजल्यावर त्यांचा अुत्साह द्विगुणित होअी, निष्ठा स्थिर होअी, आणि कार्याची जगड्व्याळ कल्पनाहि येअी. या दृष्टीनें हे मेळावे फार अुपयुक्त होत असत. सावरकर विलायतेला जाण्यापूर्वी अभिनव भारताचें अध्यक्षस्थान त्यांच्याकडेच असे. ते गेल्यावर मी किंवा मि. दाजी नागेश आपटे (बडोदें) यांपैकी कोणास तरी तें यावें, असा त्यांचा मानस होता. पण शेवटीं आम्हां दोघांनाहि वगळून रा. हरि अनंत थत्ते ( आतां सॉलिसिटर ) यांच्याकडेच तें सोंपवण्यांत आलें. त्यांना निवडण्याचा हेतु अेवढाच होता कीं, त्यांचे आश्रयदाते खिमजी आसरवीरजी शेट यांच्याकडून ते कांहीं आर्थिक मदत अभिनव भारत संस्थेला मिळवून देतील. पण ती मिळाली नाहीं.

या वार्षिक आढाव्यांत असें दिसून येअी कीं, अद्यापहि प्रचारकार्य अपुरेंच पडत आहे. म्हणून अुत्सव, व्याख्यानें व सभा यांच्या जोडीला अधिक व्यापक अशीं प्रकाशनें अुपयुक्त होतील, या हेतूनें ती शाखा जोरानें चालवावयाचें ठरलें आणि त्याप्रमाणें बाबांनीं सुरवातहि केली.

## मित्रमेळ्याचीं प्रकाशनें

मित्रमेळ्याचें मोठें प्रचारकार्य म्हणजे लहान व मोठी प्रकाशनें होत. सावरकर व गोविंदकवींचे पोवाडे व मेळ्याची देशभक्तीनें रसरसलेलीं पदें हीं प्रारंभींचीं लहान नअू प्रकाशनें होतीं. म्हणून त्यांना " लघु अभिनव भारत-माला " हें नांव देअून बाबा सावरकरांनी ती प्रसिद्ध केलीं. त्या काळांत महाराष्ट्रांत बहुतेक प्रमुख शहरीं श्रीशिवाजी व गणेशोत्सवांत पुण्या-नाशिकच्या अनुकरणानें मेळे काढण्याचा प्रघात होता. पुण्याचा सन्मित्रसमाज मेळा हा प्रथम फारच लोकप्रिय झाला होता. आमच्या राज्यक्रांतीच्या कटाच्या खटल्यांतले ( आतां कै. ) शंकर पांडुरंग महाजन हे या मेळ्याचे पद्यकार व सूत्रधार कित्येक वर्षें होते. त्यांनी पदांच्या रूपानें देशभक्ति व सामाजिक अनिष्ट रूढींवर जहरी टीका सर्व समाजांत गाजवली. तें पाहूनच नाशकास मित्रमेळ्यानेंहि त्यांचें अनुकरण करून सवाअी कामगिरी केली. गोविंद कवींनीं या मेळ्याकरितां पदें करून दिलीं. कांही सावरकरांनींहि केली होतीं. रा. दाजी नागेश आपटे व 'चापधर' मोघे यांनींहि अेकेक पोवाडा केला होता. तुलनाच केली तर गोविंदकवि व सावरकर या द्वयाची पदेंच अितर त्यावेळच्या सर्व पदांपेक्षां अतिशय तेजस्वी, आणि अिंग्रज सरकारचे वाभाडे काढणारीं, होती. पुण्यास लोकमान्यांच्यासमोर जेव्हां सन्मित्रसमाज व मित्र-मेळा यांचीं पदें अेकाच रात्रीं म्हटली गेली, तेव्हां हा फरक स्पष्टच दिसून आला. तेजस्वी, ओजस्वी, देशप्रेमानें ओथंबलेली, राज्यक्रांति ध्वनित करणारी आणि वक्रोक्तीनें अिंग्रज सरकार व त्यांचे तोंडपुजे यांचें स्वरूप अुघडेंनागडें करून त्यांना बोचबोचून शरमवणारीं मित्रमेळ्याची पदे, आणि ती साभिनय गाअून दाखवणारे बाळ सावरकर, वर्तक, केतकर, खुशालसिंग यांच्यासारखे १८।२० वयाचे देशभक्त प्रौढ विद्यार्थी, असा संगम जमल्यावर प्रचंड समुदाय नागासारखा डोलूं लागत असे, हें मी पाहिलें आहे. टिळकांनीं मित्र-मेळ्याची तोंड भरून स्तुति केली, आणि मेळ्यांतल्या चढाओढींत मित्र-मेळ्यास पहिला क्रमांक देअून त्याला त्यांनीं सुवर्ण पदकहि दिलें, असें रा. वर्तक वकील, व या मेळ्याची सर्व व्यवस्था ठेवणारे रा. हरि अनंत रिसबूड लिहितात. याच पदांच्या प्रसिद्धीकरणानें तीं महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालीं. या लघुमालेनंतरचें मोठें प्रकाशन म्हणजे बॅ. सावरकरांनीं लिहिलेलें

" माझिनीचें चरित्र " हें होय. हा ग्रंथ, विशेषतः सावरकरांची त्यांतली प्रस्तावना, अितकी लोकप्रिय झाली कीं, शिखांच्या ग्रंथसाहेबाप्रमाणें कांहीं ठिकाणीं त्या ग्रंथाच्या मिरवणुकीहि निघाल्या! हा ग्रंथ म्हणजे क्रांतिकारकांची भगवद्गीताच होती. याच्या दोन हजार प्रती तीनच महिन्यांत चुटकीसरशा खपल्या! यानंतरचें संकल्पित प्रकाशन म्हणजे तात्या सावरकरांनीं लिहिलेलें " १८५७ चें स्वातंत्र्ययुद्ध " हें होतें. पण सरकारनें तें तेव्हां छापूं दिलें नाहीं ( क्रांतिवीर बाबाराव सावरकरांचें चरित्र पृ. ११२ पहा ). आतां तें भाषांतरित स्वरूपांत प्रसिद्ध झालें आहे, व मूळ प्रतहि मिळाली आहे. हें सर्व वाङ्मय अिंग्रज सरकारास अितकें विषारी, विद्रोही, वाटत होतें कीं, त्यांनीं तें सर्व प्रेसॲक्टच्या अिंद्रायणींत कित्येक वर्षें बुडवून टाकलें होतें! आतां स्वराज्य आल्यानें तें सर्व बंधमुक्त झालें आहे. त्याच्या सशस्त्र-क्रांतिप्रवणत्वाचें गमक हेंच कीं, अहिंसावादित्वानें हुरळून गेलेल्या १९३७ च्या कॉंग्रेससरकारनें सुद्धां तें सर्वच्या सर्व बंधमुक्त केलें नव्हतें!

## गोविंद-काव्य

गोविंदांच्या काव्यांत प्रारंभीं पौराणिक व अैतिहासिक घटनांचा बुरखा असे. अुदाहरणार्थ, रावण-बिभीषण संवाद, अंगद शिष्टाअी, शिवाजी मावळयांचा संवाद, गणरायाचीं प्रार्थना वगैरे पौराणिक वा अैतिहासिक मथळे देअून, त्यांत गोविंद कवि सुचवितात कीं, आम्ही अिंग्लंडच्या राजाला राजाच मानीत नाहीं ( राजा नाही, राजद्रोह मग कैसा रे व्हावा। ). आम्ही फक्त आमचाच राजा असेल तो मानूं ( भूप हिंदुचा, बंधु आमुचा, कोठें मज दावा? ). आणि जो आमचा राजाच नव्हें त्याबद्दलचा द्रोह राज-द्रोहच होअूं शकत नाही. राजा मान्य नसतांहि जर कोणी राज्य करीत असेल तर तो चोर, लुटारू. त्याच्याशीं द्रोह करणें, आणि सामदामादि अुपायांनीं, नाहीं तर शेवटीं क्रांतीहि करून, त्याला हाकलून देअून स्वतंत्र होणें, हें राष्ट्र-भक्तांचें कर्तव्यच ठरतें, अशी त्यांची शिकवण होती. यापायीं तुरुंगवासादि दिव्यें करावीं लागली तरी राष्ट्रभक्तांना त्यांची खंत नाहीं ( बंदीशाळा लोहशृंखला तदीय शृंगार। ). आणि अशा हातावर शिर घेअून निघालेल्या हजारों राष्ट्रभक्तांना तुरुंग तरी कसे पुरणार ( कितीक जणांना दाविशील तूं

मूर्खा बंदीधाम रे ! ). अर्ज विनंत्या, शिष्टाचार वगैरे मवाळांचीं साधनें निरुपयोगी ठरलीं, म्हणून कवि गणरायास म्हणतो :–

" देवा घे हातीं तरवार रे, हो संगरा तयार ॥ ध्रु० ॥

नाकदुऱ्यासह अर्जविनंत्या झाल्या वारंवार रे ।
हा ( अिंग्रज ) न वळेचि ओंभवतीला अधमाधम साचार रे ॥
अुपाय आतां अेकचि अुरला समशेरीचा मार रे ।
नानायत्नें या दुष्टांचा करावाच संहार रे ॥ "

आणि त्यासाठीं आम्ही थोडे आहोंत, अिंग्रजांचें सैन्य अफाट आहे, म्हणून

" गनिमीकावा स्वीकारावा तोच लघुबलाधार रे ।
गुप्त रूपानें मसलत सारी ही पाडावी पार रे । "

पुढें १९०६ मध्यें हा पौराणिक बुरखाहि गोविंदांनीं फेकून दिला आणि सरळ सांगितलें कीं,

रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळेना ।
असा भूतकालीन सिद्धांत जाणा ॥
स्वराज्येच्छुनें पाहिजे युद्ध केलें ।
रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें ? ॥

अर्थातच ही असली उघडी सशस्त्रक्रांतीची शिकवण अिंग्रज सरकारास पचणें शक्यच नव्हतें. त्यांनीं, १९०९ मध्यें बाबांनीं, ती प्रसिद्ध केली होती म्हणून त्यांना पकडून दंडविधीच्या ( पीनल कोडाच्या १२१ ) कलमाप्रमाणें " अिंग्रज सरकाराविरुद्ध युद्ध करण्यास चिथावणी देणें " या गुन्ह्याबद्दल जन्मठेप व सर्वस्व हानि ही शिक्षा ठोठावली. आणि त्यामुळें हें प्रकाशनाचें प्रकट कार्य कायमचेंच थांबलें.

या प्रकाशनाबाबत मला अद्यापहि एका गोष्टीचा अचंबा वाटतो. अिंग्रजांच्या कायद्याप्रमाणें हीं पद्यें उघड उघड राजद्रोही होतीं. पण तीं १२१ या दंडविधीच्या कलमाखालीं येतील, असें आमच्यांत त्यावेळीं असलेल्या कोणाहि वकिलानें सुचवलें नाहीं ! १२४ अ या राजद्रोहाच्या कलमाखालीं कांहीं वर्षें शिक्षा होअील, ही कल्पना बाबांना होती.

पण १२१ कलमाची कल्पना त्यांना, व त्यावेळीं आम्ही कोणीच तरुण विद्यार्थी वकील ( अेल्अेल्., बी. ) झालों नसल्यानें आम्हांला, नव्हती. पण त्यावेळीं जे वकिली करीत होते, त्यांना तर ती अवश्य असावयास हवी होती. पण, अितका कायद्याचा अभ्यास करतो कोण ? खरेदीखत, गहाणखत, वचनचिठ्या चोऱ्या, दरोडे, खून, मारामाऱ्या अित्यादि मामुली व्यवहारापुरतेंच त्यांचें ज्ञान. त्यामुळें त्यांनीं आम्हां कोणालाहि याबद्दल समज दिली नव्हती. जेव्हां बाबा लो. टिळकांना माझिनीचें हस्तलिखित दाखवावयास गेले होते, तेव्हां त्यांनीं मात्र हा स्पष्ट अुलगडा केला होता. आणि निदान प्रस्तावना तरी गाळा, असा सल्ला बाबांना दिला होता. अर्थात् बाबांनीं तो मानला नाहीं, ही गोष्ट वेगळी. पण कायद्याचें ज्ञान त्यावेळी सामान्य वकिलांना किती असे, यासाठीच हें दिग्दर्शन केलें आहे. क्रांतीकरितां असिधाराव्रत आम्हीं घेतलें होतें. जाणुनबुजून हे विदाही विदारक प्रचारकार्य आम्ही करीत होतों. म्हणून आम्ही त्याच्या होणाऱ्या परिणामांना तोंड देण्यास तयार होतों, ही गोष्ट निराळी.

## समान गुप्त संस्था आणि त्यांचें संघराज्य

नाशिकप्रमाणे अितर जिल्ह्यांत, महाराष्ट्रांत, क्रांतिकारकांचे अनेक फड व प्रयत्न चालू होते. जेथें जेथें अभिनव-भारताचा सभासद जाअी, तेथें तेथें तो राज्यक्रांतिकारक संस्थेचा प्रचारकच बने. अनुकूलता बरीच दिसल्यास तो तेथें गुप्त-संस्थाहि स्थापून येअी. नाशिक जिल्ह्यांत अशा शाखा त्र्यंबक, भगूर, ओझर, कोठुरें, निफाड, येवलें, अिगतपुरी, वणी, धोडप अित्यादि ठिकाणी स्थापन झाल्या होत्या. शिवाय पुणें, जुन्नर, मुंबअी, पेण, सातारा, नगर, सोलापूर, धुळें, कोल्हापूर, बडोदें, अिंदूर, ग्वाल्हेर, औरंगाबाद, हैदराबाद अित्यादि बृहन्महाराष्ट्राच्या नाक्यानाक्याच्या ठिकाणीं अभिनव भारताचीं केंद्रें होतींच. साताराचे डॉ. आठल्ये हे कळवतात कीं, "१९१० मध्यें सरकारी प्रक्षोभाला बळी पडलेल्या सातारा येथील गुप्त-संस्थेचे कांहीं सभासद अभिनव भारताचेहि सभासद होतेच." आणि कोल्हापूरच्या गुप्त-संस्थेचेहि कांहीं सभासद अभिनव-भारताचे सदस्य झाले होते. ग्वाल्हेरला तर मोठीच शाखा असून तेथें राज्यक्रांतिकारक कटांच्या खटल्यांत प्रो. डॉ. हरि रामचंद्र दिवेकरांसारखे गृहस्थहि गोंवले गेले होते.

समान परिस्थितीत विचारी लोकांच्या विचारसरणीला बहुतेक सारखेंच वळण लागतें. १९०० ते १९१० चा कालखंडच असा होता कीं, त्यांत राज्यक्रांतीचेच विचार सुशिक्षितांच्या मनांत धुमसत रहावे. आणि ही राज्यक्रांति गुप्त संस्थांमार्फतच केली पाहिजे, हेंहि तरुण विचारी पिढी जाणत होती. त्यामुळें जेथें अभिनव भारताचा प्रत्यक्ष संबंध नव्हता तेथेंहि गुप्तमंडळ्या निघतच होत्या. आमच्या कटांत १० वर्षें शिक्षा झालेले रा. त्र्यंबकराव मराठे लिहितात, “ १९०४ सालीं मी ट्रेनिंग कॉलेजमध्यें असतांना पुण्यांतल्या अेका गुप्त संस्थेमध्यें ट्रेनिंग कॉलेजमधील कांहीं मंडळी सामील झाली होती.* ट्रेनिंग कॉलेजच्या मंडळींत सातारा जिल्ह्यांतली मंडळी जास्त होती. त्यांत कृष्णाजी मारुती कळंबे हे मराठा गृहस्थ होते. पुढें पेण येथेंहि बरेच क्रांतिकारक मला अेकत्र आणतां आले. महाराष्ट्रांत ही चळवळ निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या लोकांनीं सुरू केली होती. मराठी-अिंग्रजी शाळेंतले विद्यार्थीहि अेकत्र जमून अशाच तऱ्हेचीं खलबतें करीत. अशा अनेक संस्थांचा संबंध अभिनव भारताशीं आल्याचें दिसलें नाहीं. ” सेनापति बापटांनींहि १९०३ मध्यें स्वतंत्रपणेंच तरवारीवर हात ठेवून क्रांतियुद्धाची शपथ आत्मप्रेरणेनें घेतली होती.

पुण्याला अशा गुप्त संस्था बऱ्याच होत्या. आमच्या कटाच्या खटल्यांतील कै. शंकर पांडुरंग महाजन, भावे, गोपाळराव ओगले ( नागपूरचे महाराष्ट्राचे संपादक ), व आगाशे हे अेका गुप्त संस्थेंचे सभासद होते. पण या समान व समांतर चाललेल्या बऱ्याच संस्था अभिनव भारताशीं नंतर कोठेंतरी कोणातरी सभासदामार्फत चिकटलेल्या होत्या. पेणच्या संस्थेंतले चालक रा. त्र्यंबकराव मराठे हेच अभिनव भारताचे सभासद कै. गोपाळराव पाटणकर यांच्याशीं संबद्ध होते. नाशिकच्या अभिनव भारताशीं संलग्न असलेल्या मित्र-समाजाचे कान्हेऱ्यांच्या बरोबर फांशी गेलेले कृष्णाजी गोपाळ कर्वे हे सभासद होते. कर्व्यांनीं पुढें नाशकास व मुंबअीस आणि अितरत्रहि निराळ्या गुप्तसंस्था काढल्या. त्यांच्या मुंबअीच्या शाखेंत आमचे गोपाळ-

---

* मला वाटतें ही आमची फर्ग्युसन कॉलेजमधलीच संस्था असावी. कारण त्यांत अेका बैठकीस ही मंडळी आल्याचें मला आतां स्मरतें.

राव पाटणकर होतेच. १९०८ नंतर माझा व कर्व्यांचा दाट संबंध होता. शिवाय आमच्या अभिनव भारताचे सदस्य आणि स्फोटकास्त्राच्या (बॉंबच्या) कारखान्याचे चालक रा. रामभाऊ भाटे यांच्याशींहि कर्व्यांचा व खऱ्यांचा संबंध होता. पुण्यास तर सावरकरांनीं स्थापलेली अभिनव भारताची शाखा आमच्यानंतर रा. गणपतराव जोगळेकरांनीं डेक्कन व फर्ग्युसन कॉलेजांत चालवलेली होती. तिच्याशी बॉंबची कृति शिकवणारे रा. कृष्णाजी गोपाळ खरे, वकील, हे मिळूनमिसळून होते. कर्व्यांच्या नाशिक शाखेंतले सभासद व बॉंबकरितां पिक्रिक ॲसिड तयार करणारे दामुअण्णा चंद्रात्रे हे मूळचे अभिनव भारताची दीक्षा घेतलेले होते. कर्वे व खरे हे नाशिक, मुंबअी, पुणें, येथल्या स्वतंत्र शाखांचें काम संभाळून अभिनव भारताच्या कांहीं सभासदांशीं मिळूनमिसळून राहात. ते कर्तबगार पुढारी असल्यानें त्यांना सर्वांशीं वेळप्रसंगीं मिळतें घ्यावेंच लागे.

आमच्यावरील १९१० च्या सशस्त्र राज्यक्रांतीच्या खटल्यांत पुण्यास ३, नाशिकास ३, पेणेस १, येवल्यास १, औरंगाबादेस १, हैदराबादेस १, मुंबअीस २, वसअीस १ अशा शाखांचें प्रकटीकरण झालेंच होतें. पुण्यास अभिनव भारताशिवाय, कै. ब्रह्मगिरीबुवांची अेक शाखा व डावऱ्यांची अेक शाखा अशा ३ संस्था होत्या. नाशकास सावरकर, कर्वे व धारप यांनीं काढलेल्या ४ शाखा होत्या. पेणच्या शाखेंत रा. मराठे, बापट, कोल्हटकर, जोग, गोखले अित्यादि मंडळी होती. येवल्याच्या शाखेंत कै. काशिनाथ दाजी टोणपे, कै. विनायक सदाशिव बर्वे, नारायणराव जोशी, त्र्यंबकशेठ गुजराथी, शिवराम शेट सोनार, प्रभृति मंडळी होती. औरंगाबादेस नाशिकचे धारप यांनीं शाखा काढली होती. ज्याक्सनचा वध करणारा हुतात्मा अनंता कान्हेरे याला येवल्यास टोणप्यांनीं अभिनव भारताची शपथ व दीक्षा दिली होती. हैदराबाद ( मोंगलाअी ) येथें रा. विनायक गोविंद तिखे हे कार्यचालक होते. मुंबअीस अभिनव भारताच्या शाखेचें काम मजकडे होतें. त्यांतच पंतप्रधान बाळ गंगाधर खेर, कै. डॉ. गुणे, चंदावरकर, मुर्डेश्वर वकील, जज्ज झालेले गुंडील, डॉ. सोनपार, सॉलिसिटर थत्ते, डॉ. थत्ते, अेंजिनिअर घाटे, पाटणकर, गोरे, भाटे, घनश्याम चिपळूणकर वगैरे मंडळी होती. त्यांशिवाय कर्व्यांच्या शाखेंत व्यंकटराव नागपूरकर ( ७ वर्षें

शिक्षा भोगलेले ), दुगल, अेंजीनिअर मोघे ( अिंदूर ), गोरे वगैरे सदस्य होते. वसअीच्या शाखेंत डॉ. परुळेकर, वाघ, गोखले, भाटे वगैरे मंडळी होती ( भाटे यांचा लेख ). रा. भाटे यांनीं आठवतील तेवढीं नांवें त्यांच्या निवेदनांत दिलीं आहेत. सातार्‍याचे डॉ. आठल्ये हेहि अभिनव भारताशीं संबद्ध होते. ग्वाल्हेरच्या शाखेंत प्रसिद्ध डॉ. प्रो. हरि रामचंद्र दिवेकर, देसाअी वगैरे ४०–५० मंडळी होती. बडोद्याच्या शाखेंत बॅ. केशवराव देशपांडे, प्रो. दत्तोपंत केतकर व राजरत्न माणिकराव यांचा समावेश झाला होता. अशा कैक शाखा अभिनव भारताच्या तर होत्याच, पण कित्येक अगदी स्वतंत्रहि संस्था होत्या. सर्वांचें अुद्दिष्ट अेकच असल्यानें "समानशीले व्यसनेषु सख्यं" या न्यायानें कोठेना कोठें तरी, केव्हांना केव्हां तरी, एक-मेकांशीं अचानक संबंध येअी. आणि अेकाच नावेंत आपण प्रवासी आहोंत, हें कळल्यावर जो आनंद होअी त्याला तुलनाच नसे. प्रत्येक शाखा स्वतंत्र असून फक्त अध्यक्षामार्फत दुसर्‍या शाखेशी संलग्न असे. गुप्त संस्थांचें असें हें आमचें संघराज्य ( confederation ) होतें. आयर्लंड व रशियांतल्या गुप्त संस्थांच्या धर्तीवर या गुप्त संस्थांचा – सुरक्षिततेसाठी – अेकमेकांचा संबंध फक्त अेक-दोन कर्त्या व्यक्तींपुरताच मर्यादित असे. त्यामुळें व्यक्तिशः सर्व संस्थांतील सभासदांची ओळख असणेंच शक्य नव्हतें; नव्हे तें कटाक्षानेंच टाळलें होतें. आणि या कडक नियमाची अंमलबजावणी कसोशीनें पाळण्यांत आली म्हणूनच अितक्या थोड्या लोकांच्या बलिदानावरच अितर कैक संस्था व हजारों सभासद व शस्त्रास्त्रें सुरक्षित राहिलीं. आज त्यांपैकीं कित्येकांचीं नांवेंहि आम्हांस माहीत नाहींत. पण त्यांचा अज्ञात त्याग व गुप्त सेवा हीं अविस्मरणीय आहेत. गुप्त संस्थांतील सभासदांच्या प्रचंड त्यागाचे व देश-भक्तीचे नगारे कधींच वाजवले जात नाहींत. त्यांची तशी अिच्छाहि नसते. तें शक्यहि नसतें. पण म्हणूनच ही कीर्तिविन्मुख सेवा अमोल आहे. असो. आपण आतां मूळ विषयाकडे वळूं.

### अितर प्रांत मंद व थंड

प्रकट कार्य आमच्याप्रमाणेंच अितर प्रांताप्रांतांतून चालूंच होतें. पण त्यांतहि तरतमभाव तत्रस्थ पुढार्‍यांच्या व जनमनाच्या मगदुराप्रमाणें असे. प्रकट चळवळींचा परिणाम म्हणजे प्रत्यक्ष राज्यक्रांतिकारक कार्य. त्यांत

वंगभंगामुळे बंगालचा नंबर पहिला लागतो. त्याच्या खालचा फक्त महाराष्ट्र! मुंबअी प्रांत नव्हे. कारण त्यावेळच्या मुंबअी प्रांतांत सिंध, गुजराथ, महाराष्ट्र व कर्नाटक अितके प्रांत समाविष्ट होते. ह्या ४ पैकीं ३ विभागांत अगदींच सामसूम होतें. गुजराथ तर त्यावेळीं मवाळांचा अड्डा. त्यासाठीं तर त्या प्रांतांत सुरतेस १९०७ सालीं मवाळांनी कॉंग्रेस भरवली. गुजराथेंतल्या देशद्रोही भांडवलवाल्या बनियांनीं तर बंगालनें पेटवलेल्या स्वदेशी चळवळीच्या निखाऱ्यांवर विलायती माल, देशी म्हणून, विकून चांगल्या गडगंज फायद्याच्या पोळ्या भाजून घेतल्या होत्या. ह्या भांडवलवाल्या प्रांतांत देशभक्ति ही, आतां व तेव्हांहि, व्यापाराकरतां, स्वार्थाकरतांच, राबवली जात होती! आजहि 'काळाबाजार' माजवणारे, आणि लाखो कंगालांना अन्नान्न आणि नागडे करीत हिंडवणारे हरीचे लाल १९०७ ते १९४७ पर्यंत पिढ्यान् पिढ्या या भांडवलदार बनियांतच आहेत. असो. अितर प्रांतांत शांतताच होती. राजद्रोह कमिटीनें आपल्या अहवालांत हेंच मत दिलें आहे. आणि ह्या जडमूढ प्रांतांची कर्तृत्वशून्यता ध्यानीं न घेअून बंगालनें, व कांहींसें महाराष्ट्रानें, सबंध हिंदुस्थानला मुक्त करण्यासाठीं, क्रांति करावयाचें अुतावळेपणानें ठरवलें होतें! बंगाल व महाराष्ट्र यांतले तरुण या क्रांतीच्या मदानें इतके धुंद झाले होते की, त्यांना सबंध हिंदुस्थानापैकीं $\frac{९}{१०}$ हिंदुस्थान आपल्या पाठीशीं नाहीं, हें दिसतच नव्हतें. बॉंबसारखें शस्त्र हातांत आल्यानें आपण अिंग्रज सरकारला दे माय धरणी ठाय करूं अशी अननुभूत आणि म्हणून दिव्य भव्य विशाल आशा आम्हांला पुढें पुढें खेंचीत होती. आमचें रम्य स्वप्न होतें तें. बंगालच्या तत्कालीन क्रांतिकारकांनीं या रम्य पण फसव्या स्वप्नांतच क्रांतीला प्रारंभ केला. "राजनैतिक कारस्थान" या त्यांच्यापैकींच अेकानें लिहिलेल्या ग्रंथांत या घाअीचा व फसवणुकीचा पुरा परामर्श घेतला आहे. असो.

या प्रकट प्रचारकार्यानंतर आपण अभिनव भारताच्या पुण्या-मुंबअीच्या गुप्त व मुख्य कार्याकडे वळूं. तें कार्य म्हणजे संघटनेबरोबरच शस्त्रास्त्रांची जमवाजमव व तयारी हें होय.

## प्रकरण तिसरें

# पुण्यांतून क्रांतिकार्याचा महाराष्ट्रभर प्रसार

मित्रमेळ्यानें नाशकास काय कार्य केलें याचा अितिहास बॅरिस्टर व बाबा सावरकर यांच्या चरित्रांत यापेक्षांहि तपशीलवार आला आहे. शिवाय विषयानुरोधानें त्याचा अुल्लेख वारंवार पुढें येअीलच. म्हणून सावरकर बंधूंच्या चरित्रांत फारशी न आलेली, पुणें व मुंबअी केंद्रांतली, मला आठवते तितकीच, माहिती येथें संकलित करून देत आहे.

### पुण्यांतल्या मित्रमेळ्याच्या शाखा

तात्याराव सावरकर मॅट्रिक पास झाल्यावर पुण्यास १९०१–२ मध्यें फर्ग्युसन कॉलेजमध्यें अुच्च शिक्षणासाठीं गेले. लो. टिळकांनीं तें कॉलेज स्थापलें असल्यामुळें त्या नांवांतच देशभक्तीची जादू भरलेली होती. कॉलेजचे चालक मात्र ना. गोखल्यांचे अनुयायी असल्यानें, आणि कॉलेजच्या नियामक मंडळांत कांहीं अिंग्रजनिष्ठ राजेरजवाडे होते म्हणून, अगदींच 'मवाळ' होते. त्यामुळेंच त्यांचा व स्वातंत्र्य-लालसेनें भारलेल्या तरुण विद्यार्थ्यांचा वारंवार खटका अुडे. पण फर्ग्युसनमध्यें शिकवणारे रँग्लर परांजपे,

राजवाडे, भाटे, अभ्यंकर वगैरे अध्यापकांच्या स्वार्थत्यागाची भूमिका स्वदेशभक्तीचीच होती यांत शंका नाहीं. त्यांच्या या खोल दडलेल्या देशभक्तीची व त्यागाची जाणीव विद्यार्थ्यांना होती; आणि म्हणूनच देशप्रेमानें रसरसलेले पण सामान्यतः मध्यम वर्गांतले विद्यार्थी या फर्ग्युसन कॉलेजांतच येत. त्यांत महाराष्ट्र, मध्यप्रांत, वऱ्हाड व कर्नाटक यांतील विद्यार्थ्यांचा भरणा असे. सावरकरांनीं पहिल्याच वर्षांत आपल्या अमोघ वक्तृत्वानें व चळवळ्या स्वभावामुळें विद्यार्थ्यांचीं मनें आकर्षून घेतलीं. प्राध्यापकांनाहि त्यांच्या बिनचूक तर्कशुद्ध वादपटुत्वाचें व वक्तृत्वाचें कौतुक वाटे. मित्रमेळ्याच्या प्रकट कार्याला या त्यांच्या अलौकिक गुणांचा अतिशय फायदा होअी. साखरेला मुंग्या लागाव्या त्याप्रमाणें त्यांच्याभोंवतीं गुणज्ञ विद्यार्थ्यांचीं मनें आपोआप आकर्षिलीं गेलीं; आणि त्यांनीं त्यांच्यापैकीं योग्य तरुणांची निवड करून १९०२ मध्यें फर्ग्युसन कॉलेजमध्येंच मित्रमेळ्याची अेक शाखा स्थापली. त्यावेळीं सावरकर, सोलापूरचे (आतां कै.) ग. वि. रानडे, जुन्नरचे ग. वा. जोगळेकर (वकील), रा. अथणी, ओक, गोडबोले, दाजी नागेश आपटे, पानसे, थत्ते हे व अितर कांहीं या शाखेचे पहिले शपथबद्ध सभासद झाले.

१९०२ च्या अखेरीस माझीहि मॅट्रिक्युलेशन परीक्षा अुतरून मीहि १९०३ मध्यें फर्ग्युसनमध्येंच प्रविष्ट झालो, आणि १९०५ अखेरपर्यंत सावरकरांचा सहाध्यायी व सहवासीच होतों. चतुःशृंगीच्या अलीकडील टेकडीवर किंवा फर्ग्युसनच्या मागच्या टेकडीवर, आमच्या या मित्रमेळ्यांतल्या शपथबद्धांच्या साप्ताहिक बैठकी भरत; आणि त्यांत अेका कोणत्या तरी अुपयुक्त विषयावर चर्चा, वादविवाद होअी. लेखनाचा सराव असावा म्हणून चौथ्या क्लबांत त्या वेळीं आम्ही अेक हस्तलिखित साप्ताहिकहि चालवीत असूं. सावरकर, आपटे व मी हेच बहुतेक त्यांत कोणत्या तरी देशविषयक प्रश्नावर निबंध वा कविता लिहीत होतों. सावरकरांची श्रीशिवाजीची भूपाळी यांतच प्रथम प्रसिद्ध झाली. आमच्या या शाखेंत नंतर बऱ्याच नवयुवकांची भरती झाली. काळकर्ते परांजपे यांचे ज्येष्ठ चिरंजीव श्रीकृष्ण शिवराम परांजपे, वकील; दत्तात्रय परशराम चिंचाळकर, अमळनेरचे वकील; ह. ब. भिडे (पुढें सामळदास कॉलेजमध्यें अध्यापक); वासुदेवराव मोहोळकर,

वकील; सोलापूरचे अंत्रोळीकर, वकीलबंधु; पुढे डि. डे. कलेक्टर झालेले संत, काका कालेलकर, गोविंदराव थत्ते, दत्तोपंत तर्खडकर, ( पुढे डेप्युटी अे. अिन्स्पेक्टर ); हरि अनंत रिसबूड, काका गोखले, बी. अे., ( सरकारी नोकर ); पाटणकर वगैरे नवीन मंडळी जुन्यांच्या भरतीला येअून शाखेला चांगलेंच बाळसें चढलें.

## ट्रेनिंग कॉलेजांतील शाखा

आमच्यापैकीं कांहीं जे गांवांत राहात होते त्यांनीं गांवांतच नंतर शाखा काढल्या. आम्हांखेरीज स्वतंत्र अशाहि कांहीं तरुणांनीं या अेकाच अुद्देशानें स्वतंत्र संस्था चालवल्याच होत्या. त्यांपैकीं माझे नातलग ( आतां कै. ) शंकर पांडुरंग महाजन, सन्मित्र-समाज मेळ्याचे पुरस्कर्ते — यांचीहि अेक संस्था होती. शिवाजी-अुत्सव, गणेशोत्सव व अितर चळवळींत जीं व्याख्यानें होत त्यांच्यांतूनहि या संस्थांना अुत्तेजक असा स्वातंत्र्य-प्राप्तीचाच सूर निघे. 'केसरी', 'काळ', भोपटकर-बंधूंचा 'भाला' या साप्ताहिकांतून "स्वातंत्र्यप्राप्तीशिवाय हिंदुस्थानास तरणोपाय नाहीं, क्रांतीशिवाय ती गोष्ट होणें शक्य नाहीं, अिंग्रज येथून गेल्या-शिवाय किंवा घालविल्याशिवाय सर्व प्रयत्न व्यर्थ आहेत, मवाळांच्या धोरणानें कांहींच साध्य होणार नाहीं," या तत्त्वांचेंच लोणी, अितिहासाचें ताक घुसळून निघत होतें. काळाचें तर 'पारायण'च चाले. परदेशांतल्या क्रांतिकारकांचीं अुदाहरणें देअून 'काळ' सशस्त्र क्रांतीचा जाळ भडकवीत होता. तरुणांचीं मनें त्याच्या आचेनें तापून निघत होतीं. आणि मित्र-मेळ्यांत किंवा अितर क्रांतिकारक संस्थांत आपोआप ओढलीं जात होतीं. फर्ग्युसन कॉलेजप्रमाणें मराठी शाळामास्तरांकरितां काढलेल्या ट्रेनिंग कॉलेजमध्येंहि अशीच क्रांतिकारकांची शाखा होती हें मागें सांगितलेंच आहे.

## डेक्कन कॉलेजांतला प्रसार

त्या कालखंडांत ज्यूनिअर बी. अे. मध्यें असतांना फर्स्ट अेल्अेल्. बी. ची परीक्षा अुत्तीर्ण होण्याची सवलत होती. १९०४ मध्यें सावरकर, व १९०५ मध्यें मी, त्या परीक्षेसाठीं टर्मस् भरण्यास डेक्कन कॉलेजमध्यें संध्याकाळीं जात असूं. तेथें तेव्हां शिळोप्याच्यां वेळीं सरकारी वकील रा. व्यंकटराव आम्हांस अेक तांस रोमन लॉ व ज्युरिसप्रूडन्स या विषयांवर व्याख्यान झोडीत असत.

त्यांच्या व्याख्यानाकडे अर्थात् कोणाचेंच फारसें लक्ष नसे, हें त्यांनाहि कळत होतें. पण पगारासाठी ती अुठाठेव करणें त्यांना भागच होतें. आम्ही परीक्षा अुत्तीर्ण व्हावें, ही मात्र त्यांची मनापासून अिच्छा असे. आणि म्हणून आम्हां चुकारतट्टूंना ते शेवटीं त्यांच्या विषयाची अेक सुबोध जंत्री करून छापून वाटीत. कित्येक विद्यार्थी तर ती घोकूनच अुत्तीर्ण होण्यापुरते गुण मिळवीत. पूर्वपरीक्षेंत ( प्रिलिमिनरी ) तर प्रश्नांच्या अुत्तरांअैवजीं कांहीहि लिहिलें, किंवा न लिहितां चित्रेंहि काढलीं, तरी सर्वच विद्यार्थी योग्य ठरून व्यंकटराव आम्हांस परिक्षेसाठीं पाठवीत ! विश्वविद्यालयांत मात्र अर्थातच अभ्यासाच्या मगदुराप्रमाणें निकाल होत. या परीक्षेंत सावरकर १९०४ मध्यें अुत्तीर्ण झाले. दाजी नागेश आपटे व मी १९०५ मध्यें यथाक्रम पहिल्या वर्गांत आलों.

हें सांगण्याचा मुद्दा अेवढाच कीं, आम्ही फर्ग्युसनचे विद्यार्थी असतांच, आम्हांस डेक्कन कॉलेजांत प्रवेश मिळण्याची संधि सहज आली. आणि आम्हीं तेथेंहि आमचें जाळें पसरण्याचा अुद्योग चालू केला. रा. बाबासाहेब खापर्डे, रणदिवे, पांडे, बापट हे त्यावेळी तेथें होते. त्यांचा परिचय तेथें अनायासेंच झाला. डॉ. सेल्बी व प्रो. बेन यांच्यासारखे अिंग्रज लोक प्राध्यापक असतांना डेक्कन कॉलेजांतहि क्रांतिवृक्षाचीं मुळें रुजलीं होतीं. सेनापति बापटांनीं १९०३ मध्यें तरवारीवर हात ठेवून तेव्हांच स्वातंत्र्यप्राप्तीची शपथ घेतली होती. रा. देवभानकर व आतांचे सर गुरूनाथ बेवूर हे बापटांप्रमाणेंच तेव्हां ज्वलंत देशभक्त गणले जात असत. फर्ग्युसन कॉलेज, ट्रेनिंग कॉलेज, डेक्कन कॉलेज या तिन्ही अुच्च शिक्षणाच्या पीठांतून आमच्या क्रांतितत्त्वांचा प्रचार, आणि क्रांतिकारकांचा परिचय, याप्रमाणें १९०२-पासून तों १९०७ पर्यंत अखंड चालू होता. १९०५ मध्यें सावरकर बी. अे. होअून मुंबअीस दुसऱ्या अेल्‌अेल्. बी.च्या अभ्यासास १९०६ च्या प्रारंभीं गेले. मी बी. अे.साठीं पदार्थविज्ञान ( फिजिक्स् ) आणि रसायनशास्त्र हे विषय अैच्छिक म्हणून घेतले होते. फर्ग्युसनमध्यें या विषयांचे तेव्हांचे आमचे प्राध्यापक रा. केशवराव कानिटकर हे होते. पण त्यांना १९०६ मध्यें, अेम्. अे.च्या परीक्षेस बसावयाचें असल्यानें, आम्हांस शिकवण्यास मुळींच वेळ नसे व त्यांचें लक्षहि नव्हतें. म्हणून मीहि मुंबअीस विल्सन कॉलेजमध्यें, या विषयांच्या अभ्यासासाठीं,

१९०६ च्या प्रारंभी गेलों. आणि फर्ग्युसन शाखेचें काम रा. गणपतराव जोगळेकर यांच्या अंगावर त्यानंतर पडलें.

## विलायती कपड्यांची चिता

सावरकर हे १९०५ मध्यें बी. अे. च्या वर्गात असतांना वंगभंगाची चळवळ सुरू होअून स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य ही चळवळीची चतुःसूत्री तेव्हां फोफावत चालली होती. स्वदेशीच माल शक्य तोंवर, त्याग सोसूनहि, वापरावयाचा व अिंग्रजी मालावर बहिष्कार टाकावयाचा, हें त्या चळवळीचें प्रधानसूत्र होतें. अिंग्रजांबद्दल पेटत चाललेल्या द्वेषाच्या स्फोटास बहिष्काराची कल्पना फारच अनुकूल होती. त्या द्वेषाचें प्रतीक म्हणून विलायती वस्तु जाळून टाकण्याची, त्यांच्या होळ्या पेटवण्याची, कल्पना निघाली. मवाळ, व रु. आ. पैच्या हिशेबानें देशाभिमान व पारतंत्र्याबद्दलचा जळजळीत द्वेष या तत्त्वांना पारड्यांत घालून तोळा-मासा करणारे पुढारी, अर्थातच या होळ्यांच्या विरुद्ध होते. पण सर्वस्वावर, प्राणावरहि, अुदक सोडणारे अुदार तरुण या घेलाशेटी हिशेबांना थोडेच जुमानणार? पुण्यासहि विलायती कापडाची, कपड्यांची, टोप्यांची होळी झालीच पाहिजे, हा आग्रह सावरकरांच्या अनुयायांनी धरला. आणि त्याप्रमाणें शिवरामपंत परांजप्यांच्या अध्यक्षतेखाली, फर्ग्युसनच्या जवळच्या मैदानांत, विलायती कपड्यांची चिता पेटवून अिंग्रजी मालाचें चिताभस्म अंगास लावून, आम्ही कृतकार्यहि झालों!

## सावरकर-जोगळेकरांची हद्दपारी

पण याचेंच निमित्त कॉलेजच्या चालकांपुढे ठेवून सावरकरांना कांहीं तरी शिक्षा करा, असा नेट सरकारनें चालकांना लावला. आणि सरकारच्या त्या अिच्छेला मान तुकवून फर्ग्युसनमधून सावरकरांना १० रुपये दंड करून हद्दपार करण्यांत आले! सावरकरांचें त्यामुळे फारसें नुकसान कांहीच झालें नाही. परीक्षेस बसण्याअितक्या त्यांच्या टर्म्स भरल्या होत्या. अुपान्त्य परीक्षा होअून त्यांना परीक्षेस फॉर्महि मिळाला होता. म्हणून ते परीक्षेस बसूं शकले व अुत्तीर्णहि झाले. सरकारच्या या कृत्यामुळें सावरकरांची लोकप्रियता मात्र शिगेस पोचली. या हद्दपारीत रा. हरिभाअू रिसबुडांकडेच सावरकर राहात होते.

फर्ग्युसनमध्यें असतांना मित्रमेळ्याचें मनःक्रांतिकार्य जें चालू होतें तें कांहीसें गुप्त व पुष्कळसें प्रकट असें परस्परविरोधी होतें, ही गोष्ट खरीच. आणि यामुळेंच कांहीं क्रांतिकारक आमच्यापासून फटकून वागत. त्यांतच पुढें आमचे बॉंबच्या कारखान्याचे सूत्रचालक रा. कृष्णाजी गोपाळ खरे, हरिभाअू भागवत, आतांचे मुंबअी प्रांताच्या विधिमंडळाचे अध्यक्ष रा. कुंदनमल सो. फिरोदिया हे होते. सावरकर व मी फर्ग्युसन सोडून जाअीपर्यंत त्यांनीं आपल्या विरोधाला वाचा फोडली नव्हती. पण पुढें रा. गणपतराव जोगळेकरांच्या हाती सूत्रें गेल्यानंतर त्यांनीं जोगळेकरांना व काका कालेलकरांना रात्रींच्या वेळीं, त्यांच्या धैर्याची व प्रतिकारक्षमतेची कसोटी पाहण्यासाठीं, टेकडीवर गुप्त खलबत करण्याच्या मिषानें बोलाविलें. आणि ते तेथें पोचल्याची चाहूल लागतांच वेष पालटून खरे, आवटी, अमळनेरचे फाटक व फिरोदिया यांनीं त्यांच्यावर हल्ला केला व चांगलाच मार दिला, असें रा. जोगळेकर आपल्या माहितीपत्रकांत म्हणतात. खरे व फिरोदिया यांच्या कसोटीस जोगळेकर व काका कालेलकर अुतरले कीं नाहीं हे माहीत नाहीं. पण हा प्रसंग घडला खरा. नंतर खरे मुंबअीस रसायनशास्त्राचा विषय घेअून अेम्. अे. होण्यासाठीं आले. फिरोदियाहि नतर वकील होअून क्रांति-कार्यापासून अलग झाले (जोगळेकरांची माहिती).

सावरकरांना जसें फर्ग्युसनच्या चालकांनीं हद्दपार केलें त्याचप्रमाणें रा. जोगळेकरांवरहि तोच प्रसंग नंतर ओढवला. पण मौज ही की, फर्ग्युसनच्या चालकांनी राजद्रोही ठरविलेला हा विद्यार्थी खुद्द सरकारच्या डेक्कन कॉलेजमध्यें प्रो. बेन यांनीं घेतला! फर्ग्युसनच्या आतिरेकी मवाळपणाचें हें भडक दर्शकचिन्ह होतें. डेक्कनमध्यें गेल्यावर जोगळेकरांनीं आतां कलेक्टर असलेले मोडक, आवटी, अमळनेरचे फाटक व अितर तरुण देशभक्तांना जमवून तेथेंहि आपल्या क्रांतिकारक शाखेचें काम चालविलें होतें. कॉंग्रेसचे नुकतेच अध्यक्ष झालेल्या किरपालानींना जोगळेकरांनींच 'अभिनव भारतां'त आणलें होतें. पुढें जोगळेकर वकिलीच्या अभ्यासासाठीं मुंबअीस आल्यावर, व सरकारच्या अुग्र व क्रूर धोरणानें टिळक-परांजपे यांच्यावर खटले करून त्यांना कठोर शिक्षा १९०८ मध्यें दिल्यावर, पुण्याची शाखा अस्तंगत झाली.

## अितर कार्यें

पुण्यास आमचें क्रांतितत्त्वप्रसाराचें काम चालू असतांच सावरकरांनीं दोन महत्त्वाच्या गोष्टी केल्या. अेक म्हणजे काळकर्ते अण्णासाहेब परांजपे यांना १९०५ मध्यें गणेशोत्सवाच्या निमित्तानें नाशिकचें आमंत्रण देअून नाशिकचें क्रांतिकार्य त्यांच्या नजरेखालीं घातलें ही होय. आणि दुसरी म्हणजे नाशिकच्या मित्रमेळ्याचा गणेशोत्सवासाठीं तयार केलेला मेळा पुण्यास लो. टिळकांच्या गायकवाडवाड्यांतील अुत्सवासाठीं आणवून तेथें कै. गोविंदकवींनीं व सावरकरांनीं केलेली क्रांतिकारक पदें त्यांच्या पुढें गाअून दाखवून त्यांची शाबासकी मिळवली ही. या दोन्ही लोकोत्तर महाभागांनीं आमचें क्रांतिकार्य पाहून जे धन्यवाद दिले त्यामुळें आम्हां नवजवानांना मूठभर मांस चढलें असल्यास नवल नाहीं.

आमच्या पुण्याच्या शाखेपैकीं अेक अुत्तम लेखक म्हणून रा. दाजी नागेश आपटे हे प्रसिद्ध होते. त्यांनीं ‘ नरकाचा दरबार ’ हा लेख टोपण नांवानें ‘भाला’ पत्रांत प्रसिद्ध केल्यामुळें भालाकार भास्करराव भोपटकरांवर राजद्रोहाचा खटला होअून त्यांना शिक्षा झाली. आपल्यामुळें दुसऱ्यास शिक्षा झाली या कल्पनेनें ते फारच खट्टू झाले; आणि त्यानंतर त्यांनीं क्रांति-विषयांत लेखणीला जो विराम दिला तो कायमचाच ठरला. सरकारला ही बातमी कळलीच होती. त्यामुळें त्यांचा छळहि पुष्कळ झाला आणि त्यामुळें त्यांना प्रांतांतरहि करावें लागलें.

## सिंहगडावरील सफर

पुण्याच्या या आमच्या वास्तव्यांत आम्ही क्रांतिकारकांनीं मिळून सिंहगडावर केलेली सफर स्मरणीय होती. श्रीशिवछत्रपतींच्या क्रांति-कार्यांत कायावाचामनें करून धारातीर्थी पतन पावलेल्या तानाजींचें दर्शन घेअून, आम्ही आमच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या शपथांना त्यांच्या समाधीवर हात ठेवून पुनः तीक्ष्ण धार चढवली. तेथली आमची सभा, त्यांतलीं आवेश-युक्त भाषणें, तेथें केलेल्या आमच्या प्रतिज्ञा, सर्वच कांहीं अितकें हृदयंगम होतें कीं, त्याची स्मृति आज जवळ जवळ ५० वर्षांनंतरहि ताजी आहेशी वाटते. श्रद्धाळू लोक ज्या भक्तिभावानें काशीरामेश्वरास जातात त्याच भक्तिभावानें आम्ही सिंहगडावर गेलों होतों. आणि त्या वीरपुरुषाच्या

समाधीवर डोकें ठेवून जेव्हां आम्ही आमच्या क्रांतिकार्यास त्या अदृश्य नरवीराचा आशीर्वाद मागत होतों तेव्हां तो नरशार्दूल जणुं काय आमच्या समोर अुभा आहे, असेंच आम्हांस तेव्हां वाटत होतें. तारुण्यसुलभ अशा आमच्या क्रांतिकार्याच्या आशा व आकांक्षांना त्या सफरीमुळें फारच बहर आला होता.

## बृहन्महाराष्ट्रभर क्रांतिकारकांचा प्रसार

पुणें हें अुच्च शिक्षणाचें अेक अत्यंत महत्त्वाचें असें महाराष्ट्रांतलें केंद्र असल्यानें पुण्यास आमच्या क्रांतितत्त्वप्रसाराच्या कार्यास पुष्कळच वाव मिळाला. बृहन्महाराष्ट्र व कर्नाटक यांतले होतकरू तरुण विद्यार्थी या शहरांतल्या अुच्च विद्यालयांत येत असल्यानें, आाणि येथला विद्याभ्यास संपवून ते आपापल्या ठिकाणीं विखरून जाअून सुप्रतिष्ठित होत असल्यानें, त्यांच्यांतूनच क्रांतिकार्योन्मुख तरुण हुषार विद्यार्थी निवडणें हें आम्हांस अिष्ट व सुलभ होतें. त्यांच्या निवडीनंतर त्यांना क्रांतितत्त्वांची दीक्षा देणें, विद्याभ्यासाबरोबर प्रबोधशक्तीचीं अुत्कृष्ट साधनें म्हणजे वक्तृत्व, लेखन व वादकुशलता यांत त्यांना तरबेज करणें, रोजच्या व्यायामानें त्यांचीं शरीरेंहि मनाबरोबरच सदृढ करणे हें येथें आम्हांस फारच सोयीचें झालें. ट्रेनिंग कॉलेजांत शिकून खेडोपाडीं शाळेवर जाणारे शिक्षक हे तर आमच्या क्रांतिकार्याला फारच अुपकर्ते झाले. त्यामुळें शेंकडों खेड्यांतून क्रांतिकार्याचा प्रसार होअील, अशी आमची आशा दुणावत होती. केसरी, काळ, भाला, विहारी यांसारखीं क्रांतितत्त्वप्रचारक वृत्तपत्रें, आणि ती खेडोपाडी तिखटमीठ लावून शिकवणारे समजावणारे शिक्षक, यांचा संयोग क्रांतिप्रचाराला फारच अनुकूल होता. डेक्कन, फर्ग्युसन व अितर कॉलेजांतून पदवीधर होणारे तरुण हे जर येथेंच क्रांतितत्त्वानें भारले गेले तर हे तरुण आपापल्या शहरांतून नवीन नवीन क्रांतिकेंद्रें निर्माण करतील अशी आम्हांस प्रबळ आशा वाटे. म्हणून पुण्यांतलीं हीं महत्त्वाचीं शिक्षणकेंद्रें हींच आमच्या क्रांतिकार्याचीं केंद्रें आम्ही ठरवून त्या अुद्योगाला अहर्निश लागलों होतों; आणि आमच्या अपेक्षेप्रमाणें आम्हांस थोडेंबहुत यशहि मिळालें होतें. महाराष्ट्रांतलें असें महत्त्वाचें शहर किंवा गांव नव्हतें कीं, जेथें या आमच्या केंद्रांतून आमचा अेखाद-दुसरा तरी क्रांतिदीक्षा घेतलेला तरुण नव्हता. पुणें, मुंबअी या

शहरांखेरीज अुच्च शिक्षणाचीं कॉलेजें अितर ठिकाणी तेव्हां नव्हती. त्यामुळें या दोन शहरांतलीं हीं मोक्याची ठिकाणें काबीज करणें, तेथल्या योग्य तरुणांना क्रांतिदीक्षा देणें, त्यांची शारीरिक, मानसिक, बौद्धिक तयारी करून त्यांना ठिकठिकाणीं क्रांतिकेंद्रे निर्माण करण्यास प्रवृत्त करणे, हें त्या वेळचें आमचें फारच मोठें कार्य होतें; आणि आम्ही तें यथाशक्ति करीतहि होतो. अपेक्षेप्रमाणें सर्व गोष्टी घडत गेल्या असत्या तर महाराष्ट्रांतील आमच्या कार्यकर्त्यांची करामत दिसूनहि आली असती. पण भवितव्यता निराळी होती. हें सर्व कार्य गुप्ततेनेंच चाललें असल्यानें त्याचा अुदयास्तहि अखेरीस गुप्तच झाला. या अनिवार्य गुप्ततेमुळेंच आमच्या कार्याची महती, त्याचा व्याप, विस्तार आणि प्रसार, यांची कल्पनाहि आतां करून देणें अशक्य आहे. पण आम्हीं आमचें कर्तव्य केलें, अेवढेंच समाधान आम्हांस पुरेसें आहे.

## प्रकरण चौथें

# मुंबअींतल्या प्रकट व गुप्त चळवळी

१९०६ मध्यें सावरकर व मी मुंबअीस गेल्यानंतर तेथेंहि आम्ही आमच्या क्रांतिप्रचाराचें कार्य सुरू केलें. त्यावेळीं "विहारी" हें मुंबअीस निघणारें वृत्तपत्र सावरकरांच्या हातीं आल्यानें क्रांतिप्रचाराचें नवें दालन त्यांनीं त्यांत अुघडलें. प्रथम ते पत्र आमच्या क्रांतिकारकांपैकींच अेक असलेले, व " संपूर्ण विवेकानंद " व "रामतीर्थ" या ग्रंथमालांचे कर्ते, रा. भास्कर विष्णु फडके हे काढीत असत. मूळचें ते रा. फाटक यांचें. पण ते नुसते व्यवस्थापक असत, लेखक नव्हते. सावरकर त्यांत लिहूं लागल्यापासून तें फारच जहाल व लोकप्रिय झाले, आणि त्याचा खपहि खूपच वाढला. त्या 'विहारी'च्या लेखांत सावरकरांचें कांहीं सर्वोत्कृष्ट लेख आलेले मला अद्याप आठवतात. दुर्दैवानें त्याच्या फायलीहि राहिलेल्या कोठें आढळत नाहींत. त्या सांपडल्या तर सावरकरांच्या काव्यप्रतिभेचा अुत्कृष्ट विलास व नर्तन त्यांत सांपडेल. सावरकरांच्या विलायतेच्या प्रयाणानंतर मीहि 'विहारीं'त कांहीं लेख लिहीत होतों. पण त्या पत्रांतले कांहीं लेख राजद्रोही ठरवून

सरकारनें भास्कररांव फडक्यांना, व पुढें रा. रामभाअू मंडलिकांना, शिक्षा ठोठावल्या, आणि त्यामुळें त्या पत्राचा अंत झाला.

या पत्रलेखनाबरोबर आम्ही मुंबअीच्या नवयुवकांना गांठून अभिनव भारताची त्यांना शपथबद्ध दीक्षा देण्याचें कार्य व साप्ताहिक गुप्त सभांचे कार्यक्रम चालूंच ठेवले होते. मी त्या वेळीं विल्सन कॉलेजांत गेलों होतों व सावरकर लॉ-क्लासमध्यें होते. विल्सन कॉलेजमध्यें त्यावेळीं आतांचे पंतप्रधान रा. बाळासाहेब खेर, पुढें संस्कृत विषयांत डॉक्टरची पदवी मिळालेले ( आतां कै. ) डॉ. प्रो. गुणे, धारवाडचे चंदावरकर, पुढें डिस्ट्रिक्ट जज्ज झालेले रा. गुंडिल, मुंबअीसच वास्तव्य करून राहिलेले नामांकित वकील मुर्डेश्वर, वगैरे माझे सहाध्यायी होते. या सर्वांना आम्ही अभिनव भारताचे सभासद करून घेतले होते, हें मागेंच सांगितलें आहे. नेहमीच्या आमच्या कांही साप्ताहिक बैठकी चिखलवाडींतल्या चाळींत, कांही शास्त्री हॉलमध्यें, कांहीं आम्ही राहात होतों त्या लॉजमध्यें, कांही अितर ठिकाणीं आम्ही भरवीत होतों. आमच्याबरोबर मुंबअीस विद्याभ्यासासाठी आलेले रा. थत्ते, आपटे वगैरे फर्ग्युसनमधील मित्रहि होतेच. त्यांखेरीज डॉ. थत्ते, बडोद्याचे सरदार मुजुमदार, डहाणूचे करंदीकर, रा. भाटे, पाटणकर, गोरे, शिवरामपंत अभ्यंकर, डॉ. भडकमकर, डॉ. आठवले हेहि या गोटांत दाखल झाले होते.

## माधवाश्रमांतला आमचा अड्डा

१९०६ च्या अुत्तरार्धांत, सावरकरांना शामजी कृष्णवर्मांची शिष्यवृत्ति मिळून ते विलायतेस बॅरिस्टर होण्यासाठीं गेल्यावर, मुंबअीच्या शाखेचें काम माझ्या अंगावर पडलें. त्या वर्षाच्या अखेरीस मी बी. अे.च्या परीक्षेंत अुत्तीर्ण होअून लॉ-क्लासमध्यें दुसऱ्या अेल्‌अेल्. बी.च्या टर्म्स, व ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये अेम्. बी. बी. अेस्.च्या पहिल्या वर्षांतल्या टर्म्स, भरूं लागलों. त्यावेळीं १९०७ मध्यें मी माधवाश्रमांत ( मोहन बिल्डिंगमध्यें ) राहात होतों. आमच्या कार्याचा तोच अड्डा झाला. सकाळ-दुपार मेडिकल कॉलेजांत, आणि संध्याकाळीं लॉ-क्लासमध्यें, अशा दुहेरी अभ्यासक्रमांत माझा बराच वेळ जाअी. पण अेल्‌अेल्. बी. होअून वकील झालों, व क्रांतिकार्यांत पडलेला म्हणून जर सरकारनें वकिलीची सनद रद्द केली, तर वकिलीची व संसाराची धुळधाणच होणार, ही गोष्ट सूर्यप्रकाशा-

अितकी स्पष्ट होती. कित्येक राजद्रोही वकिलांच्या सनदा सरकारने हायकोर्टा-मार्फत रद्द केल्याच होत्या. तें अुदाहरण डोळ्यापुढें असल्यानें, व या क्रांति-कार्यात केव्हां तरी सरकारचा रोष होणारच हेहि नक्की असल्याने, मी अेल्अेल्. बी. बद्दल फारसा अुत्सुक नव्हतों. पण माझाहि शिक्षणक्रम सावरकरांप्रमाणेंच माझ्या श्वशुरांच्या मदतीवर अवलंबून होता. आणि अेम्. बी. बी. अेस्.चा शिक्षणक्रम महागडा असल्यानें कदाचित् तो अपुराच राहील अशी भीति होती. म्हणून फर्स्ट अेल्अेल्. बी. पास झालोंच असल्यानें दुसऱ्या अेल्अेल्. बी.च्या टर्म्स तरी पदरांत पाडून घेअून, साधल्यास ती परीक्षाहि देअून ठेवावी या अुद्देशानें हें दुप्पट ओझें मीं पत्करलें होतें. आणि माझ्या अपेक्षे-प्रमाणें मला शेवटीं तुरुंगवासानंतर डॉक्टरीचाच आधार मिळाला. असो.

## बंगाली क्रांतिकारकांशीं नातें जुळवलें

लॉ-क्लास व मेडिकल कॉलेजमध्येंहि माझें क्रांतीला अनुकूल असणाऱ्या तरुणांचा लोकसंग्रह करण्याचें कार्य चालूंच होतें. १९०६ ते १९०८ ही वर्षेंहि हिंदुस्थानांत फारच धामधुमीचीं होतीं. १९०६ त कॉंग्रेसमध्यें जहाल पक्ष प्रबळ होत चालला होता. त्या डिसेंबरांत कै. दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षतेखालीं कलकत्त्यास कॉंग्रेसचें अधिवेशन होअून त्यांत स्वराज्य-प्राप्तीचा ठराव पास झाला होता. स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षणाबरोबर, वंगभंगामुळें संतप्त झालेल्या बंगाली लोकांच्या आग्रहामुळें, स्वराज्याचा ठराव करणें कॉंग्रेसला भागच झालें होतें. राज्यकर्ते अिंग्रज स्वराज्याच्या ठरावानें चिडतील व आपलें कोणतेंच म्हणणें अैकणार नाहींत, असें मवाळांना वाटे म्हणून त्यांना हें पसंत नव्हतें. आणि त्यामुळें ते स्वराज्याच्या ठरावाविरुद्ध होते. यानंतर बंगाल, मध्यप्रांत व महाराष्ट्र या प्रांतांत राजकीय चळवळ फोफावतच गेली. बंगालच्या वृत्तपत्रांवरून तर तेथें क्रांतिकारकांची हाल-चाल चालू असलीच पाहिजे, असा संशय सरकारास, व आम्हां अिकडच्या क्रांतिकारकांसाहि, येअू लागला होता. तेथें होणारीं राजद्रोही व्याख्यानें व वृत्त-पत्रांतले राजद्रोही लेख यांच्यावर जे खटले सरकार करीत होतें त्यांत सशस्त्र राज्यक्रांतीचा सूर स्पष्टपणें दृग्गोचर होत होता. 'युगांतर', 'संध्या', 'वंदे मातरम्' यांसारखीं वृत्तपत्रें तर अुघडअुघड राजद्रोहाचा व सशस्त्र क्रांतीचा पुरस्कार करीत होतीं. 'अनुशीलन-समिति', 'स्वाधीन भारत'

ही साधीं नांवें धारण करणाऱ्या गुप्त संस्था तेथें क्रांतिकार्यांत मग्न होत्या, हेंहि आम्हांस कळलें होतें. बाबा सावरकरांचे मित्र सदाशिवराव पालेकर (अिष्टंगुंड्ड) यांना बाबांनीं मुद्दाम तेथें पाठवून तेथल्या क्रांतिकारकांत प्रवेश करून घेतला होता. म्हणून तेथें प्रत्यक्ष जाअून, तेथल्या क्रांतिकारकांच्या कार्याचा व्याप किती आहे, शस्त्रास्त्रें व अितर साधनें किती जमवलीं आहेत हें पहावें, तेथल्या क्रांतिकारकांशी गाढ स्नेह जोडावा, आणि सहकार्यानेंच साऱ्या देशभर, निदान बऱ्याच प्रांतांत तरी, अेकदम सशस्त्र क्रांतीचा अुठाव करण्याची योजना आखावी, या हेतूनें मी व नाशिकचे त्या वेळचे पुढारी रा. बाबासाहेब खरे, वकील, या कॉंग्रेसच्या अधिवेशनाचें निमित्त करून, कलकत्त्यास गेलों आणि ८–१० दिवस तेथें राहून तेथल्या 'स्वाधीन भारत', 'अनुशीलन-समिति' वगैरे गुप्त संस्थांच्या चालकांशी संधानें बांधून, तेथल्या व्यापाची कल्पना घेअून परत आलों.

बंगालमधली तयारी आमच्याप्रमाणेंच, पण अधिक मोठ्या प्रमाणावर, चालली होती. शेंकडों क्रांतिकारक तरुण गुप्त संस्थांतून क्रांतीचें जाळें भरगच्च आणि घट्ट विणीत होते. बंगालवर कर्झनशाहीचा कडक अंमल अितका चालू होता कीं, साधे 'वंदे मातरम्' हे शब्द अुच्चारण्यासहि बारिसाल जिल्ह्यांत प्रतिबंध होता. ले. गव्हर्नर फुल्लर हा 'गोळ्या घालून मारूं' अशी लोकांस धमकी देत होता. बंगाल्यांतील नामांकित कार्यकर्ते हद्दपार होत होते. नवे दडपशाहीचे कायदे कर्झन पास करून घेत होता. त्यामुळें बंगाली क्रांतिकारक तर सारखे आग ओकीत होते. राजद्रोही म्हणून शाळा-कॉलेजांतून हद्दपार केलेले विद्यार्थी व शिक्षक राष्ट्रीय शाळा काढून त्यांत सशस्त्र क्रांतीचें, गुप्त संस्थांचें, शिक्षण देत घेत होते. याप्रमाणें सर्व बंगालभर वंगभंगानें क्रांतीच्या विचारांचा वणवा पेटवून दिला होता. प्रमथनाथ बानर्जी, चित्तरंजन दास, सेनगुप्त, चटर्जी, चक्रवर्ती वगैरे बॅरिस्टर, डॉक्टर, कांहीं जमीनदार हे या क्रांतिकारकांना कांहींशीं गुप्त मदत करीत. पण पुरेसे पैसे मिळत नव्हते. म्हणून क्रांतिकारकांनीं खजिने लुटणें, राजनिष्ठ जमीनदारांच्या घरांवर दरोडे घालून पैसा आणणें, हेंहि प्रकार चालू केले होते.

### मुंबअींतला गुप्त प्रचार

बंगालमधली ही परिस्थिति पाहून आल्यावर आम्हीहि दुप्पट जोरानें

आमच्या कार्यास सुरुवात केली. सरकारचा दडपशाहीचा वरवंटा जोरानें रगडीत चालला होता. सावरकरांच्या अितका मी फारसा प्रसिद्धीस आलों नसल्यानें, आणि प्रत्यक्ष गुप्त कार्याच्या सुरक्षिततेसाठीं, यानंतर मी प्रकटपणें कोणत्याहि चळवळींत पडेनासा झालों. सावरकरांचा पत्रव्यवहार फुटतो अशी शंका आल्यानें मीं त्यांच्याशीं पत्रव्यवहारहि बंद ठेवला. १९०७ च्या अखेरीस मला पहिल्या अेम्. बी. बी. अेस्.ला बसावयाचें होतें, म्हणूनहि मला वेळ हवा होता. या सर्व कारणांनीं बाह्य चळवळी मीं आंखडत्या घेतल्या. शिवाय आमची अितर मंडळी कार्यतत्पर झाली होती. नासिकचे "मित्र-समाज" या गुप्त संस्थेंतले रा. कृष्णाजी गोपाळ कर्वे हे यावेळीं मुंबअीस शिक्षणासाठीं आले होते. अेल्फिन्स्टन कॉलेजमध्यें त्यांचीहि कांहीं गुप्त मंडळी होती. आमच्यापैकीं रामभाअू भाटे हे मुंबअीच्या आर्ट स्कूलमध्यें अभिनव भारताचें कार्य करीत होते. दुसरे अेक आमचे क्रांतिकारक मित्र घनश्याम सदाशिव केळकर हे व्हि. जु. टेक्निकल अिन्स्टिटयूटमध्यें क्रांतीचें बीजारोपण गुप्तपणें करीत होते. कर्व्यांचे मित्र रा. दुगुल, गोगटे, नागपूरकर, मोघे हेहि त्या संस्थेंतच होते. फर्ग्युसनमधले रा. कृष्णाजी गोपाळ खरे हे बॉंबच्या तयारीचें शिक्षण, प्रो. गज्जरांच्या लॅबोरेटरींत, अेम्. अे.च्या अभ्यासाचें निमित्त करून, घेत होते. याप्रमाणें अेल्फिन्स्टन, विल्सन व मेडिकल कॉलेजें, लॉ-क्लास, व्हि. टेक्निकल अिन्स्टिटयूट, गज्जरांची प्रयोगशाळा, आर्ट स्कूल वगैरे जेवढ्या उच्च शिक्षणाच्या संस्था होत्या त्यांत आमचे व अितर कार्यकर्ते आपापली क्रांतिप्रवण कार्यें करीतच होते. मागें वर्णिल्याप्रमाणें भावी तरुण पिढी क्रांतीला अनुकूल करण्यासाठीं सर्व शैक्षणिक केंद्रें हस्तगत करण्याची जी आमची योजना होती त्याप्रमाणें आमचें क्रांतिकार्य अविरत पण गुप्तपणें चालूंच होतें.

याशिवाय रेल्वे, पोस्ट, कस्टम्स्, हायकोर्ट, सेक्रेटरिअेट, तार ऑफिस, हवामान खातें, हाफकीन अिन्स्टिटयूट वगैरे सरकारी केंद्रांतूनहि आमच्या क्रांतिकारकांनीं चंचुप्रवेश केला होता. क्रांतीच्या तयारीचें हें अंग फार महत्त्वाचें असतें. सरकारी खात्यांतून आपले लोक ठेवल्यानें सरकारच्या हालचालींवर, धोरणावर, नजर राहते, आणि कित्येक वेळां या हेरगिरीनें अचानक फायदाहि मिळतो. आम्हांस या हेरगिरीचा बराच

फायदा मिळे. रेल्वेंत आमचे लोक असल्यानें त्यांना हवें तेव्हां, हवें तेथें, गुप्त कार्याकरितां पाठवतां येअी. टिळकांच्या १९०८ च्या खटल्यांत आम्हीं तार-खात्यांतून कशा बातम्या मिळवल्या, त्याची हकीकत ‘ अभिनव भारतावरील हल्ले ’ या प्रकरणांत पुढें येअीलच. ठिकठिकाणीं आमचे क्रांतिकारक सरकारी नोकरींत तर होतेच, पण आमचे भास्करराव खरे हे तर दिल्लीस अिंपीरिअल सेक्रेटरिअेटपर्यंत पोंचले होते. अर्थात् हे सर्व लोक क्रांतिकारक होते, हे आमच्याखेरीज अितर कोणासहि माहीत नव्हतें. सरकारी नोकरांनीं कोण-त्याहि राजद्रोही चळवळींत उघड वा गुप्त भाग घेअू नये या धोरणाचें चिलखत सरकारचें अंगावर असलें तरी आम्ही त्याला शतशः भोकें पाडूं शकलों होतों.

## देशभर अेकदम अुठावणीची योजना

१९०७ च्या अखेरीस जी सुरतेस कॉंग्रेस भरली तिला बंगालचे बाबू अरविंद घोष, बिपिनचंद्र पाल वगैरे प्रकट व गुप्त संस्थांचे पुढारी येणार, असें कळल्यावरून त्यांना भेटण्यासाठीं आमच्यापैकीं मीं व इतर कांहीजण असें मुद्दाम गेलों होतों. नाशिकहून बाबा सावरकर, बाबासाहेब खरे, गद्रे वकील व अितर मंडळीहि बंगालच्या गुप्त संस्थांच्या पुढाऱ्यांस भेटण्यास आलीं होतीं. कॉंग्रेसला हजर राहणें हें नुसतें निमित्त होतें. बडोद्याच्या आमच्या शाखेंतूनहि बॅ. देशपांडे वगैरे पुढारी आले होते. तेथें आमच्या व बंगालच्या क्रांतिकारक पुढाऱ्यांच्या गांठी-भेटी झाल्या आणि अेक गुप्त बैठकहि झाली. पूर्वनियोजित कार्यक्रमानुसार, सर्व हिंदुस्थानभर सशस्त्र क्रांति करण्याची तयारी पुरी होअीपर्यंत, कोणीहि अुतावळेपणानें अुठावणी करूं नये, असें पुन्हा अेकवार, अेकमेकांच्या गुप्त तयारीच्या माहितीची देवाण-घेवाण झाल्यावर, ठरलें. त्या अधिवेशनास मद्रासचे तत्कालीन पुढारी चिदंबरम् पिले व पंजाबचे कांहीं तुरळक क्रांतिकारक आले होते. या बैठकींत दिल्या घेतलेल्या माहितींपैकीं खरी तयारी किती याबद्दल मात्र अुभयपक्षीं शंका घेण्यास जागा होती. कारण पुढें मद्रासकडे फारसें कार्य दृष्टीस पड-लेंच नाहीं. सुरतेस कॉंग्रेसमध्यें फूट पडली. आम्ही मात्र आमचें अुद्दिष्ट सफळ झाल्याचें समाधान मानून परत फिरलों.

बंगालमध्यें १९०७ च्या अुत्तरार्धांत हेमचंद्र दास हे बॉंबची विद्या हस्तगत करून विलायतेहून परत आल्याबरोबर त्यांनीं त्याचे प्रयोग करण्यास

सुरुवात केली. आणि ले. गव्हर्नरची गाडी, रुळाखालीं बॉंब ठेवून, अुडवण्याचा प्रयोगहि झाला. तो त्याच्या शिकंदर नशिबानें फसला म्हणूनच वांचला. पिस्तुलांच्याहि अिंग्रजावर फैरी झडावयास लागल्या. बंगालचें हें धाडस पाहून आमच्या मुंबअी प्रांतांतल्या क्रांतिकारकांतहि पिस्तुलें, तरवारी, बंदुका मिळवण्याची व बॉंब तयार करण्याची तयारी झाली. त्यासाठीं दोन प्रकरणें पुढें स्वतंत्र दिलीं असल्यानें येथें अितकेंच सांगून ठेवतों कीं, आमची, सर्व देशभर, ठिकठिकाणीं, अेकदम अुठाव करण्याची योजना जर फसली नसती तर देशांत आगामी क्रांतीचे भयसूचक बॉंबचे स्फोट, व कित्येक अधिकाऱ्यांचे वध, अेकाच वेळीं घडवून आम्ही अिंग्रज सरकारास, विशेषतः अधिकाऱ्यांस, त्राहि भगवन् करून सोडण्याअितकी सामुग्री आमच्याजवळ जय्यत तयार होती. वसअीचा आमचा बॉंबचा कारखाना म्हणजे ठिकठिकाणच्या विश्वासू क्रांतिकारकांना बॉंब तयार करण्याची कृति शिकवण्याची अेक गुप्त शाळाच झाली होती.

प्रकरण पांचवें

# अभिनव भारताचें विलायतेंतलें कार्य

विलायतेंत गेल्यावर सावरकरांनीं 'अिंडिया हाअूस' हें क्रांतिकारकांचें अेक केंद्रच निर्माण केलें. विलायतेंत असलेल्या त्या वेळच्या बऱ्याचशा हिंदी तरुणांना त्यांनीं अभिनव भारताच्या माळेंत ओंवले. सेनापति बापट हे त्यावेळीं विलायतेंतच होते. पुढें पंजाबचे मुख्य प्रधान झालेले सर शिकंदर हयात; मद्रासचे आतांचे सचिव डॉ. राजन्, पिले, अय्यर; दक्षिण आफ्रिकेंतले पुढारी बॅ. पाथर; कर्झन वायलीला ठार करणारा मदनलाल धिंग्रा; कीनियामध्यें कांही वर्षें अेक्झिक्युटिव्ह कौन्सिलर झालेले बॅ. फडके; कोरगांवकर अिंजिनिअर, अुत्तर हिंदुस्थानांतले बॅ. मिर्झा अब्बास, बॅ. ग्यानचंद्र वर्मा, सरोजिनी नायडूंचे बंधू वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय, पंजाबचे विख्यात क्रांतिकारक लाला हरदयाळ, भाअी परमानंद, हरनामसिंह, पॅरिसचे राणा, मॅडम कामाबाअी, गुरुकुलांतले महेशचरणसिंह, मुंबअी कॉर्पोरेशनचे कांहीं वर्षें केमिकल अन्यालिस्ट असलेले डॉ. जोशी ( ख्रिस्ती ), डॉ. अेरुळकर, हेमचंद्रदास, नीतिसेन द्वारकादास, डॉ. मेथा, डॉ. मुथू, बिपिनचंद्रपालांचे

चिरंजीव निरंजनपाल, डॉ. देशमुख, प्रो. गोद्दोकर, प्रो. कुटिन्हो वगैरे शेंकडों हिंदी तरुण अभिनव भारताच्या क्रांतिछत्राखालीं लंडनमध्यें राजद्रोहानें मुसमुसत होते. हिंदुस्थानांतल्या निरनिराळ्या प्रांतांतून बॅरिस्टर, आय्. सी. अेस्., अिंजिनिअर, डॉक्टर होण्यासाठीं त्या कालांत बरेच विद्यार्थी जात. ते जर क्रांतीला अनुकूल होअून सशस्त्र क्रांतीचा धुमधडाका आपापल्या प्रांतांत अुडवण्यास अुद्युक्त झाले, तर अखिल हिंदुस्थान अेकाच हुकमी क्रांतिछत्राखालीं येअून अेकदमच अुठावणी करील, ही सावरकरांची अपेक्षा व योजना होती. आणि त्या हेतूनेंच त्यांनी प्रयत्न चालवले होते. विलायतेंत शस्त्रांचा कायदा सौम्य असल्यानें पिस्तुलें पोस्टाच्या तिकिटाप्रमाणें मिळत. हे सर्व तरुण त्याचा फायदा घेऊन नेमबाजींत तरबेज झाले होते. रशियांत त्यावेळीं बॉंबसारखें प्रभावी साधन क्रांतिकारकांनीं योजलें असल्यानें या तरुणांपैकीं कांहींनी (विशेषतः सेनापति बापट, होतिलाल वर्मा व हेमचंद्र दास यांनीं) त्याचा अभ्यास व प्रयोगाचें शिक्षण रशियन क्रांतिकारकांकडून घेतलें. व त्याची कृति वर्णन करणारें अेक चोपडें घेअून, नांव बदलून, बापट हिंदुस्थानांत येऊन पोंचले; हेमचंद्र कलकत्त्यास परतले, होतिलाल वर्मा हे अमेरिका, जपान, चीनमार्गें परतून पुण्यास आल्यावर त्यांनीं बॉंबच्या कृतीचें पुस्तक लो. टिळकांना अर्पण केलें. हॉंगकॉंगला सैन्यांत राजद्रोह पसरवल्याबद्दल पुढें यांना शिक्षा झाली.

हे सर्व अुद्योग चालू असतांनाच सावरकरांनीं अिटलीचा रामदास व प्रसिद्ध क्रांतिकर्ता जोसेफ माझिनी याचें अत्यंत सुंदर चरित्र लिहिलें. नंतर '१८५७ चें स्वातंत्र्ययुद्ध' व 'शिखांचा अितिहास' हींहि पुस्तकें त्यांनीं लिहिलीं. पण तीं त्या काळांत अप्रकाशितच राहिलीं. त्याबद्दलचा अुल्लेख सावरकर-चरित्रांत आहेच. १८५७ चें हस्तलिखित १९४९ सालापर्यंत प्रो. कुटिन्हो यांनीं पोर्तुगालमध्यें सुरक्षित ठेवून नंतर तें अमेरिकेंत आपल्याबरोबर नेलें. आतां तें त्यांनीं सावरकरांकडे पुन्हा पाठविलें आहे. शिखांच्या अितिहासाचा मात्र पत्ता नाहीं. असो.

विलायतेहून हे तरुण आपापले अभ्यास संपवून परत येत तेव्हां ते मुंबअीस मला, व नंतर नाशकास बाबा सावरकरांना, भेटून तिकडील सर्व हकीकत अित्थंभूत कळवीत. त्यांच्याकडूनच बॉंबच्या कृतीचें अेक पुस्तक

आम्हांस मिळालें होतें. आणि तदनुसारच बंगालमध्यें व महाराष्ट्रांत आमचें बाँब करण्याचे प्रयत्न चालू होते. त्याचें अेक स्वतंत्र प्रकरणच पुढें दिलें असल्यानें येथें त्याचा नुसता निर्देशच पुरे.

सावरकरांनीं युरोपखंडांत व अमेरिकेंतहि क्रांतीला अनुकूल अशा चळवळी थोड्याफार चालू केल्या होत्या. हरदयाळ व वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांची कॅनडा व जर्मनी यांसाठी योजना झाली होती. शामजी कृष्णवर्मा, बॅ. राणा व अितर कांही मंडळी फ्रान्समध्यें खटपटींत होतीं. रशियन क्रांतिकारकांशींहि या मंडळींनीं संधान जुळवलें होतें.

विलायतेंत सावरकरांनीं ज्या खटपटी, योजना, तयार केल्या त्यांची संपूर्ण माहिती तेच लिहूं शकतील. सेनापति बापटांना ती लिहून पाठवण्याबद्दल मीं विनंती केली होती. त्यांनीं एक लहानसें टांचणच पाठवलें. त्यांच्या चरित्रांत ती थोडीशी आली आहे. म्हणून मी तिचा येथें पाल्हाळ करीत नाही. सावरकरांनाहि मीं ती लिहून काढण्यासाठी पुष्कळ वेळां विनंत्या केल्या, गळ घातली, पण अद्याप त्यांनी ती लिहून काढली नाहीं हें दुर्दैव आहे. बाबांना जी माहिती होती ती त्यांच्या चरित्रांत प्रसिद्ध झालेलीच आहे. 'सावरकर-चरित्रांत'हि रा. करंदीकरांनी ती वर्णिलेली आहे. मीं वर दिली तेवढीच माझ्या स्मृतीच्या चाळणींत शिल्लक आहे. त्यांच्या सहकाऱ्यांपैकीं मद्रासचे डॉ. राजन्, मुंबअीचे डॉ. अेरूळकर, व आफ्रिकेंतले बॅ. पाथर यांनाहि पण मीं लिहिलें. पण फलनिष्पत्ति कांहींच झाली नाहीं. अगोदरच या सर्व गुप्त खटपटी. त्यामुळें ज्यांनीं त्या केल्या त्यांनाच त्यांची पुरती माहिती असणार. त्यांपैकीं हरदयाळ, परमानंद, अय्यरसारखे कांहीं कैलासवासीहि झालेले. कांहीं परागंदा होऊन निराशेंत खचलेले. डॉ. राजन्सारख्या कांहींचीं मतें बदललेलीं. अशा विविधतेमुळें कोणींच तें प्रकरण लिहून ठेवलेंहि नाहीं आणि पाठवलेंहि नाहीं. त्यामुळें आत्मचरित्राचा हा अेक भाग, क्रांतीच्या चळवळीचा परिपाक म्हणून, सावरकरच जर तो लिहितील तरच त्यांच्या व हिंदुस्थानच्या सशस्त्र क्रांतीच्या चळवळीचा अेक अत्यंत रोमहर्षक खंड अुजेडांत येअील. सध्या तरी ते प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे लिहूं शकत नाहींत, असें त्यांच्यां चिरंजीवांनीं मला कळवलें आहे. त्यामुळें हें विलायतचें क्रांतिप्रकरण येथेंच अर्धवट किलकिलें

करून तसेंच सोडणें मला प्राप्त आहे. अितकें मात्र खरें कीं, त्यांचे हात विलायत, युरोपांतले कांहीं देश, व अमेरिकेंत कानडा या विशाल भूभागांवर पसरले होते. अिंग्रज सरकारला त्याची माहिती होती. आणि म्हणून त्यांना बॅरिस्टरीची परवानगीहि त्यांनी नाकारली. अखेर आत्मसंरक्षणासाठीं, व क्रांतिकार्य निर्वेध चालूं राहावें म्हणून, अिंग्लंड सोडून त्यांनीं फ्रान्समध्यें पुढें वास्तव्य केलें. हिंदुस्थानांतली आमची चळवळ अचानक फसली म्हणून, आम्ही नको नको म्हणत असतां, त्यांस तशा सूचनाहि पाठवल्या असतां, ते विलायतेस गेले आणि अिंग्रजांच्या पाशांत सांपडले. करंदीकरांच्या ‘ सावरकरांच्या चरित्रांत ’ त्यानंतरची माहिती आलेलीच आहे.

## प्रकरण सहावें

# अभिनव भारताची शस्त्रास्त्र-सिद्धता

अभिनव भारताच्या बाह्य पसाऱ्याच्या आंत, अंधारांत, गुप्त कार्यांचा प्रचंड व्याप चालूंच होता. ठिकठिकाणी पारखून घेऊन, शपथबद्ध झालेल्या तरुणांना गुप्तपणानें ऐकत्र आणून, त्यांच्या शाखा काढून, संघटनेचें व शस्त्र-संग्रहाचें काम चालूंच होतें. अिंग्रज सरकाराविरुद्ध सशस्त्र सामना द्यावयाचा म्हणजे आपलीहि प्रचंड संघटना हवी, आणि तीहि सशस्त्र, समृद्ध आणि समर्थ हवी, यांबद्दल वादच नव्हता. अिंग्रज सरकाराइतकें सशस्त्र सैन्य आपण स्वतंत्रपणें अुभारूं शकणार नांहीं; पण, हिंदी सैन्यांत व पोलिसांत आपल्या मतांचा प्रसार करून, सैन्य व पोलिस फितवले म्हणजे तेंच सैन्य अनायासें आपलें होअील, अशा अितिहाससिद्ध क्रांतीच्या कल्पनेनें आमचे अुद्योग चालू होते. पण सैन्यांत प्रवेश मिळणें तेव्हां महादुर्घट काम होतें. ठराविक जातींनाच तेव्हां सैन्यांत प्रवेश मिळे. पोलिस, रेल्वे, रेव्हिन्यू, न्याय, तुरुंग, तार, अिंजिनिअरिंग वगैरे खात्यांत मात्र आपलीं माणसें गुंतवणें, किंवा त्यांतलीं आत्मसात् करणें, हें त्यापेक्षां सोपें काम होतें. आणि त्याला सुरुवात

चांगलीच झाली होती. अिंग्रज सरकारच्या राज्ययंत्रांत पुष्कळशीं माणसें आपलींच आहेत, तींच आपल्या मताचीं झालीं कीं तें राज्ययंत्र, बाहेर क्रांतीची अुठावणी होतांच, अेकदम आपण आपल्या हातांत घेअूं शकूं, अशी आमची योजना होती. आंतून व बाहेरून असे हल्ले चढवले, व विशेषतः १८५७ प्रमाणें, किंवा १९४५–४७ मध्यें सुभाषचंद्रांच्या हाताखालीं, सैन्य फितलें, तसें झालें तर अिंग्रजांचे बारा वाजवण्यास वेळ लागणार नाहीं, हें अनेक देशांच्या राज्यक्रांत्यांच्या अितिहासावरून आम्हीं काढलेलें निर्विवाद सत्य होतें.

## बौद्धिक व सैनिकी शिक्षण

गुप्तशाखेचा सभासद निवडण्यांत आम्ही बरीच दक्षता घेत होतों. समानशील मित्रांपासून सुरवात होअी. त्याचे आचारविचार, कुलशील, बुद्धिमत्ता, शरीरसामर्थ्य, स्वार्थत्यागाची तयारी, स्वभाव याची प्रतीति आली म्हणजे संस्थेंत त्याबद्दल कोणी तरी सभासद सूचना आणी. अितर सभासदांना त्याची ओळख पटली तर लौकरच त्याला शपथ घेऊन सभासद होतां येत असे. पण ओळख नसल्यास ३–४ सभासदांनीं त्याची ओळख पाहून, पुन्हा त्याची चांचणी होअी. त्या सर्वांचें मत अनुकूल पडलें तरच त्याचा शपथविधि होत असे, नाहीतर नाही. श्रीरामकृष्ण, श्रीशिवाजी-महाराज यांच्यासमोर, त्यांच्या तसबिरीवर हात ठेवून, शपथ घ्यावी लागे. शपथेचा नमुनाहि ठरलेला असे. शपथबद्ध झाल्यावर त्याला दर साप्ताहिक बैठकींत प्रवेश मिळे. पुढारीपणाच्या शिक्षणासाठीं दर आठवड्यास कांहींतरी अैतिहासिक, पौराणिक, धार्मिक, सामाजिक विषयांवर वादविवाद होत. त्याला अेखाद्या विषयावर बोलण्यासहि आम्ही लावीत असूं. त्याच्या मानसिक अुन्नतीसाठीं निरनिराळ्या देशांच्या क्रांत्यांचे अितिहास, हिंदुस्थानांतल्या व जगांतल्या वीर पुरुषांचीं चरित्रें, त्यांनीं सोसलेले देहदंड, त्यांचा निरुपम स्वार्थत्याग व प्रसंगावधान, त्यांची कर्तव्यनिष्ठा व तत्परता, त्यांचा दीर्घोद्योग या सर्वांचे परिणाम त्याच्या मनावर व्हावे म्हणून त्यास ग्रंथ वाचावयास देऊन त्याबद्दलची त्याची परीक्षाहि थोडीबहुत घेत असूं. त्याच्या शारीरिक व सैनिक शिक्षणासाठीं प्रत्यहीं तालीम, पोहणें, धांवणें, डोंगरकडे चढणें-अुतरणें, अुपासमार, थोडेंफार हत्यारांचें शिक्षण, नेमबाजी वगैरेंची

सोय आम्ही केली होती. बडोद्याहून प्रो. माणिकरावांच्या तालमींतले अिब्राहिम भाअी हे यासाठीं आम्हीं मुद्दाम आणवले होते. ते या सर्व विद्या तरुणांना शिकवीत ( वर्तकांचा लेख ). तसेंच जुन्नरकडचे अेक जाधव नांवाचे गृहस्थहि या कार्यासाठीं नियोजित केले होते. डोंगरावर लुटुपुटीच्या लढाया, मर्दानी खेळ, धांवणें, पोहणें यांच्या शर्यती वगैरे सर्व प्रकार चालू असत. याप्रमाणें शपथबद्ध सभासदांच्या शारीरिक, बौद्धिक व सैनिकी शिक्षणाची व्यवस्था आम्हीं केली होती. ही अगदी काटेकोरपणानें शक्य तितकी पाळली जावी म्हणून आमची योजना होती. पण आम्ही सर्व स्वयंसैनिक होतों. घरचे पोटापाण्याचे अुद्योग किंवा शाळाकॉलेजांतलें शिक्षण वगैरे व्यवसाय संभाळून अुरल्या वेळांत हें काम करावें लागे. पण तें सहसा कोणी चुकवीत नसे. प्रसंगविशेषीं तर रोजचे अुद्योगधंदे सोडूनहि मंडळी अेकनिष्ठेनें कार्यतत्पर असत. क्रांतीचें काम मुख्य प्रचंड संघटनेचें. त्याला अेक निष्ठेची, अेकदिलाची, बंधुप्रेमाची भावना जाज्वल्य असावयास पाहिजे. या देशबंधुप्रेमाचा परिणाम सभासदांवर अितका होअी कीं, घरचींदारचीं भांडणें, भाअूबंदक्या, अुखाळ्यापाखाळ्या सर्व नाहींशा होत. अेकमेकांतून कधीं विस्तवहि जावयाचा नाहीं अशा कोर्ट-कचेऱ्यापर्यंतच्या भाअूबंदक्या या देशभक्तीच्या प्रेमाच्या भट्टींत पार वितळून जाऊन पुन्हा ते भाअू भाअू कायमचे अेक झालेले आम्हीं पाहिले आहेत. अुच्चनीच भावहि आम्ही ठेवत नव्हतों. नुकतेच कैलासवासी झालेले नागपूरचे विश्वनाथराव केळकर यांनीं तर आपल्या वडिलांनाहि शपथ दिली होती ! आणि मुलाकडून ती घेण्यांत त्यांनाहि कमीपणा वाटला नाहीं. याप्रमाणें सभासदांची बौद्धिक, नैतिक व शारीरिक, अुन्नति व्हावी, व अभिनव भारताचा सभासद अष्टपैलू पुढारी असावा, म्हणून आम्ही शक्य तितकी व्यवस्था व खबरदारी घेत होतों आणि आमच्या या प्रयत्नांना यशहि आलें होतें. सभासदांच्या निवडींत आम्ही जातगोत कांहीं मानीत नव्हतों. त्यामुळें सर्व जातींचे लोक आमच्यांत येण्यास हरकत नसे. तसेंच आमच्या या भव्य व विशाल देशप्रेमाच्या कल्पनेनें अठरापगड जातींचें खाणेंपिणेंहि कधीं कधीं अेकत्र अेका पंक्तींत होअी. त्यामुळें जातिभेदाच्या विषारी भावनेपासून आम्ही मुक्त होतों. अशा शेकडों सभासदांच्या शाखा सर्व महाराष्ट्रभर, देशभर, अुभाराव्या असे आमचे प्रयत्न चालू होते.

बंगालप्रमाणेंच संघटनेच्या गुप्ततेसाठीं फक्त शाखांच्या मुख्यांनींच अेकमेकांची ओळख ठेवावी व संस्थेच्या कार्याबद्दल वाटाघाट करावी असा सक्त नियम होता. सर्वच सभासदांची सर्वांनाच माहिती नसावी म्हणून हें तत्त्व आम्ही परोपरीनें अगदीं कटाक्षानें पाळलें होतें. गुप्तता, सुरक्षितता, घटनासौकर्य या सर्व दृष्टींनीं असें करणें अिष्टच होतें. त्यामुळें अेखाद्या शाखेंत कांही अनिष्ट प्रकार घडला तर त्याची झळ इतर शाखांस लागत नव्हती. पण हा नियम जसा संघटनेला अनुकूल तसाच तो प्रसंगीं प्रतिकूलहि होत असे. पण त्याला अिलाज नव्हता आणि शेवटीं त्याची प्रतिकूलताच आम्हांस भोंवली.

दरिद्रीनारायणांचा त्याग

गुप्तपणें हत्यारें मिळविणें, आणणें, सुरक्षित ठेवणें, बॉंब तयार करण्यासाठी रासायनिक पदार्थ आणणें, गुप्त ठिकाणीं त्यांची भट्टी लावणें, वगैरे सर्व कार्यास प्रचंड द्रव्यसाहाय्य हवें होतें. आणि, आम्ही बहुतेक सर्व दरिद्रीनारायण असल्यानें, तेंच आमच्याजवळ नव्हतें. किरकोळ वर्गण्या व देणग्या यांनी काय कात होणार ? तरीपण कै. बाबासाहेब खरे यांनीं मधून-मधून कांही मदत दिली होती. धनाढ्यवर्ग आमच्यांत येत नव्हता. हिंदुस्थानच्या सशस्त्र राज्यक्रांतीची आवश्यकता व शक्यता त्यांना तेव्हां वाटत नव्हती. सरकारचा गदारोळ त्यांच्यावर फिरत नव्हता. अुलट अिंग्रज सरकार त्यांचें पाठिराखें होतें. म्हणून त्यांच्याकडून फारसें कांहीं मिळण्याची सोय नव्हती. बाबा थोडेफार पैसे जमवीत; पण ते बाह्य प्रकट कार्यालाच पुष्कळसे खर्च होत. अेखादा क्रांतिप्रेमी श्रीमंत सावकार पैशाची लालूच दाखवी; पण कांहीं अटींवर. त्या अटींपैकीं अुदाहरणार्थ अेक अट म्हणजे टिळकांना शिक्षा देणाऱ्या सरकारच्या बगलबच्चा न्या. डावरला मारण्याची होती. ८ हजार रुपयांचें त्यासाठीं बक्षीस होतें. अण्णा कर्वे त्यासाठीं कांहीं दिवस डावरवर टेहळणी करीत होते. ब्रह्मगिरीबुवा व र. वि. भावे हेहि त्या अुद्योगांत होते; पण संधि सांपडली नाही. आणि अर्थात् ८ हजार रुपयेहि मिळाले नाहीत. बगालमध्येंहि क्रांतिकारकांना पैशांची अशीच पंचाअीत पडली होती. " राजनैतिक कारस्थानाच्या " पहिल्या खंडात बारींद्राला अेक हजार रुपये, क्रांतिकारक संपादकांना शिक्षा देणाऱ्या किंग्जफर्ड

मॅजिस्ट्रेटला मारण्यासाठीं कसे दिले, व तें काम न होतां चुकून दोन केनडी स्त्रियाच बॉंबला कशा बळी पडल्या, आणि म्हणून बारींद्राला ती रक्कम पै-पैसा करून कशी परत करावी लागली, याची हकीकत दिली आहे. क्रांतीला पैसे देणाऱ्यांच्या या अटी पुऱ्या करणें अशक्य होतें, हें त्या धनिकांना कळत नव्हतें. पण आमच्यासारख्या भणंग-भिकाऱ्यांच्या अिच्छेला विचारतो कोण ? अिच्छाभोजन कोण घालणार ? ( Beggars cannot be choosers ). म्हणून भिक्षा, देणग्या, मागावयाला जावें तर ते म्हणत कार्य दाखवा. आम्ही म्हणत असूं कीं, कार्य दाखविण्यासाठींच अगोदर पैसा द्या. असा हा पेंच होता. या शृंगापत्तींतून सुटणें कठिण होतें. या पेंचप्रसंगामुळेंच सार्वत्रिक योजनेअैवजी निरनिराळ्या ठिकाणीं अुठावणी करणें, केवळ पैशासाठींच, अवश्य आहे, असें हेमचंद्र दास सेनापति बापटांना म्हणाले होते. आम्ही तरी आमच्या पोटाला चिमटा किती घेणार ? बिचाऱ्या बंगाली क्रांतिकार-कांनीं तर अितकें दारिद्र्य पत्करलें होतें कीं, भाज्यांचा सुद्धां खर्च लागूं नये म्हणून नारळाच्या करवंट्यांच्या वाट्या करून त्यांतून ते पदार्थ वाढीत व खात ! मातीच्या सुरया व परळें हीं त्यांचीं अन्न रांधावयाचीं भांडीं होतीं ! हेमचंद्र दासनें तर स्फोटकास्त्र ( बॉंब ) विद्या शिकावयास घरदार विकलें होतें ! बाबांनीं व त्यांच्या पत्नी येसूवहिनी यांनीं जन्मभर अठरा विश्वें दारिद्र्यांत पिचत दिवस कसे काढले हें " बाबाराव सावरकरांच्या " चरित्रांत रा. द. न. गोखले यांनीं दाखविलेच आहे. विनायकराव सावरकर आणि मी आमच्या श्वशुरांच्या द्रव्यसाहाय्यावरच कॉलेजचा शिक्षणक्रम अुरकीत होतों. त्यापूर्वी हायस्कुलांत तर माझ्या घरीं, दरमहा १० रुपयांपैकीं २॥ रु. हायस्कूलची फी देऊन, ७॥ रुपयांत मी, आजी व आअी अशीं तीन माणसें आपला रुटुखुटु संसार करीत होतों ! आबा दरेकर – गोविंद कवि – यांची आअी तर भांडीं घासून गुजारा करी ! अशा अठरा विश्वें दारिद्र्यानें ग्रास-लेल्या आम्हां अभिनव भारताच्या सदस्यांनीं काटकसर केली तरी किती पैसा जमणार ? त्यांतहि आमचे टिळक-परांजप्यांसारखे आधारस्तंभ तुरुंगांत गेलेले. सर्व पुढारी त्या धक्क्यानें हतबल झालेले. अशा स्थितींत आम्ही होतों.

तरी पण अंगीकृत कार्य तडीस नेण्याचा आम्हीं संकल्प केलाच होता. कांहीं काटकसर, कांहीं अुधारअुसनवारी, कांहीं देणग्या, आणि हेमचंद्र-

दासाप्रमाणें आमच्या परम स्वार्थत्यागी कांहीं मित्रांनीं घरांतलें कांहीं किडुकमिडुक मोडून कांहीं पैसे अुभारले. याच सुमारास आम्हांस १५० रु. बेळगांवचे तेव्हांचे क्रांतिकारक देशभक्त गंगाधरराव देशपांडे यांनीं दिले होतें. कांहीं पिस्तुलें व बॉंब तयार करण्याचें कच्चें सामान व अुपकरणें घेण्यापुरती तरी आम्ही अभिनव भारताच्या सभासदांनीं याप्रमाणें पैशांची तरतूद केली. मधुकरी, अुसनवारी व चोरी ( Beg, Borrow or Steal ) या तीन साधनांपैकी आमच्या अभिनव भारताच्या मंडळींनी चोरी करून मात्र पैसा जमविला नव्हता. आणि पैशांची अतिशय तंगी झाल्यावर, गोपाळराव पाटणकरांनी तशी सूचना केली असतां, आमच्या स्फोटकास्त्र शाखेच्या चालकांनींच ( रा. भाट्यांनीं ) ती हाणून पाडली. पैसे जमविण्याचें काम पाटणकरांनीच पत्करलें असल्यामुळें बिचाऱ्यानें आपल्या घरचें कांही दागिने विकूनहि ती गरज तात्पुरती भागविली. बंगाली क्रांतिकारकांप्रमाणें पुढें आम्ही सरकारी खजिने व आयतोबा नाठाळ श्रीमतांची घरें लुटण्याचा मार्ग पत्करला नसताच असें मात्र नाही. शिवाजी महाराजांनी सुरत लुटल्याचा, व हिंदी आणि पाश्चात्य क्रांतिकारकांनीं असलेच मार्ग पत्करल्याचे, अैतिहासिक दाखले आमच्याजवळ भरपूर होतेच.

### द्रव्यासाठीं वक्र अुपाय

मागें सांगितलेंच आहे कीं, अभिनव भारताची कर्व्यांची शाखा ही आमच्यापासून अलग होती. नाशिक, मुंबअी, पुणें या मोठ्या तिन्ही शहरांत व अितरत्र तिच्या अुपशाखा होत्या. सुरक्षिततेच्या दृष्टीनें फक्त शाखा-चालकांचाच एकमेकांशीं भेटीगांठीचा संबंध असावा, या गुप्त कार्याच्या आवश्यक नियमाप्रमाणे कर्व्यांच्या फक्त गोपाळराव पाटणकर व मी यांच्या-शींच भेटीगांठी होत. त्यामुळें कोण कोठून कसे पैसे आणतो हें एकमेकांस कांहीं माहीत नव्हतें. पण कर्व्यांच्या नाशिक शाखेच्या रा. दांडेकर व आंबडेकर या सदस्यांनी, शस्त्रास्त्रें व बॉंब यांसाठीं, कांहीं लहान-सहान ४००–५०० रुपयांपर्यंत चोऱ्या केल्याचेहि आमच्या वरील झालेल्या खटल्यांत उघडकीस आलें. त्यांत त्यांचा स्वार्थ यत्किंचितहि नव्हता, हें सरकारी अधिकाऱ्यांनाहि मान्य करावें लागलें. त्यासंबंधीं माझे मित्र व अण्णा कर्व्यांचे सहकारी गोपाळराव धारप आपल्या लेखांत लिहितात —

"स्वातंत्र्यप्राप्तीकरिता ... ज्यांच्याजवळ पुष्कळ संपत्ति आहे त्यांच्याकडून थोडी आपल्या प्रयत्नांच्या अुपयोगाकरिता घेतल्यास – चोरी करूनहि घेतल्यास – त्यांत पाप नाहीं, अशा समजुतीनें, व सार्वजनिक हित-बुद्धीनें, प्रेरित होऊन मंडळींनी द्रव्य मिळविण्यास सुरवात केली. अत्यंत पापभीरु माणसांनींहि त्यांत भाग घेतला होता. परंतु त्यांची स्फटिकाप्रमाणें असणारी प्रामाणिक बुद्धि त्यामुळें मलिन झाली नाहीं. ... या मार्गानें कांहीं धन मिळविलेंहि."

### शस्त्रास्त्रांची जमवाजमव

पैशांची याप्रमाणें कशीबशी तरतूद केल्यावर आम्ही शस्त्रास्त्रें जमविण्यास व स्फोटकास्त्र तयार करण्यास सरसावलों. कांही पिस्तुलें, बंदुका, तरवारी, जंबिये, भाले, बरच्या वगैरे शस्त्रें आम्ही जमवलीं होतीं; परंतु आधुनिक काळांतल्या शस्त्रांपुढें त्यांचा कांहीं अुपयोग नाहीं, हेंहि आम्ही जाणून होतो. शस्त्रास्त्रांच्या किंवा स्फोटकांच्या कारखान्यावर सावध व दक्ष राहणाऱ्या लोकांना, हातघाअीचा प्रसंग आल्यास, त्यांच्याजवळ त्यांपैकीं अेकेक तरी हत्यार ठेवणें भाग होतें. देशी संस्थानांत शस्त्रास्त्रें मिळणें सुलभ होतें म्हणून बाबांनीं त्यांचा शिष्य विठ्ठल बाळकृष्ण ऊर्फ बापूराव जोशी याला ग्वाल्हेरला पाठवून तिकडून पिस्तुलें आणण्याचा अुपक्रम सुरू केला होता; पण तो उघडकीस आला. मात्र माधवराव गाडगिळांनी शिताफी करून आणविलेलें पिस्तुल नाशिकच्या गोदावरीच्या डोहांत टाकून दिलें, अशी पोलिसांस लोणकढी थाप ठेवून दिली! बिचाऱ्या पोलिसांनीं मुंबअीहून पाणबुडे आणवून गोदावरींतला सुंदरनारायणाचा सर्व डोह शोधला. त्यांत कांहीं मोडक्या तरवारी व कांहीशीं फुटकीं भांडी वगैरे सामान मिळालें; पण पिस्तुल मिळालें नाहीं. त्यांत तें टाकलेंच नव्हतें तर तें कोठून मिळणार? असो. पिस्तुल सांपडत नाहीं, असा शेरा मारून तें प्रकरण पोलिसांनीं निकालांत काढलें व माधवरावांना, बापू जोशांच्या बरोबर, ६ महिने सरकारी पाहुणचार "स्वराज्याश्रमांत" (तुरुंगांत) खावा लागला. पण तें पिस्तुल सुरक्षित होतें.

या पिस्तुलाच्या शोधावरून पोलिसांना ग्वाल्हेर-कटाचा मात्र सुगावा लागला. त्यांत तेथें अभिनव भारताच्या धर्तीवर निघालेल्या "नवभारत" या क्रांतिकारक संस्थेपैकीं २२ सभासद व अभिनव भारताचे १९ सभासद

अशा ४१ सदस्यांवर स्पेशल ट्रायब्यूनलपुढें खटला चालून त्यांना तुरुंगाच्या शिक्षा मिळाल्या. यांतच ग्वाल्हेरचे सन्मान्य नागरिक व पुढे हिंगण्याच्या स्त्रियांच्या महाविद्यालयांतले प्राध्यापक प्रो. डॉ. हरि रामचंद्र दिवेकर, अेम्. अे. हेहि होते.

ग्वाल्हेरप्रमाणेंच बडोदें, अिंदूर व मोंगलाअींत हत्यारें मिळवण्याचे प्रयत्न चालू होते. आणि त्याप्रमाणें आम्हांस बरीचशी हत्यारें मिळालींहि होतीं. नाशिकच्या गोपाळराव धारपांचे बंधु औरंगाबाद येथें असल्यानें त्यांनी शंकर सोमण व गणूस पत्र देऊन तेथें शस्त्रें मिळविण्यासाठीं पाठविलें. त्याप्रमाणे गणू वैद्य व ते तेथें खटपटीस गेले. पण शस्त्रांऐवजीं देशभक्त अनंता कान्हेरे ह्या विलक्षण धडाडीच्या तरुण क्रांतिकारकाला गवसून ते परतले. पण त्यांनी तेथें आमचा शस्त्रास्त्रांचा प्रयत्न यशस्वी होण्याचा घाट चांगलाच घातला होता, हें आमच्यावरील खटल्यांत अुघडकीस आलें.

मोंगलाईत हैद्राबादेस रा. विनायकराव तिखे यांच्यामार्फतहि शस्त्रास्त्रें जमविण्याची खटपट बाबा सावरकरांनीं केली होती; पण बाबाच पकडले गेल्यानें तो बेत विसकटला.

### सावरकरांनीं पाठवलेलीं पिस्तुलें

हे प्रयत्न चालू असतांच विलायतेहून तात्यांनीं २० ब्राअुनिंग पिस्तुलें हिंदुस्थानांत पाठविण्याचें ठरविलें. बाबांना शिक्षा झाल्यावर मदनलाल धिंग्रा यानें,अिंग्रजांचा सूड घेण्याच्या अुद्देशानें,कर्झन वायलीचा जेव्हां वध केला तेव्हां बरीचशीं ब्राअुनिंग पिस्तुलें विलायतेंतल्या अभिनव भारताच्या प्रचारकांनीं पॅरिसला पूर्वीच खरेदी केलीं होतीं, असा सुगावा अिंग्रज सरकाराला लागला. दूरदृष्टि ठेवून, सावरकरांनीं मात्र तीं स्वतः खरेदी केली नव्हतीं, असें विलायतचा अिन्स्पेक्टर पार्कर यानें साक्षींत सांगितलें. त्यावेळी स्कॉटलंड यार्डच्या पोलिसांनी, किती पिस्तुलें, कोठकोठून, हिंदी क्रांतिकारकांनीं खरेदी केलीं, त्याचा तपास केला होता; आणि बरीचशीं पिस्तुलें त्यांनीं खरेदी केल्याचें त्या पोलिसांस कळलेंहि होतें. १९०९ च्या प्रारंभींच किंवा १९०८ च्या अखेरीस ही खरेदी झाली असली पाहिजे. कारण १९०९ च्या मार्चमध्येंच चतुर्भुज हीं २० पिस्तुलें घेऊन हिंदुस्थानांत आला. त्यावेळीं आधुनिक पद्धतीनें शस्त्रास्त्रें तयार करण्याचें शिक्षण घ्यावयास बेल्जममध्यें कोणा

तरी क्रांतिकारक तज्ज्ञास पाठविण्याचें सावरकरांनीं ठरविलें होतें, असेंहि या चतुर्भुजानें आपल्या साक्षींत सांगितलेलें आहे. असो. तो येण्याच्या पूर्वी ८ दिवसच बाबांना माझ्या खोलींत मुंबअीस अटक झाली होती. म्हणून हीं पिस्तुलें बाबांच्या हातीं न पडतां मजकडे आलीं, तीं घेण्यासाठींच बाबा मजकडे येऊन उतरले होते. सर शिकंदर हयातखान, चंजेरीराव व अेक अिटालियन स्त्री यांच्यामार्फतहि तात्यांनीं अिकडे पिस्तुलें पाठविलीं होतीं; पण तीं आम्हांला पोंचण्यापूर्वींच आम्ही अटक झालों होतों.

तात्यांनीं चतुर्भुजाला आधींच शपथ देऊन अभिनव-भारताचा सभासद केला होता. हा शिंपी होता; आणि अिंग्लंडांत शिंप्यांच्या संस्थेंत शिक्षण घेऊन त्यानें त्या कलेचें भलेंमोठें प्रमाणपत्रहि मिळविलें होतें. पोटासाठीं तो 'अिंडिया हाअुस ' या शामजी कृष्णवर्मांनीं काढलेल्या संस्थेंत आचाऱ्याचें काम करी. त्याचें वास्तव्यहि तेथेंच होतें. सावरकरांच्या गुप्त चळवळी, व प्रकट सभा-संमेलनें, येथेंच होत. या क्रांतिकारक वातावरणांत चतुर्भुज वावरत होता. तात्यांच्या टपाली कामांतहि तो त्यांना मदत करी. यामुळें तो त्यांच्या विश्वासास पात्र झाला होता. म्हणून तो जेव्हां हिंदुस्थानांत यावयास निघाला तेव्हां त्याच्याबरोबरच त्यांनीं २० पिस्तुलें पाठविण्याचें ठरविलें. त्यासाठीं त्यांनीं व व्ही. व्ही. अेस्. अय्यर यांनीं अेक गुप्ततळाची बेमालुम पेटी तयार करवली होती. त्या तळांतल्या चोरकप्प्यांत त्यांनीं २० पिस्तुलें व हजारों काडतुसें व्यवस्थित रचून तो चोरकप्पा बंद केला व त्यावरच्या तबकडीवर अनेक पुस्तकें, पिकाविक पेपर्स वगैरेंच्या मुखपृष्ठांच्या जाहिराती, ठेवून अितर सामान त्यांत भरलें. हिंदुस्थानांत आल्यावर मुंबअीस कस्टम कचेरींत प्रत्येक अुतारूच्या सामानाची कसून झडती घेतात, हें तात्यांना माहीत होतें. म्हणून त्यांनीं ही योजना केली होती. सुदैवानें चतुर्भुजच्या पेटीच्या झडतींत पेटीला तळकप्पा असेल ही कल्पना या अधिकाऱ्यांना आली नाहीं. म्हणून त्यांनीं "बेकायदा कांहीं वस्तु तपासांत सांपडली नाहीं" असें मोठें प्रमाणपत्र ( सर्टिफिकीट ) चतुर्भुजला दिलें. तें घेअून चतुर्भुज सरदारगृहांत येऊन अुतरला.

तात्यांचे मुंबअींत पूर्ण विश्वासू, असे आम्ही दोघेजण, मी व अभिनव भारताचे तेव्हां अध्यक्ष असलेले हरि अनंत थत्ते, हे होतों. तात्यांनीं चतुर्भुज-

जवळ, आमची ओळख पटावी म्हणून, आमच्या दोघांच्या नांवांचीं दोन परिचयपत्रें दिली होतीं. प्रथम त्यानें रा. थत्त्यांची चौकशी केली. पण ते गांवीं गेले असल्याने तो माझ्याकडे आला, आणि पत्र देऊन पिस्तुलांची व्यवस्था करण्याबद्दल मला सुचवलें. त्या आधीं ८ दिवस पोलिसांच्या सक्त पहाऱ्यांतून झुकांडी देऊन आलेले बाबा माधवाश्रमांतल्या माझ्या खोलींत पकडले गेले होते. आणि, त्यांच्या जामिनाची वगैरे सर्व खटपट मीच नाशकास जाऊन केली होती म्हणून, माझ्यावरहि पोलिसांची अेकसारखी पाळत होती. अशा स्थितीत चतुर्भुजबरोबर जाऊन, पिस्तुलें व काडतुसें ताब्यांत घेऊन, मी घरीं आणणें धोक्याचें होतें. म्हणून माझे परम विश्वासू स्नेही गोपाळराव पाटणकर यांना पिस्तुलांची व्यवस्था करावयास-त्याच्याबरोबर पाठवलें; आणि पिस्तुलें माझ्याकडे आणूं नका, तुमच्याच घरीं तूर्त ठेवा, असें त्यांना बजावलें. त्याप्रमाणें गोपाळराव त्यांपैकीं १९ पिस्तुलें व काडतुसें घेऊन सुरक्षित घरीं आले. अेक पिस्तुल व कांहीं काडतुसें चतुर्भुजनें आपल्याजवळच ठेवलीं. पिस्तुलें घरीं आणल्याचें मला कळतांच मीं गोपाळरावांना तीं पिस्तुलें ताबडतोब नाशकाशिवाय अन्य ठिकाणीं ठेवण्याचे सुचविलें. नाशिकची आमची अभिनव भारताची व अितर तरुण मंडळी कांहीं तरी अेकदम दिव्य करण्यास उत्सुक झालीं होतीं. पिस्तुलें, काडतुसें त्यांच्या हातीं पडतांच, मलाहि न कळवतां, अुच्छृंखलपणें ते कोणाचा तरी अचानक घात करतील, ही भीति मला पदोपदीं वाटत होती. म्हणून आमच्या, अेकाच वेळीं हिंदुस्थानभर, किंवा निदान बऱ्याच ठिकाणीं, क्रांतीचा भडका उडवण्याच्या योजना परिपूर्ण होईपर्यंत पिस्तुलें या अुतावीळ तरुणांच्या हातांत पडूं देऊं नये, असें अभिनव भारताच्या मुख्य कार्यकारी मंडळानें – म्हणजे मी, पाटणकर, थत्ते, गोरे यांनीं – ठरविलें होतें. आमची तरुण मंडळी अुतावीळ झालीं होतीं, याचें गमक मला माझ्या मेव्हण्याच्याच बाबतींत अनुभवास आलें होतें. तो केवळ पोलिसासारखा काचा मारी, व काळा फेटा बांधी, अेवढ्यावरून आमचे नाशिकचे चिमा खाडे, खुशालसिंग वगैरे मंडळींनीं त्याचा कांटा काढण्याचें ठरवलें होतें. त्यांचा बेत त्यांनीं मला कळवला म्हणून बरें. नाहींतर तो बिचारा त्यांच्या अत्याचाराला बळी पडला असता. माझा मेव्हणा तो आहे असें कळतांच ते चकित

झाले. असो. या त्यांच्या वृत्तीमुळें त्यांच्या हाती पिस्तुलें न देण्याचें आम्हीं ठरवलें होतें.

## पिस्तुलांची रवानगी व प्रसार

नाशकास जर तीं पाठवावयाचीं नाहीत, तर मग तीं कुठें सुरक्षितं ठेवावयाचीं, याची योजना नंतर आम्ही ठरवली. मुंबअीजवळ पेणला आमची शाखा होती. पाटणकरांना मी सांगितलें की, पिस्तुलें घेऊन तुम्ही पेणला जा आणि तेथें सरकारी जागेंत, गांवाबाहेर, पण खुणेच्या ठिकाणीं, तीं आपल्या खात्रीच्या एका सहकाऱ्याच्या हस्ते न गंजतील अशी व्यवस्था करून, तूर्त पुरून ठेवा. आपणांला जेव्हां लागतील तेव्हां तीं आपण आणूं. या योजनेला ते अनुकूल झाले. आमचा हेतु हा की, कदाचित् पिस्तुलें अुघडकीस आलींच, तर आपल्या सहकाऱ्यांवर तें बालंट येऊं नये. फार तर पिस्तुलें जातील, माणसें सांपडणार नाहींत. आमच्या अभिनव भारताच्या सदस्यांपैकीं त्र्यंबकराव मराठे हे तेथल्या मराठी शाळेचे मास्तर होते. त्यांना विश्वासांत घेऊन गोपाळ-राव पाटणकरांनीं तें काम चोख बजावलें आणि सर्व व्यवस्था नीट झाली आहे असें मला कळविलें. पण ज्या मूळ हेतूसाठीं, म्हणजे अुतावीळ झालेल्या तरुणांच्या हातीं तीं पडूं नयेत, आणि आमच्या देशभर अचानक अेकदम क्रांतीचा भडका अुडवण्याची योजना विफळ होअूं नये, म्हणून पिस्तुलें आम्ही पेणला पाठवलीं, तो हेतु मात्र सफळ झाला नाहीं. परिणाम हा झाला कीं, आमच्या कसलेल्या अभिनव भारताच्या मुख्य संस्थेपैकीं अुतावीळ झालेल्या तरुणांच्या हाती तीं न पडतां, आमच्या अण्णा कर्व्यांच्या शाखें-तल्या, अगदींच कच्च्या पण तितक्याच अुतावळ्या व अनावर झालेल्या, तरुणांच्या हातीं त्यांपैकीं कांहीं पडलीं. त्याचें कारण असें.

## हुतात्मा कर्व्यांचा संबंध

आम्ही ( आतां नाशिकचे पेन्शनर ड्रॉअिंग मास्तर ) रामभाअू भाटे यांच्या मदतीनें वसअीस बॉंब तयार करण्याच्या खटपटींत होतों. त्याचा अुल्लेख पुढील प्रकरणीं येअील. बॅांबच्याकरितां जीं रासायनिक द्रव्यें व अुपकरणें आम्हांस हवीं होतीं त्यांच्यासाठीं आम्हांस पैसा हवा होता. मागें सांगि-तल्याप्रमाणें आम्ही तर निष्कांचन होतों. ब्रिटिश व जर्मन कंपन्यांशीं आम्ही तीं द्रव्यें व उपकरणें मिळण्याबद्दल संधान बांधलें होतें. साबणांचा कारखाना

आम्हीं काढला आहे, म्हणून आम्हांस हीं रासायनिक द्रव्यें लागतात. अशा आम्हीं अिंग्रजी कंपन्यांना प्रथम थाप दिली होती. पण त्यांना [illegible] असें दिसल्याबरोबर आम्ही आमचा मोर्चा जर्मन कंपनीकडे वळवला. त्यांनाहि संशय आला नव्हता असें नाही. पण ते लोक अिंग्रजांअितके चौकशी करीत नसत. तीं द्रव्यें मागतांच ते डोळे मिचकावून मात्र आमच्याकडे पहात. पण अिंग्रज काय किंवा जर्मन कंपनी काय, आम्हांस ती अुधार माल थोडाच देणार होती ? त्यांना रोख पैसा हवा होता. मागें सांगितलेंच आहे कीं, अेकदां अडचणीच्या वेळीं गोपाळरावांनीं आपल्या घरचे दागिने विकून पैसा अुभा केला होता. पण दरवेळी ते तरी पैसा कुठून आणणार ? ते अण्णा कर्व्यांच्याहि गुप्त संस्थेंत होते. कर्व्यांना पिस्तुलें हवी होती व पाटणकरांना पैसा हवा होता. डावरचा खून करूं पहाणाऱ्या कर्व्यांनीं गोपाळरावांना अेक दिवस विचारलें कीं, पिस्तुलें कोठें विकत मिळतील काय ? प्रयत्न करून पाहतों, म्हणून गोपाळरावांनीं त्यांना अुत्तर दिलें. आणि पैशांच्या तंगीमुळें अेक दिवस पेणला जाअून त्या आमच्या पिस्तुलांपैकीं कांहीं पिस्तुलें घेअून ते परत आले. अण्णा कर्व्यांची पुन्हां गांठ पडतांच त्यांनीं त्यांना तीं पिस्तुलें व काडतुसें दाखवलीं. बॉंबकरितां पैसे हवे आहेत. ते देत असलात तर कांहीं सवलतीनें पिस्तुलें तुम्हांस देतों, असें पैशाच्या अडचणींत सांपडलेल्या पाटणकरांनीं अण्णास विचारलें. अण्णांनीं १५० रु. देण्याचें कबूल केलें. आणि मग अण्णांनीं दांडेकरांच्या चोरीमुळें मिळालेले १५० रुपये देअून तीं पिस्तुलें व काडतुसें घेतलीं, आाणि पाटणकरांनीं ते १५० रुपये बॉंबच्या कारखान्याला लागणाऱ्या जिनसा खरेदी करण्याकरितां खर्च केले ! अितक्या सर्व गोष्टी झाल्या तेव्हां मी मुंबअीस नव्हतों. मी परत आल्यावर मग मला त्यांनीं त्या कळवल्या. बॉंबच्या सामानाकरितां पैसे हवेच होते, आणि तेवढ्यासाठीं आपण हें केलें, असेंहि ते म्हणाले. शिवाय आपण देशभर जो स्फोट अुडवणार आहोंत, त्या योजनेला कर्वे सर्वस्वीं कबूल आहेत, आपल्या संमतीशिवाय पिस्तुलांचा अुपयोग स्वतंत्रपणें करून आपली योजना अकालींच ते बिघडविणार नाहींत, असेंहि अभिवचन अण्णांनीं दिल्याचें त्यांनीं मला सांगितलें. पैशांच्या अडचणीकरितां पाटणकरांनीं हें काम केलें यांत शंकाच नव्हती. पण मला माझ्या

अुतावळया सहकाऱ्यांची जी भीति वाटत होती तशीच अण्णांच्या सहकाऱ्यांबद्दलहि वाटत होती. ती त्यांच्या कानावर घालून आपली देशभर बॉंबचा धूमधडाका अेकदम अुडवून क्रांतीची योजना दक्षतेनें ठरवण्यासाठीं मीं कर्व्यांना भेटण्याचें ठरवलें.

### कर्व्यांची व माझी योजना व आणाभाका

त्यावेळीं हल्लींच्या हॉफकिन अिन्स्टिटयूटमध्यें, म्हणजे जुन्या गव्हर्नमेंट हाअूसमध्यें, आमचे अभिनव भारताचे सभासद (आतां कै.) डॉ. गोविंद बाबाजी गोखले हे काम करीत असत. त्यांचें वास्तव्यहि तेथेंच असे. प्रसिद्ध देशभक्त कै. भास्करराव फडके ('विहारी' पत्राचे व विवेकानंदांच्या ग्रंथ-मालेचे संपादक) यांचे ते सख्खे बंधु. दत्तक गेल्यानें ते फडक्यांचे गोखले झाले होते. त्यांच्या घरीं रात्रीं (१९०९ च्या ऑक्टोबर महिन्यांत असेल) मीं, पाटणकर व अण्णा कर्वे यांनी भेटण्याचें ठरवलें. त्याप्रमाणें रात्रीं आमची भेट झाली. त्या भेटींत आमची सर्व प्रांतभर, बंगाली व अितर क्रांतिकारकांच्या मदतीनें बंगाल्यांत, आणि अितर प्रांतांतहि, अेकदम सरकारला दहशत, हादरा, बसेल अशा क्रांतीचा भडका अुडवण्याची योजना मुक्रर झाली. अेकाच वेळीं, अनेक प्रांतांत, असे रोमांचकारी बॉंबचे भडके अुडाले म्हणजे अेकाच ठिकाणीं सरकारला आपली शक्ति केंद्रित करतां येत नाहीं, अधिकाऱ्यांचीहि भीतीनें गाळण अुडते, आणि आमचे जे कांहीं क्रांतिकारक या योजनेंत बळी पडावयाचे त्यांच्याहि आयुष्याचा भरपूर वचपा काढतां येतो, आणि त्यामुळें लोकांनाहि दुप्पट अुत्तेजन मिळतें, असे अनेक हेतु या योजनेनें साधत असल्यानें, तिच्या परिपूर्ततेसाठीं आपलें सर्वस्व वेंचावयाचें असें आम्हीं ठरविलें. यांत रतिमात्रहि फरक होणार नाहीं, मुंबअी प्रांतांत काय करावयाचें तें आम्हीं दोघांनीं, म्हणजे कर्व्यांनीं व मी, अेकमेकांना कळवल्याशिवाय करावयाचें नाहीं, अशा आणाभाकाहि तेथें झाल्या. मला बालंबाल खात्री पटावी म्हणून अण्णांनीं त्यांच्या गुरूंच्या – पुण्याचे प्रसिद्ध रामानंद बीडकरमहाराज हे अण्णांचे गुरु होते – नांवानेंहि शपथ घेतली. अण्णांची त्यांच्या गुरूंवर अतिशय श्रद्धा. अण्णा त्यांच्याजवळ सर्व कांहीं सांगत. डावर जज्जाला मारण्याचा कटहि अण्णांनीं त्यांना सांगितला होता. कोणतेंहि कार्य करावयाचें म्हणजे गुरूंना ते अगोदर विचारीत. १९०८

झालीं "तूं हवें तें काम कर, त्यांत तुला स्वतःला धोका नाहीं. १९०९ सालीं मात्र तूं कांहीं प्रत्यक्ष चढाअीचें काम करूं नकोस, केल्यास फुकट मरशील" अशा आज्ञा बीडकरमहाराजांनीं त्यांना केल्या होत्या. त्या त्यांनीं मला सांगितल्या; आणि "अेखादे वेळेस मोहवश होअून तुम्हांला दिलेली शपथ कदाचित् मोडीन, पण गुरूंच्या आज्ञेबाहेर जाणार नाहीं" असा निखालस निर्वाळा त्यांनीं मला दिला होता. त्यामुळें मला कळवल्याशिवाय अण्णा कर्वे कोणतीहि गोष्ट करणार नाहींत, याची आम्हां सर्वांना मनोमन खात्री पटली. आम्ही त्या बैठकीत अेकमेकांशीं पूर्ण सहकार्याचीं वचनें देअून घेअून निश्चित योजनाबद्ध झालों. अण्णांचा सावरकरांच्याबद्दल थोडासा प्रतिकूल ग्रह होता हें मला माहीत होतें. प्रकट व गुप्त कार्य अेकाच माणसानें करूं नये, या मुद्द्यावरच फक्त तो होता. मागें त्याचा अुल्लेख आलेलाच आहे. पण गुप्त व प्रकट कार्यासाठींच बाबा त्या वेळेस जन्मठेपेची शिक्षा घेअून अंदमानच्या वाटेलाहि लागले होते. त्या अमानुष शिक्षेचाहि अण्णांच्या मनावर परिणाम झाला होता. प्रकट कार्य त्यामुळें स्थगित झालें होतें. त्यांतहि १९०६ त तात्या सावरकर विलायतेला गेल्यापासून मी प्रकट कार्यांत कधीं सहसा पडत नसे. अितकेंच नव्हे तर प्रत्यक्ष तात्यांना पत्रेंहि पाठवणें मीं बंद केलें होतें. पत्र पाठवावयाचें तर विलायतेंतल्या अितर दुसऱ्या कोणामार्फत तें मी पाठवी. या माझ्या वागण्यामुळें आमच्या अभिनव भारतापैकीं माझ्याबद्दल अनुकूल ग्रह अण्णांचा होता. म्हणून अण्णा माझ्याशीं मोकळ्या मनानें बोलत चालत असत. शिवाय आमची शस्त्रास्त्रांची जमवाजमव, बॉंबच्या कारखान्याची स्थापना, या आम्ही सुरू केलेल्या प्रत्यक्ष कार्यांत त्यांचें पाटणकर, गोरे, खरे, भाटे यांच्याशीं सहकार्य चालूच होतें. आमच्या व अण्णांच्याहि गुप्त मंडळींत ही मंडळी सामील असत. त्यामुळें अण्णांना आमच्या सहकार्याचीहि जरूर वाटूं लागली होती. या बैठकींत त्या सहकार्यावर शिक्कामोर्तब झालें.

या बैठकींत सहकाऱ्यांच्या अुतावळेपणाबद्दलहि मी हडसून खडसून त्यांना बजावलें होतें. त्याबद्दलहि अण्णांनीं मला ग्वाही दिली होती. अेकमेकांच्या गटांतले सभासद परस्परांस परिचित नसल्यानें, केवळ पुढाऱ्यांच्या वचनांवरच या बाबतींत विश्वासणें भाग होतें. त्यामुळें मला जे अनुभव आले

होते तसेच त्यांनाहि आले असतील, अशा कल्पनेनें मीं त्यांना त्याबद्दल दक्ष राहण्यास सांगितलें. त्यांना त्यांच्या सहकाऱ्यांची खात्री होती. पण हातांत शस्त्र आलें कीं, तें वापरून पहाण्याची बुद्धि होतेच. केवळ हत्याराच्या शिक्षणासाठीं नेमबाजीसाठीं हत्यार वापरणे निराळें, आणि रागाच्या द्वेषाच्या किंवा सूडाच्या भावनेला बळी पडून अकालीं अविचारानें तें वापरणें निराळें. बाबांना झालेल्या राक्षसी शिक्षेनें तरुणांचीं मनें जळफळतच होतीं. अिंग्रजांच्या अत्याचारांना अूत आला होता. बंगालच्या क्रांतिकारकांचे रोमांचक प्रयत्न आमच्या तरुणांच्या मनांत धगधगलेल्या आगीत तेल ओतीतच होते. अशा प्रक्षुब्ध मनोविकारांत तरुणांनी संयम राखणें कठीणच होतें. पण आमच्या योजनेला परिपक्क रूप येण्यास कांहीं महिने मनोविकारांना आळा घालणें भागच होतें. म्हणून पिस्तुले जरी घेतली तरी त्यांचा अुपयोग तुमच्या सल्ल्याशिवाय तुमच्या अनुयायांना करूं देअूं नका, असें मी त्यांना वारंवार हडसून-खडसून सांगितलें. नाहींतर अेखाद्या तरुणाच्या चुकीमुळें सर्वस्वाचा, सर्व योजनेचा, घात होअील; आणि अेका घुंगरटाला मारण्यापायीं आपल्या कैक सहकाऱ्यांचे बिनमोल प्राण व्यर्थ जातील, याची त्यांना पक्की जाणीवहि करून दिली. अण्णांनी हें सर्व मान्य केलें; आणि या बाबतीत कदापिहि चूक होअूं देणार नाहीं अशी मला ग्वाही दिली. पण अण्णांना नकळतच ज्याक्सनच्या वधाचें प्रकरण नाशकास त्यांच्या सहकाऱ्यांनीं शिजत घातलें होतें, आणि त्यामुळें अखेरीस अुतावळेपणानें घात व्हावयाचा तो झालाच. कसा तें पुढे येअीलच. त्याचें वर्णन करण्यापूर्वी गुप्तकार्यांपैकी स्फोटकास्त्राच्या ( बॉंबच्या ) कारखान्याचें प्रकरण अगोदर घेअूं.

## प्रकरण सातवें

# अभिनव भारताचे बॉंबस्चे कारखाने

विलायतेंत अितरत्र, व खुद्द लंडन शहरांत, अभिनव भारताचे जे जे सभासद होते त्यांना तेथें पिस्तुलें व बॉंबचें सामान मिळण्यास हिंदुस्थानाअितकी अडचण पडत नसे. सावरकर विलायतेस गेले तेव्हां सेनापति बापट हेहि विलायतेंत होते. दोघांचा स्नेह लवकरच जमला आणि बापट हे अभिनव भारताचे सदस्यहि झाले ( सावरकर चरित्र पृ. १६२ ). सशस्त्र क्रांति हेंच स्वातंत्र्यप्राप्तीचें अितिहासनिर्दिष्ट साधन खरें, पण तें अुघडपणें सांगणें हें कोणतीहि राजसत्ता करूं देत नाहीं. त्यासाठीं मग गुप्तपणें शस्त्रें गोळा करणें, त्यांचा अुपयोग करावयास शिकणें, हिंदुस्थानांत त्यांची शक्य तेवढी निर्यात करणें, बॉंबसारखीं प्रभावी अस्त्रें तयार करण्याची विद्या व शस्त्रें तयार करण्याची कृति, कचाप्रमाणें, परदेशीं जाअूनहि शिकणें, त्याचे प्रयोग करून पाहणें, ज्यांना शस्त्रविद्या हेंच चरितार्थाचें साधन आहे अशा सैनिकांत राजद्रोह पसरवून त्यांना सशस्त्र क्रांतीला अुद्युक्त करणें, प्रांतोप्रांतीं आणि शहरोशहरीं शस्त्रसंभार जुळवून ठेवणें, हें अभिनव भारताच्या सभा-

सदांचें कर्तव्यच होतें. बापट विलायतेंत हे अुद्योग १९०४ सालींच करूं लागले होते. पण त्यांचा खाक्याच निराळा. या पठ्ठयानें अेडिंबरो येथें हिंदुस्थानच्या परिस्थितीवर जें व्याख्यान दिलें त्याच्या शेवटीं सशस्त्रक्रांति हाच स्वातंत्र्याच्या प्राप्तीचा अुपाय सांगून, त्या साधनाचें प्रतीक म्हणून जवळ असलेलें पिस्तूलच टेबलावर प्रेक्षकांपुढें ठेवलें, असें बापटांनींच लिहून ठेवलें आहे. रशियन राज्यक्रांतीमध्यें बॉंबचे अुपयोग तेथें क्रांतिकारक करीत असत. हें अस्त्र आपल्या अुद्दिष्टसाधनाला फार अुपयोगी आहे, हें अभिनव भारताचे सदस्य जाणून होते व त्या साधनाच्या प्राप्तीस्तव त्यांचे यत्नहि चालू होते.

### बॉंबसूचे प्यारिस येथें प्रयोग

स्वतः बापट हे अत्यंत भावनाशील आहेत. अेखादी गोष्ट पटली कीं, ती साध्य करण्यास ते जिवाचें रान करतात. बॉंबचा अुपयोग त्यांना पटला. आणि ती विद्या हस्तगत करावयाचें त्यांनीं ठरवले. त्या वेळी फ्रान्सच्या राजधानींत प्यारीस ( मधुपुरी असें बापट याला म्हणतात ) येथें बरेच रशियन क्रांतिकारक येअून राहिले होते. त्यांच्यापैकीं कांहींजण बॉंब तयार करण्यांत चांगलेच तरबेज होते. हिंदुस्थानांतल्या तीन प्रांतांतून ही विद्या शिकण्यास बंगालचे हेमचंद्र दास, नाभा संस्थानचे मिर्झा अब्बास, आणि महाराष्ट्रीय बापट हे तेथें गेले. त्यांनीं या रशियन क्रांतिकारकारकांशीं चांगलेंच सूत जमवलें. प्यारिसमध्यें अेका साबणाच्या कारखान्यांत हे प्रयोग सुरू झाले. पण या कृतीची अेक अधिकृत पुस्तिकाहि त्यांना हवी होती. ती मिळवण्यास बापटांना, युक्त्या-प्रयुक्त्या करून, बर्लिनला जर्मनीत जावें लागलें. तेथें त्यांना ती पुस्तिका ( manual ), मिळाली. तिच्या पानापानांचे बापटांनीं फोटो घेतले. पण ती होती रशियन भाषेंत. आणि बापटांना तर रशियन येत नव्हतें. अशा अडचणींत त्यांना त्यांच्या ओळखीच्या अेडिनबरो येथें वैद्यकीचा अभ्यास करीत असलेल्या अेका रशियन तरुणीची आठवण झाली. तिला त्यांनीं बर्लिनला बोलावलें. तीहि निरोपासरशीं आली. बापटांनीं तिला त्या रशियन भाषेंतल्या बॉंबच्या पुस्तिकेचें अिंग्रजींत भाषांतर करावयास विनंती केली. आपली परीक्षाहि बुडवून त्या थोर अुदारचरित तरुणीनें त्याचें भाषांतर करून बापटांस लंडन येथें दिलें. तेथें त्याच्या अनेक प्रती सावरकर व बापट प्रभृति लोकांनीं केल्या. त्यांपैकीं अेक प्रत होतीलाल वर्मांच्या बरोबर

लो. टिळकांना अर्पण करण्यासाठीं दिली होती. होतीलाल हे परत येतांना अमेरिका-जपानमार्गें आले. येतांना हाँगकाँगमधल्या हिंदी पलटणी फितविण्याचा अुपक्रम त्यांनीं केला. अिकडे आल्यावर वर्मांनीं ती बाँबच्या कृतीची प्रत टिळकांना पोंचवली. दुसरी बापटांच्याजवळ होती. तिसरी हेमचंद्राजवळ दिली. तशीच अेक बाबा सावरकरांकडे रवाना झाली. मिर्झा अब्बास व सर शिकंदर हयातखानांच्या बरोबर अेक आली. याप्रमाणें निरनिराळ्या प्रांतांतल्या गुप्त मंडळांच्या प्रमुखांकडे तिच्या शेकडों प्रती वाटल्या गेल्या होत्या. त्या पुस्तिकेंत वर्णन केलेल्या कृतीप्रमाणें बाँबचे प्रयोग प्यारीस येथेंच प्रथम अेका वृद्ध रशियन क्रांतिकारक रसायनशास्त्रज्ञाच्या देखरेखीखालीं करण्यांत आले. ते संपूर्णतया यशस्वी झाल्याची या लोकांनीं खात्री करून घेतली. सावरकरांनींहि तसे प्रयोग लंडनमध्यें करून पाहिले ( सावरकर-चरित्र, करंदीकरकृत ); आणि मगच बापट, हेमचंद्र आणि होतीलाल वर्मा हे हिंदुस्थानांत यावयास निघाले. होतीलाल वर्मा हे लागलीच हिंदुस्थानांत १९०७ मध्येंच येअून पोंचले. बापट अधिक हुषार. ते आपलें नांव बदलूनच हिंदुस्थानांत आले. हेमचंद्र त्यांच्या अगोदरच येअून पोंचले होते. या पुस्तिकेप्रमाणें अुत्तम बाँब करतां येतील असें आमच्यावरील नाशिकच्या क्रांतीच्या खटल्यांत कॅ. हायाम यांची जी स्फोटक-तज्ज्ञ म्हणून साक्ष झाली तिच्यांत त्यानें म्हटलें आहे. हिंदुस्थानांत ही पुस्तिका आल्यावर तिच्या शेंकडों प्रती करून आमच्या निरनिराळ्या शाखांकडे व परप्रांतांतहि वांटल्या गेल्या होत्या. त्यांपैकींच अेका पुस्तिकेवरून आमच्यांतले रसायनशास्त्री रा. कृष्णाजी गोपाळ खरे यांनीं बाँबचे प्रयोग पेणला करून पाहिले, असें अभिनव भारताच्या पेणच्या शाखेचे अध्यक्ष रा. त्र्यंबकराव मराठे, मास्तर, यांनीं आपल्या लेखांत म्हटलें आहे.

### आमचे स्फोटकास्त्रतज्ज्ञ खरे गुरुजी

येथेंच रा. खऱ्यांच्या बद्दलची थोडीशी माहिती देणें अिष्ट आहे. कृ. गो. अूर्फ बाबूराव खरे हे आमच्या बरोबरच फर्ग्युसन कॉलेजमध्यें होते. प्रथम प्रथम ते आमच्यांत मिसळत नसत. अत्यंत हुषार विद्यार्थी, पहिल्या वर्गांत नेहमीं पास होणारे, म्हणून त्यांचा लौकिक होता. त्यांनीं बी. अे.साठीं

रसायनशास्त्र हा अैच्छिक विषय घेतला होता. आणि त्या परीक्षेंतहि त्यांनीं अुच्चांक गांठला होता. फर्ग्युसनमध्यें ते, कै. हरिभाअू भागवत, व नगरचे वेदमणी यांचा अेक निराळाच गट होता. ते गंभीर, अबोल व किंचित् अुग्र दिसत. आणि अेखाद्या तपस्व्याप्रमाणें अेकांतप्रिय असत. आमच्या पुण्याच्या शाखेंत ते नसले तरी त्यांचे गुप्त राज्यक्रांतीचे यत्न चालूच होते. सावरकरांच्या प्रकट-गुप्त अशा विरोधी कार्यपद्धतीबद्दल, अण्णा कर्व्यांप्रमाणें, त्यांचाहि आक्षेप होता. शिवाय सावरकर नुसते व्याख्यानबाजी करतात, प्रत्यक्ष कार्य कांहीं करीत नाहींत, हाहि त्यांच्या विरोधाचा अेक मुद्दा होता. सावरकर व मी फर्ग्युसन सोडून मुंबअीस आल्यावर पुण्याच्या शाखेचें चालकत्व आतांचे जुन्नरचे वकील रा. गणेश वासुदेव जोगळेकर यांच्याकडे गेलें. ते प्रकट कार्यांत कधींच पडत नसत. त्यांनीं खऱ्यांना सहकार्याची विनंती केली ( जोगळेकरांचा लेख ). खऱ्यांनीं त्यांना जे आक्षेप सांगितले त्यांत अभिनव भारताचे सदस्य कांहीं धाडसाचें काम करीत नाहींत, हा अेक आक्षेप होता. त्याची प्रचीती घेण्यासाठीं जोगळेकर व कालेलकरांना रात्री फर्ग्युसन कॉलेजच्या मागच्या टेकडीवर त्यांनी फाटक व फिरोदिया ( हल्लीचे मुंबअी विधिमंडळाचे अध्यक्ष ) यांच्या साहाय्यानें वेष पालटून कसें तिंबलें त्याची हकीगत मागें आलीच आहे. या प्रचीतीनंतर खऱ्यांची खात्री पटली असावी असें वाटतें.

खरे नंतर बी. अे. झाल्यावर अेम्. अे. च्या व वकिलीच्या अभ्यासासाठीं मुंबअीस आले. त्यांनी रसायनशास्त्र हा विषय घेतल्यामुळें प्रो. गज्जरांच्या प्रयोग शाळेंत त्यांनीं आपला प्रवेश करून घेतला. राज्यक्रांतीच्या अुद्योगांत स्फोटकास्त्राचा ( बॉंबचा ) अभ्यास करण्यासाठींच त्यांनीं हा प्रयत्न आरंभला होता. त्यांत त्यांचे सहकारी कर्वे, पाटणकर, विश्वनाथपंत गोरे, जमखिंडीचे रा. कुळकर्णी ( लॉ क्लासचे विद्यार्थी ), व्हि. टे. अि.चे विद्यार्थी व्यंकटेश परशराम नागपूरकर व मुकुंद पांडुरंग मोघे हे प्रामुख्यानें होते. याच सुमारास विलायतेहून सावरकरांनीं बॉंबची पुस्तिका बाबांकडे हिंदुस्थानांत धाडली होती. हेमचंद्र दासनें त्याप्रमाणें अलिपूरला प्रयोग करून बॉंब तयारहि केले होते. या पुस्तिकेच्या प्रतींपैकीं अेक प्रत अण्णा कर्वे यांच्याकडे पाटणकरांमार्फत पोंचली होती. त्या पुस्तिकेच्या आधारानें

आमच्या रसायनशास्त्री खऱ्यांनीं बाँबकरितां लागणाऱ्या पिक्रिक ॲसिड व मर्क्युरी फल्मिनेट तयार करण्याचा चंग बांधला. मुंबअीस त्यांनीं कांहीं प्रयोग केले. पण मुंबअी हें शहर या गुप्त प्रयोगाला सोयीचें नव्हतें म्हणून पेणला ते गेले व तेथें प्रयोग यशस्वी झाल्याचे आमचे अ. भारताचे सदस्य मराठे म्हणतात. रा. खऱ्यांना मीं या सर्व कारस्थानाची साद्यंत हकीकत लिहिण्यास विनंती केली होती. पण प्रसिद्धिपराङ्मुखतेमुळें, किंवा हातून कांहीं योजनेप्रमाणें घडलें नाहीं, सारी तपश्चर्या व्यर्थ जाअून सर्वच ओंफस् झालें, आणि वर १० वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा भोगावी लागली, या सर्व घटनांनी त्यांना जें नैराश्य आलें त्यामुळेंहि असेल, त्यांनी हकीकत लिहिणें नाकारलें, याबद्दल मला वाअीट वाटतें. रा. बाबूराव खऱ्यांनीं या स्फोटकास्त्राच्या बाबतीत जें निःसीम धैर्य, स्वार्थत्याग, कर्तृत्व, आणि बुद्धिसामर्थ्य दाखवलें, त्यामुळें अभिनव भारताच्या अेकंदर संघटनेंत त्यांचें स्थान फारच अुच्च आहे, यांत शंका नाहीं. हल्लीं तें पुण्यास वकिली करीत आहेत. त्यांनींच हें सर्व सुसंगत लिहिलें असतें तर त्यांना आलेलीं संकटें, त्यांचा त्यांनी केलेला परिहार, या सर्वांवर फारच अुत्तम प्रकाश पडला असता. पण आमचें दुर्दैव की, त्यांना, किंवा त्यांच्या सहकाऱ्यांना, मौनांतच समाधान आहे.

या त्यांच्या आणि कैकजणांच्या मौनवृत्तीमुळें माझा अेक गैरसमज मात्र दूर झाला. आम्ही आधुनिक काळांतले लोक आमच्या पूर्वजांनीं अितिहास लिहून ठेवले नाहींत, म्हणून त्यांना दूषणें देतों. त्या काळीं लेखन व प्रकाशन-साहित्य दुर्मिळ असे. आतां तें सर्व भरपूर असतांहि आम्ही अद्यापहि अिति-हासपराङ्मुखच आहोंत. कोणी म्हणतील कीं पराजयांचा अितिहास काय लिहावयाचा? पण गेल्या महायुद्धांत अिंग्लंडची जी सपशेल ससेहोलपट डंकर्कहून झाली तिचाहि अितिहास अिंग्रज लिहितातच आहेत. बंगाली व अितर प्रांतीय क्रांतिकारकांनीं आपल्या पराजयांचेच अितिहास लिहिले आहेत. आम्ही मात्र तें करीत नाहीं! क्रांतिकारकांचीं अितिहाससाधनें कशीं नाहीशीं करावीं लागतात, याचें वर्णन मागें आलेंच आहे. पण साधनें नष्ट केलीं तरी माणसें तो पुन्हा लिहूं शकतात. तसें केल्याशिवाय अितिहास तरी कसे होणार! पण आमच्यापैकीं पुष्कळांनीं ही अितिहास-विन्मुखताच दाखविली आहे! दुर्दैव! यापेक्षां काय म्हणणार!

## स्फोटकास्त्रविद्येतले अनेक शिष्य

असो. बाबूराव खऱ्यांनीं या स्फोटकविद्येंत बरेच शिष्य तयार केले. फ्रान्सहून बापटांनीं स्वतः प्रयोग करून पाहून आणलेली बाँबची कृतिच अितकी अुत्तम होती की, अगदीं सामान्य माणसेंहि तो प्रयोग, प्रथम शिकून, वारंवार पाहून मग, हवा तेथें करूं शकत. बाबूरावांच्या शिष्यांत आमचे नाशिकचे अ. भारताचे सदस्य रा. दामोदर महादेव चंद्रात्रे (भिक्षुक), आबा गायधनी (भिक्षुक), विनायक नारायण देशपांडे (फांशी गेलेले, साधे मराठी मास्तर), जन्मठेप शिक्षा झालेले शंकर रामचंद्र सोमण व त्यांचे बंधु (खानापूर), पुरुषोत्तम लक्ष्मण दांडेकर (हायस्कुलांतले विद्यार्थी), श्रीधर वामन बर्वे (मॅट्रिकपर्यंत शिक्षण), त्र्यंबकराव मराठे (मराठी ट्रेंड शिक्षक), रामचंद्र दिनकर भाटे, (चित्रकला शिक्षक) अित्यादि अगदीं सामान्य शिक्षणाचीं माणसें होतीं. पण या सर्वांनीं ती विद्या, रसायनशास्त्र येत नसतांहि, हस्तगत केली! स्फोटकविद्या म्हणजे केवळ रसायन-तज्ज्ञांनींच करावी, ही जी अेक भीतियुक्त कल्पना होती, ती प्रत्यक्ष प्रयोग करून पाहून नाहीशी झाली. आणि पिक्रिक ॲसिड व मर्क्युरी फल्मिनेट करण्याचे कारखाने लंडन-प्यारिसप्रमाणें नाशिक, मुंबअी, कोठुरें, पेण, खानापूर, वसअी (मुख्य केंद्र) येथे सुरू झालें! अनुभव हाच खरा गुरु असतो, असें जें म्हणतात, तें येथेंहि प्रत्ययास आलें. बाबू-रावांचे मुख्य पट्टशिष्य आमचे नाशिकचे रामभाअू भाटे हे. स्फोटकद्रव्यें तयार करतांना जे धोके असतात ते टाळण्याची, रसायनशास्त्र न शिक-लेल्या, या भाट्यांनींच युक्ति शोधली! आणि जेव्हां बाबूराव खऱ्यांना ती कळली तेव्हां गुरूंनीं शिष्याची पाठच थोपटली (भाटे यांच्या स्मृति पुढें पहा)! खुद्द सावरकरांनींहि लंडनमध्यें अिंडिया हाअूसमध्यें हे प्रयोग स्वतः केल्याचें त्यांच्या चरित्रांत नमूद आहेच. आणि अेकदां तर त्यांचे प्राण धिंग्रांनींच वांचवले होते. हेमचंद्र दासांनीं बंगालमध्ये हे स्फोटकांचें काम चालू केलेंच होतें. बॅ. मिर्झा अब्बास यांनीं मात्र तें सुरू केल्याचें कोठें अैकिवांत नाहीं. पण विलायतेहून हेमचंद्र दास, सेनापति बापट व बॅ.अब्बास या तिघा कचांनीं ही विद्या जी हिंदुस्थानांत आणली तिला अुपर्युक्त ठिकाणीं असा बहर येअू लागला होता. आणि या अस्त्राचा पुरवठा करण्यांत कर्वे यांचा गट व आमच्या अभिनव भारताचा गट यांचें संपूर्ण सहकार्य होतें.

हें सहकार्य चालू असतांहि आम्ही अेकमेकांच्या गुप्ततेबद्दल शक्य तेवढी दक्षता घेतच होतों. अितकी कीं, मुंबअीस माझ्या खोलींत पिक्रिक तयार करण्यास अवश्य असलेलें सामान – अुपकरणें वगैरे – घेअून आमचे कोठूरचे श्रीधरपंत बर्वे हे २–३ दिवस राहिले होते. पण त्यांच्या सामानांत काय आहे, हें त्यांनीं शेवटपर्यंत मलाहि कळूं दिलें नाहीं. वास्तविक तें अेक मोठें साहसच होतें. बाबा माझ्या खोलींत पकडले गेल्यानें माझ्यावर पोलिसांची टेहळणी होतीच. कांहींतरी निमित्त काढून हे आगंतुक रक्षक आमच्या खोलीवर मधून मधून पहारा करून जात. पण ते कधीं फारसे आमच्या वाटेंत आड आले नाहीत. जातांना बर्व्यांनीं मला हें त्यांचें रहस्य सांगितलें. तेव्हां मी त्यांच्या गुप्ततेच्या दक्षतेमुळें आनंदानें आश्चर्यचकितच झालों. पण हीं साहसें करण्यासाठींच आम्ही बद्धपरिकर झालों होतों. असे प्रसंग यावयाचेच अशी खूणगांठ आम्हीं मनाशीं बांधली असल्यानें त्यांत विशेष कांहीं वाटत नव्हतें.

असेंच अगदीं कडक गुप्ततेचें दुसरें अुदाहरण रामभाअू भाट्यांनीं आपल्या 'स्मृतींत' वर्णन केलें आहे. बाबुराव खऱ्यांनीं रामभाअूंना ही विद्या शिकविली. वारंवार ते वसअीस जाअून कामावर देखरेखहि करीत. पण हे रसायनी गुरु कोण, कोठले, त्यांचें नांव, धंदा काय यांबद्दल बरेच दिवस भाट्यांनींहि त्यांना कधीं विचारलें नाहीं, व बाबुरावांनींहि त्यांना कळूं दिलें नाहीं. गुप्ततेचे नियम आम्ही किती कसोशीनें पाळीत होतों, याचा वसअीचा आमचा प्रचंड कारखाना हें प्रतीक होतें. त्याबद्दलची हकीकत अतिशय अुद्बोधक व मनोरंजक आहे. आमच्या गोप्यरक्षणाच्या स्वयंशासित कायद्याच्या या कडक अंमलबजावणीनें, आमच्यावरील नाशिकच्या ज्याक्सन खुनाच्या व दुसऱ्या सशस्त्र क्रांतीच्या अशा दोन्ही सबंध खटल्यांत, आमचे अ. भारताचे शेंकडों हजारों सभासद, शस्त्रास्त्रें यांचा व या कारखान्याचा मागमूसहि आम्हीं पोलिसांना लागूं दिला नाहीं. तो आम्हीं कसा टाळला, हें पुढें ओघानें येअीलच. ती सर्व हकीकत आमचे त्या कारखान्याचे चालक रामभाअू भाटे यांना मी विनंती केल्यावरून त्यांनींच ती सुरसतेनें लिहून पाठविली आहे. त्याबद्दल मी त्यांना शतशः धन्यवाद देतों आणि तींत फक्त स्पष्टीकरणापुरत्याच टीपा देअून ती जशीच्या तशीच येथें देतों :–

## बॉबकर्ते रामभाऊ भाटयांच्या स्मृति

" स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं महाराष्ट्रानें काय प्रयत्न केले ते अलीकडील तरुणांस मुळींच माहीत नाहींत. त्यामुळें नव्या पिढीच्या तोंडून " महाराष्ट्र म्हणजे कर्तृत्वशून्य, पराक्रमहीन व नादान अशा लोकांचा मुलूख आहे, " असे वारंवार काढलेले अुद्‌गार अैकूं येतात. हा समज दृढ करण्यांत महाराष्ट्राचे परप्रांतांतील द्वेष्टे हातभार लावतात, व तिखट-मीठ लावून ते आपल्या प्रांतांतील लोकांच्या पराक्रमाचें वर्णन करतात; व तें अैकून आमची हल्लीची " चहाचिवडा चमनचाट " तरुण पिढी अधिकच अंधश्रद्धाळू, बेशिस्त आणि " मवाली हुल्लडवाले " बनत चालली आहे.

" हें अज्ञान नाहींसें करण्याकरितां पूर्वीचा अितिहास लिहावा असें पुष्कळ मित्र-मंडळींनीं दे. डॉ. भाअूराव भट यांना विनंती केल्यामुळें त्यांनीं हें काम अंगावर घेतलें आहे. प्रत्येक केंद्रांतील चालक व्यक्ति व कार्यकर्ते आज हयात आहेत असें नाहीं. असल्यास फारच थोडे लोक हयात आहेत. अशा विपत्तीत सर्व माहिती संगतवार मिळणें फार कठीण काम आहे.

" तथापि जितकी माहिती मिळेल तितकी अेकत्रित करून पुस्तकरूपानें हल्लींच्या अंधश्रद्धाळू तरुणांच्या हातीं देअून त्यांना त्यांच्या पूर्वींच्या पिढीचें सत्य स्वरूप दाखविणें अगत्याचें आहे. डॉ. भट यांनीं सांगितल्यामुळेंच मी माझ्या केंद्राची हकीगत आज लिहीत आहें. ही वाचून पुष्कळांना आश्चर्याचा धक्का बसेल यांत संशय नाहीं. परंतु तें कांही असो, " महात्मा गांधीकी जय " असें म्हणणारी हल्लींची पिढी तर ही कल्पित कथा अगर कादंबरी लिहिली आहे असें समजेल. असो.

" माझे बरेचसे सहाध्यायी व मी नाशिक हायस्कूलमधील अभ्यासक्रम यशस्वी रीतीनें पार पाडून पुढील शिक्षणाकरितां १९०६ त मुंबईस गेलों. कोणी अेल्फिन्स्टन कॉलेजांत, कोणी वुअिल्सनमध्यें, तर कोणी अितर ठिकाणीं, शिकत होते. मी अेकटाच सर, जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्यें शिकत होतों. दुसरे २–३ नाशिकचे विद्यार्थी तेथें होते; परंतु ते आमच्या मंडळींपैकीं नव्हते. नाशिकच्या मंडळींच्या भेटी " राष्ट्रमत कचेरींत " होत असत. तेथेंच मला प्रथम माहिती समजली कीं, आमचे मंडळींची खास

बैठक दर रविवारीं शास्त्री हॉलमध्यें भरत असते. ( कधी ग्रांटरोडला चिखलवाडींत, कधीं टोपिवाल्यांच्या चाळींत, कधी माधवाश्रमांतहि बैठकी होत. ) त्यानंतर मी नियमितपणें तेथें जाऊं लागलों. तेथें खालील मंडळी बहुतेक नियमानें हजर असत. १ दे. तात्याराव सावरकर, २ भाऊराव भट, ३ ( आतां सॉलिसिटर ) हरीभाऊ थत्ते, ४ शिवरामपंत अभ्यंकर ( आतां वकील, नाशिक ), ५ कै. डॉ. गोखले ( सरकारी नोकर होते ), ६ 'विहारी'चे संपादक भास्करराव फडके वगैरे. बाकीच्यांचीं नांवें आतां आठवत नाहींत.

" मुंबईस असतांना मी ( गिरगांव ) कांदेवाडींत केशवजी नायकाच्या ३ नं. च्या चाळींत पहिल्या माळ्यावर रहात असें. माझ्या शेजारच्या खोलींत रा. बाळकृष्ण रामचंद्र गोरे व त्यांचे दोघे बंधु राहत असत. बाळकृष्णा व मी लहानपणापासून सहाध्यायी असल्यामुळें आमचा घरोबा फार होता. गोऱ्हे यांचे मेव्हणे ( आतां कै. ) गोपाळ कृष्ण पाटणकर हे ४–५ खोल्या टाकून पलीकडच्या खोलींत राहत असत. सदरहू गृहस्थ शरीरानें धिप्पाड व बळकट, रुबाबांत दुसऱ्यावर छाप टाकणारे, निःस्पृह व कळकळीचे देशभक्त असें आढळण्यांत आल्यामुळें मीं त्यांना मुंबई शाखेमध्यें आणून दाखल केलें. त्यांच्या अंगच्या अलौकिक शौर्यानें व धडाडीनें ते आमच्या वसई येथील शाखेचे सूत्रधार बनले.

## वसईची शाखा

" माझा स्कूल ऑफ आर्टमधील अभ्यास पुरा झाल्यामुळें मी १९०८ सालीं नोकरीच्या शोधांत होतों. वसईजवळ पापडी म्हणून एक गांव आहे. तेथील ख्रिस्ती मिशनच्या इंग्रजी शाळेंत ड्रॉइंग मास्तर पाहिजे, म्हणून वर्तमानपत्रांत नोटीस आलेली वाचली. शाळेचे मॅनेजर मुंबईस राहत होते. त्यांचें नांव थॉमस् बॅपटिस्टा. त्यांना जाऊन भेटलों. त्यांनीं माझी नेमणूक ताबडतोब केली व मी वसईस जाऊन शाळेंत कामावर रुजू झालों. रा. गोऱ्हे यांचे मेव्हणे रा. गोविंदराव गोखले हे भाइंदरास राहत असत. त्यांचे वडील कै. मोरो नारायण गोखले यांनीं खुद्द वसईस एक जुना पेशवाई वाडा खरेदी केला होता व तेथें ते राहत असत. मी गोरे यांच्याकडून पत्र घेऊन वसईस आलों व गोखले यांच्याच वाड्यांत राहूं लागलों. हा वाडा हीच पुढें आमची कर्मभूमि झाली.

"येथें आल्यानंतर कांहीं दिवसांनीं नाशिकच्या 'अभिनव भारत मंडळा'ची शाखा येथें काढावी, असें मला वाटूं लागलें व त्याकरितां मी प्रयत्नास लागलों. गांवांतील कांहीं मंडळींना माझी कल्पना फार आवडली व त्यांनीं साहाय्य करण्याचें कबूल केले. त्या मंडळींची नांवें खालीं देतों.

"१ कै. डॉ. शिवराम भिकाजी परूळेकर, २ रा. नथु अप्पा मराठे, ३ रा. सिधूकाका मराठे, ४ रा. बापूराव वाघ, ५ रा. ठाकूर वकील, ६ रा. मुकुंदराव देसाअी, ७ रा. गोपाळ मोरेश्वर गोखले, ८ रा. गंगाधर मोरेश्वर गोखले वगैरे.

(बरींचशीं नांवें विस्मृतींत गेल्यामुळें त्यांचा नामनिर्देश करणें अशक्य झालें आहे. तरी त्यांनीं मला क्षमा करावी.)

"वरील मंडळींच्या सहकार्यानें व प्रोत्साहनानें शाखा स्थापन केली व देशभक्त तरुणांचा संग्रह करण्यास सुरुवात केली. शाळेंतील मुलांचीहि पारख करून निवडक मुलें या संस्थेनें निवडून निवडून घेतलीं. शनिवारीं दुपारीं बैठक भरे, व रविवारीं संध्याकाळीं शारीरिक व्यायाम लाठी वगैरेचें शिक्षण देण्यांत येत असे. सदरहू मुलें आतां मोठीं होअून त्यांना मुलें, नातवंडेंहि झालीं असतील. त्यांचीं नांवें जीं आठवलीं तीं खालीं देतों. मी त्यांचीं नांवें विसरलों. परंतु ते मात्र माझें नांव विसरलें नसतील याबद्दल खात्री वाटते. कारण त्यांना अेकाच व्यक्तीचें नांव ध्यानांत ठेवावयाचें व मला अनेकांचीं नांवें स्मरणांत ठेवावयाचीं. तसेंच या गोष्टीस आज ४० वर्षें झालीं! व वृद्धापकाळामुळें माझीहि स्मरणशक्ति क्षीण झाली आहे. तरी ज्यांचीं नांवें मी लिहूं शकलों नाहीं अशा विद्यार्थ्यांनीं राग मानूं नये. विद्यार्थ्यांचीं नांवें :–

१ गोपीनाथ गुप्ते, २ प्रधान, ३ बेंद्रे, ४ वालावलकर, ५ कर्वे, ६ श्रीधर साने, ७ नेपोलियन राड्रिक्स्, ८ रामदास शिंपी, ९ गुजराथी. नुसतीं आडनांवें अनेक स्मरतात तीं देण्यांत स्वारस्य काय असा प्रश्न पडतो, म्हणून यादी येथेंच पुरी करतों.

### बाँब तयार करण्याचा निश्चय व योजना

"अशा रीतीनें आमची शाखा वाढीस लागली असतां अेक दिवस कै. गोपाळराव पाटणकर वसअीस मला भेटण्याकरितां आले. त्यांनीं आपल्या

बरोबर कांहीं हस्तलिखितें व कांहीं टाअिपरायटरवर लिहिलेले कागद आणले होते. सदरहू कागदपत्रें बंगाली क्रांतिकारक देशभक्तांनीं लिहून अिकडे पाठविलीं होतीं. (हे कागदपत्र म्हणजेच विलायतेहून आलेल्या बॉंबच्या पुस्तिकेची नक्कल होती. आणि ती बाबा सावरकरांकडून पुष्कळ ठिकाणीं न कळत पाठविली गेली होती.) त्यांत बॉंबगोळे तयार करण्याची कृति तपशीलवार दिली होती. बॉंबगोळे तयार करण्यास पिक्रिक ॲसिड व फाल्मिनेट हीं दोन द्रव्यें तयार करावीं लागतात. त्यानंतर कवच (shell) तयार करून त्यांत पिक्रिक वितळवून ओतावें लागतें. तरी पूर्व तयारी म्हणून या दोन वस्तूंचा भरपूर सांठा तयार करून ठेवावा व नंतर पुढची योजना करावी, असें ठरलें. हें काम बरेंच जोखमीचें होतें; व तें करणारीं माणसें धाडसी व गुप्तपणा राखण्यांत फार पक्कीं असलीं पाहिजेत. आत्मप्रौढी व प्रतिष्ठा सांगणारे असता कामा नयेत, असें ठरलें. तेव्हां साहाजिकच मुलांना या जोखमींत घालूं नये, फक्त प्रौढ व स्वतंत्र असलेल्या, व गुप्तपणा खात्रीनें राखतील अशा मंडळींचा या कामीं अुपयोग करून घ्यावा असें ठरलें. दुसऱ्या दिवशीं माझ्या सहकाऱ्यांपैकीं निवडक मंडळी अेकत्र जमवून त्यांची गोपाळरावांशीं ओळख करून दिली व सर्वांनीं अेकत्र बसून विचारविनिमय केला. सर्वांनुमतें खालील गोष्टी ठरल्या.

"१. मुंबअीहून अुपकरणें व साहित्य आणावयाचें. त्यासाठीं डॉ. परुळेकर व मी दोघांनीं मुंबअीस जाअून गोपाळरावांच्या सल्ल्याप्रमाणें खरेदी करावयाची.

२. या कामीं लागणाऱ्या खर्चाची व्यवस्था गोपाळरावांनीं करावयाची.

३. पुढची व्यवस्था वसअीच्या मंडळींनीं सर्व करावी.

४. या कामीं मार्गदर्शन करण्यासाठीं अेखाद्या तज्ज्ञाची मदत पाहिजे होती. तो तज्ज्ञ गोपाळरावांनीं प्रयोगाच्या पाहिल्या दिवशीं बरोबर घेअून वसअीस यावयाचें.

"याप्रमाणें सर्व बेत ठरल्यानंतर ठरलेल्या दिवशीं आम्ही दोघे वसअीहून निघून मुंबअीस गेलों व गोपाळरावांस भेटलों. सामानसुमान व अुपकरणीं मिळविण्याच्या कामीं बराच त्रास पडला. (बंगालमध्यें बॉंब पडूं लागले होते म्हणून) केमिस्ट लोक आमच्याकडे साशंक मुद्रेनें पाहात व

आम्ही कोण ? कोठें राहतो ? काय अुद्योग करतो ? हें सामान कशाकरितां पाहिजे ? वगैरे चांभारचौकशा करीत. आम्ही त्यांना कांही तरी समर्पक अुत्तरें देअून त्यांचा संशय घालविण्याचा प्रयत्न करीत असूं. आम्ही साबूचे कारखानदार आहों. मोठ्या प्रमाणावर धंदा करण्याचा विचार आहे. जॉअिंट स्टॉक कंपनी काढावयाची आहे. आमचे अेक मित्र विलायतेंत जाअून या धंद्याचें पूर्ण शिक्षण घेअून आले आहेत, वगैरे थापा देअून वेळ निभावून नेण्याचें आमचें आंगवळणीं पडून गेलें.

### बॉंब करण्याचे प्रयोग

"जरूरीपुरतें सामान व अुपकरणीं बरोबर घेअून आम्ही दोघे वसअीस येअून दाखल झालों. दुसरे दिवशीं गोपाळराव पाटणकर हे अेक तज्ज्ञ (रा. कृष्णाजी गोपाळ खरे) बरोबर घेअून आले. आमची वसअीची निवडक मंडळी जमली व पहिला पिक्रिक ॲसिड तयार करण्याचा प्रयोग सुरू झाला ! ! हा प्रयोग करतेवेळीं धूर (Fumes) फार निघतो व हा धूर श्वासनलिकेंत गेला तर श्वासनलिकांना सूज येते व हट्टी खोकला जडतो. पिक्रिक तयार करण्याची तपशीलवार माहिती सांगण्याचें हें स्थळ नव्हे, म्हणून जरूर तेवढीच माहिती दिली आहे. पिक्रिक तयार करण्यांत धुराशिवाय (Fumes) दुसरा कसलीहि धोका नाही. जिवास धोका होण्याचा संभव बिलकुल नाहीं. परंतु पिक्रिकचा कारखाना गुप्त रीतीनें चालविणें तितकेंच कठीण·आहे. हाताला पिवळे डाग पडतात ते ८–१० दिवस जात नाहींत. कापसाच्या कपड्यावर हा रंग बिलकुल टिकत नाही. धुतल्याबरोबर साफ निघून जातो. परंतु लोकरीच्या कपड्यावर अगर कातड्यावर तो वज्रलेप बसतो. कपडा अगर कातडें फाटून झिजून गेलें तरी रंग जात नाहीं हें विशेष आहे.

"दुसऱ्या दिवशीं तयार झालेलें पिक्रिक बरणींत भरून ठेविलें. त्याचा रंग फारच तेजस्वी व मनोहर "केशरी पिवळा", सुरतेच्या केशरी बर्फीप्रमाणें, दिसतो. पिक्रिकचें नांव न घेतां 'केशरी बर्फी' म्हणावयाचें असें सर्वानुमतें ठरलें. नंतर दुसरा प्रयोग फल्मिनेट तयार करण्याचा झाला. त्याला पारा, नायट्रिक व सल्फ्यूरिक ॲसिडची गरज लागते. हा प्रयोग पिक्रिकसारखा निर्धास्तपणें करतां येत नाहीं. जरा जास्त प्रमाणांत मिश्रण

टाकलें गेल्यास धुराचा ( Fumes ) लोळ अुठतो व फ्लास्कमधील द्रव्याचे आजूबाजूस थेंब अुडतात व त्यामुळें भोंवताली बसलेल्या लोकांच्या कपडयांस भोंके पडून कातडीपर्यंत चटका जाअून पोहोचतो. तोंडावर व अुघडया अंगावर अुडालेल्या ठिपक्यांमुळे तोंडावर देवीसारखे वण अुठतात व ते बरेच दिवस राहतात. या प्रयोगांत कांचेचा चंबू ( Flask ) फुटून त्याचे छर्रेहि अुडण्याचा संभव असतो. सदरहू दोन धडे शिकवून आमचे तज्ज्ञ गुरुजी परत मुंबअीस गेले. परतु सदरहू अिसम कोण ? किती शिकलेले आहेत ? त्यांचें अडनांव काय ? वगैरे माहिती कोणी विचारावयाची नव्हती व बोलण्याचालण्यांतहि तिचा थांगपत्ता तज्ज्ञानें लागूं दिला नाहीं ! फक्त हे ब्राह्मण असावेत. बी. अेस्सी. अगर अेम्. अेस्सी. असावेत असा आमचा तर्क होता.

### प्राणसंकट

" पुढें कारखाना सुरू झाला. प्रथम प्रथम मंडळींचा अुत्साह दांडगा होता व कामहि कल्पनातीत झपाट्यानें अुरकूं लागलें. " अतिपरिचयात् अवज्ञा " या म्हणीप्रमाणें सर्वांना त्यांत कांहींच बाअू वाटेनासा झाला व " आज मी आपल्या हातानें सर्व प्रयोग करणार " असे म्हणून पुष्कळ जण पुढें सरसावूं लागले. शेवटीं अेक प्रसंग असा आला कीं, त्यावेळीं सर्वांना विश्वरूप-दर्शन घडलें ! फ्यूम्सनें ( फाल्मिनेटच्या धुरानें ) खोली अितकी भरून गेली कीं, माणसास माणूस दिसेना ! फ्लास्कमधील द्रव्याचे मोठमोठे थेंब अंगावर अुडूं लागले व भिंतीपर्यंत लांब जात होते. ठरल्याप्रमाणें दरवाजास बाहेरून कुलूप घालून आमचा मनुष्य बाहेर निघून गेला होता. अशा प्रसंगी आतां स्फोट होणार अशी भीति वाटूं लागली. प्रयोगाचे फ्लास्क पाण्यानें अर्धवट भरलेल्या रुंद तोंडाच्या भांड्यांत ठेवलेले होते. ज्यांचें रक्षण करावयाचें असतें त्यांना अीश्वर बुद्धि देतो. मी खालीं बसून सरकत सरकत जवळ गेलों व फ्लास्कची मान हातानें पकडून आंतील द्रव्य पाण्यांत ओतून दिलें. अशा रीतीनें आलेला प्रसंग निभावला. या गोष्टीचा अेक अनिष्ट परिणाम झाला. तो असा कीं, जो तो मागें मागें घेअूं लागला व पुढें कामास हजर राहीनासा झाला. डॉ. परुळेकर व मुकुंदराव देसाअी हे मात्र डरले नाहींत; व पुढें आमच्या तिघांवरच कारखान्याच्या कामाचा

बोजा पडूं लागला. बाकीची मंडळी धोका नसलेलीं अितर कामें खुषीनें करून आमच्याबद्दल आदर व सहानुभूति दाखवीत असत.

### जर्मन कंपन्यांची सहानुभूति

"नंतर फल्मिनेटला लागणाऱ्या सर्व सामानाची सिद्धता केली. फल्मिनेट तयार करण्याच्या कृतींत थोडासा बदल करून पाहतां त्या प्रयोगांतील धोका जवळ जवळ नाहींसाच झाला. ही बातमी गोपाळरावांच्या मार्फत तज्ज्ञास (बाबूराव खऱ्यांस) मिळाली. तेव्हां हा चमत्कार काय आहे, तो पाहण्यास ते मुद्दाम वसअीस आले. त्यांना सर्व प्रयोग प्रत्यक्ष करून दाखविला. तेव्हां त्यांनी फारच आश्चर्य व्यक्त करून "महाराष्ट्रांत कल्पक व संशोधक लोकांची वाण आहे असें म्हणणारे खरोखरच गाढ अज्ञानांत आहेत" असे अुद्गार काढले! त्या दिवसापासून तज्ज्ञांचा आमच्यावरील विश्वास फारच दृढ झाला. यापुढील प्रयोगांत आमचें सहकार्य घेण्याचें त्यांनीं ठरविलें. पुढचा प्रयोग म्हणजे आतां प्रत्यक्ष बॉंबगोळे तयार करण्याचा होता. त्यासाठीं कांहीं विशिष्ट सामानाची (apparatus) जरूरी होती. तें सामान अितर किरकोळ केमिस्टांकडे मिळणें शक्य नव्हतें. म्हणून मुंबअींत असलेल्या जर्मन फर्म्सची माहिती मिळवून त्यांच्याकडे संधान लावलें. दोघांतिघां गृहस्थांनीं आम्हांस सर्व प्रकारें साहाय्य करण्याचें आश्वासन दिलें. आम्हीं त्यांच्यावर पूर्ण विश्वास टाकावा व खुल्या दिलानें सर्व खरी खरी हकीगत त्यांना सांगावी, असा त्यांच्या बोलण्याचा भावार्थ असे. व आम्ही त्यांना डरतों, म्हणून मनमोकळें बोलत नाहीं, असें पाहून ते अेकमेकांकडे पाहून गालांतल्या गालांत हंसत. तथापि त्यांनी आम्हांस लागणारें सर्व सामान दिलें व पुढेंहि लागेल तें, व लागेल तेवढें, सामान देण्याचें आश्वासन दिलें.

### पहिला बॉंब अुडवण्याचा फसलेला प्रयोग

"सर्व सामान मिळाल्याच्या आनंदांतच आम्ही सर्वजण वसअीस आलों. पिक्रिक वितळविण्यास ३०० डिग्री अुष्णता (हीट) लागते. त्यासाठीं स्टोव्हवर मोठें पातेलें ठेअून त्यांत ३–४ शेर तेल टाकलें. तेल कढत झाल्यावर त्यांत थर्मामिटर व पिक्रिक ॲसिड घातलेलें फ्लास्क ठेवलें. अुष्णतामान ३०० डिग्रीवर येतांच पातेलें खालीं अुतरून घेतलें. पिक्रिकहि वितळत आलेंच होतें. तें तज्ज्ञांनीं आणलेल्या अेका कवचामध्यें (शेलमध्यें) ओतलें.

( हीं शेलस्‌ तयार करण्याचें काम रा. व्यं. प. नागपूरकर व मु. पां. मोघे करीत ). दुसऱ्या दिवशीं थंडगार झाल्यावर त्यावर फल्मिनेट घालून वर सुरक्षिततेचा बंदोबस्त केलेलें ॲपरेटस्‌ म्हणजे स्प्रिंग, रॉड व हँडल हे बसविले, व अशा रीतीनें आमचा पहिला बॉंबगोळा तयार झाला. दांडा धरून गोळा लांब फेकला असतां तो गुरुत्वाकर्षणाच्या नियमानें दांड्यावर पडावयाचा व त्या धक्क्यानें स्प्रिंगनें दाबून धरलेला लोखंडी गज निसटून जोरानें फल्मिनेटवर आदळून सर्वांचा स्फोट व्हावयाचा अशी योजना केलेली होती. स्फोट कसा होतो ? त्यानें किती लांबीपर्यंत मारा होऊं शकतो ? वगैरे गोष्टींचा अंदाज पाहणें जरूरीचें होतें. म्हणून हा पहिला बॉंब उडवून पाहण्याचें ठरलें.

" या कामीं सर्वांचीच जिज्ञासा जागृत झाली व प्रत्येकाला हा प्रयोग शक्य तितक्या लवकर व्हावा असें वाटूं लागलें. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं समुद्रकांठीं फिरावयास सर्व मंडळीं निघाली. जिकडे तिकडे सामसूम होईपर्यंत वाट पाहणें भाग पडलें. कारण वसईचा रमेदी हा भाग समुद्रापासून जवळ येतो व तेथें आवाज ऐकूं गेल्यास रहस्यस्फोट व्हावयाचा. पुळणीवर स्फोट होईल कीं नाहीं याबद्दल शंका उत्पन्न झाली. परंतु जवळपास कठीण जागा नसल्यामुळें शेवटीं पुळणीवरच गोळा फेकला. परंतु त्याचा स्फोट झाला नाहीं. कांहीं वेळ वाट पाहून मग जवळ जाण्याचा हिय्या केला. स्प्रिंगला पुरेसा झटका न मिळाल्यामुळें रॉड निसटूं शकला नाहीं. सर्व मंडळींचा हिरमोड झाला. तज्ज्ञ आपल्याबरोबर हें सर्व लचांड घेऊन मुंबईस गेले. ते लौकरच सर्व बंदोबस्त करून पुन्हा परत यावयाचे होते.

## यशस्वी प्रयोग

" मध्यंतरींच्या कालांत आमच्या मंडळींस तीव्र रुखरुख लागल्यामुळें स्वस्थ बसवेना. आम्हीं अनेक उद्योग केले. शेलच्या ऐवजीं आम्हीं नारळाचें कवच घेतलें. त्याच्या डोळ्यास भोकें पाडून त्यांतून पाणी, खोबरें वगैरे कोरून काढलें; आंत पिक्रिक वितळवून शिरस्त्याप्रमाणें ओतलें. वरचें ॲपरेटस्‌ आमच्यापाशीं नव्हतें. त्याबद्दल रंजूक लाऊन फटाक्याप्रमाणें बार उडविण्याचें ठरलें. डोळ्याच्या भोंकावर फितळेच्यां डबीचें झांकण पक्कें बसविलें होतें. योग्य संधि पाहून डॉ. परुळेकर व मी असे

दोघेच वसअीच्या झुलत्या पुलावरून अरबी समुद्राच्या कांठावर गेलो. गांवांत सामसूम होअीपर्यंत थांबून नंतर रंजूक पेटवून लांब पळालों. डॉक्टर दूरच बसले होते. बार होण्याची वाट पाहूं लागलों. परंतु बार होअीना. मधूनमधून रंजुकेची ठिणगी पडत असल्याचें दिसत होतें. १०–१५ मिनिटें थांबूनहि बार होअीना !! आतां मात्र मोठी पंचाअितीची वेळ आली. जवळ जावें तर धोका ! निघून जावें तरी पंचाअीत ! अशा स्थितींत आणखी १०–१५ मिनिटें गेलीं. नंतर जवळ जाअून पाहतों तो रंजूक विझली होती. पुन्हा रंजुकीला बत्ती देअून दोघेहि पळालों. कानठाळ्या बसतील येवढा मोठा आवाज झाला. आतां जवळ जाण्यांत कांहींच धोका नव्हता. आम्ही शक्य तितक्या त्वरेनें जवळ गेलों. वाळूंत थोडा खड्डा झाला होता. तो पाहत असतांच डबीचें वर अुडालेलें पितळी झांकण आमच्यापासून थोड्या अंतरावर पडून त्याचा आवाज झाला. अितका वेळ तें झांकण वरून खालीं येत होतें हें अुघड आहे.

"अशा रीतीनें तयार झालेला माल पाटणकर दोन वेळा ट्रंकेंत भरून मुंबअीस घेअून गेले. पण पुढे त्यांनीं त्याचा काय अुपयोग केला ? तो कोठें नेला ? या गोष्टीची चौकशी आम्हांस करण्यास संस्थेच्या नियमाप्रमाणें परवानगी नव्हती व आम्हींहि केली नाहीं. अेका खेपेचें हें सामान पुण्यास रा. कुलकर्ण्यांच्या मार्फत बाबूराव खरे पाठवणार होते.

"दुसऱ्या खेपेस अण्णा कर्वे यांच्या मंडळीकडे तो माल गेला होता. रा. गोपाळराव यांचा संबंध बऱ्याच अितर शाखांशीं होता, व महाराष्ट्राबाहेरहि त्यांचा पुष्कळ लोकांशीं घनिष्ठ संबंध असे. खर्चास लागणारे पैसे ते कोठून व कसें आणीत याची आम्हांस कल्पना नव्हती, व अद्यापपर्यंत मला तरी या गोष्टींचा अुलगडा झालेला नाहीं. त्याचा अुल्लेख मागें केलाच आहे.

## ग्रामकंटकांच्या चांभारचौकशा

"आमचा कारखाना चालूच होता. सामान आणण्याकरितां आमच्या वरचेवर मुंबअीस खेपा होअूं लागल्या व गोपाळराव व तज्ज्ञ गुरुजी हे वरचेवर वसअीस येअूं लागले. त्यामुळें वसअीच्या मंडळीस हें काय गूढ आहे हें कळेना. रिकामटेकड्या ग्रामकंटकांची जिज्ञासा वाढीस लागली. कांहीं मंडळींनीं आमच्यावर दुरून पाळत ठेवली व ते आमच्या मागोमाग

मुंबअीस आले व आमची पाठ सोडीनात! ही गोष्ट आमच्या ध्यानांत आली; व त्यांना हुलकावणी देण्याकरितां आम्ही, आमचें काम लांबणीवर टाकून, ग्रँटरोडवरील थिअेटरमध्यें "सफेद खून" हा खेळ पाहावयास गेलों; व मधल्या सुटींत भोंवतालच्या हीन वस्तींतून फेरफटका करून पुनः थिअे-टरमध्यें आलों. या युक्तीचा अिष्ट परिणाम झाला, व आमच्या मागचें लचांड सुटलें. परंतु लोकांमध्यें आमच्याबद्दल बराच गैरसमज अुत्पन्न झाला. या गैरसमजाचा डॉ. परुळेकरांच्या प्रॅक्टिसवरहि परिणाम होतो कीं काय अशी भीति अुत्पन्न झाली. मी अविवाहित तरुण असल्यामुळें मला त्याची विशेष फिकीर वाटली नाही व ही अेक अिष्टापत्तीच आहे असें मला वाटलें. मी रहात होतों त्या गोखले यांच्याकडे शिवराम या नांवाचा कोंकणचा अेक ब्राह्मण शागीर्द असे. भाटे मास्तरकडे डॉक्टर वरचेवर कां येतात? २–२, ३–३ तास त्यांचें काय चालतें? वगैरे गोष्टींचा त्याला अुलगडा होअीना. तेव्हां त्यांनी अितर मंडळीजवळ गुपचूप चौकशी चालविली व शेवटीं निष्कर्ष काढला की, हे लोक चैनी बाहेरख्याली असल्यामुळें कांही तरी गुप्त रोगानें पछाडले असावेत. 'करील तो भरील', 'कुत्ता जाने चमडा जाने' आपणांस या गोष्टीशी काय कर्तव्य आहे? असें जाणून तो स्वस्थ राहिला.

"सामानाचा विस्तार व कामाचा व्याप वाढत चालल्यामुळें कारखा-न्याकरितां अेखादी निर्वेध व सोयीची जागा शोधणें भाग पडलें. मुकुंदराव देसाअी यांनीं सूचना केली कीं, येथून जवळच पाणजू नांवाचें खेडेगांव आहे. तेथें कारखाना नेल्यास राहण्याची, जेवणाची व कामाला लागणाऱ्या निर्वेध जागेची सोय मी करतों; व गुप्तता राखण्याची सर्व जोखीम मी आपल्या शिरावर घेतों. ही कल्पना सर्वांना पसंत पडली. शाळेला मे महिन्याची सुटी असल्यामुळें मीहि जाअू शकलों. वसअीच्या किल्ल्याच्या धक्क्यावरून होडींत बसून आम्ही तीन-चारजण पाणजूकडे जाण्यास निघालों. वसअीच्या पुला-खालून २–३ मैल वर गेल्यावर अेका खोचींत होडी वळली व तेथून आम्ही नव्या ठिकाणीं पायीं चालत गेलों. ज्यांच्याकडे आम्ही अुतरलों होतों ती कुडाळ देसकर मंडळी होती. त्यांनीं आमची व्यवस्था फारच अुत्तम ठेवली होती. सुमारे ७–८ दिवस आम्ही तेथें होतों. परंतु लौकरच खेडेगांवच्या राहणीस कंटाळून आम्ही परत आलों. काम मात्र मनासारखें झालें नाहीं.

## वसईकरांची मदत

" वसईंतच दुसरी जागा शोधूं लागलों. या कामीं रा. बापूराव वाघ यांची फार मदत झाली. त्यांनीं स्मशानाच्या पलीकडे असलेल्या आपल्या बागेंत जागेची सोय केली. एक मोठा मंडप घातला होता व त्यांतच एक खोली सामानाकरितां व दुसरी प्रयोगांकरितां काढली होती. बाहेर बुद्धिबळाचे व पत्त्यांचे डाव चालत व आंत प्रयोग चालू असत. या ठिकाणीं असतांना गोपाळराव पाटणकर पाहणी करण्यास आले व त्यांनीं समाधान व्यक्त केलें. येथें वेळप्रसंग आल्यास आत्मसंरक्षणाचें कांही तरी साधन आम्हांस अवश्य पाहिजे, अशी आम्हीं मागणी केल्यामुळें गोपाळरावांनीं ॲटोमॅटिक सातबारी दोन पिस्तुलें (सावरकरांकडून विलायतेहून आल्यांपैकीं) माझ्या स्वाधीन केलीं व ३०–४० काडतुसेंहि दिलीं. ईश्वरकृपेनें पिस्तुलांचा उपयोग करण्याची वेळ आमच्यावर आली नाहीं; व पावसाळा सुरू होण्याचे दिवस जवळ आल्यामुळें सर्व कारभार आवरतां घेऊन आम्ही परत आपआपल्या उद्योगास लागलों. पुढें गोपाळरावांनीं एक पिस्तुल परत नेलें व एक मजपाशीं अखेरपर्यंत होतें. शेवटीं गोपाळरावांच्या इच्छेमुळें मला तें कसें परत द्यावें लागलें त्याबद्दलची मनोरंजक हकीगत पुढें येईलच.

दे. बापूराव वाघ यांच्याबद्दल माहिती सांगणें जरूर वाटतें, म्हणून त्यांच्याबद्दल थोडेसें लिहितों. ते कुडाळे देशस्थ ब्राह्मण. त्यावेळीं पन्नाशीच्या पुढें यांचें वय होतें. आमच्या मानानें ते बरेच मोठे, म्हणजे आम्हांस वडिलां-सारखे, वाटत. शरीरानें पिळदार, प्रकृतीनें खणखणीत व दिसण्यांत भारदस्त असे हे गृहस्थ होते. यांचा गांवांत फार दरारा असे. त्यांच्यापेक्षां धैर्यवान् माणूस वसईंत सांपडणार नाहीं असें लोक म्हणत. ज्याक्सनचा अकस्मात खून झाल्यामुळें, व लवकरच दे. पाटणकर यांना अटक झाल्यामुळें, आमची जी धांवपळ व तारांबळ झाली त्यावेळीं बापूराव वाघांनीं जी बाजू सांभाळली व सर्व मालमुद्दा नाहींसा करून पुन्हा " अरे, अबी डर तो पिछे रही " असें सांगून सर्व लोकांस धीर दिला, याबद्दल त्यांचे जितके धन्यवाद गावे तितके थोडेच आहेत !

" तसेच दे. काकासाहेब पाटील या नांवाचे एक सुखवस्तु वकील

वसअीस राहात असत. हे मोठे राजकारणी व मुत्सद्दी होते. ह्यांच्या चळवळीचा थांगपत्ता बहुधा कोणाला नसे; परंतु ह्यांच्या ओळखी फार असत व हस्तें परहस्तें देशकार्यास ह्यांची नेहमीं मदत होत असे. अशा कार्यांत ह्यांचा हात सढळ असे. ह्यांची आमची प्रथम भेट झाली त्यावेळेस ह्यांना आमच्या बद्दल अित्थंभूत माहिती (कळण्याचें कारण देशभक्त गंगाधरराव देशपांडे यांच्यामार्फत या काकांची, लक्ष्मणराव छत्रे यांची व माझी आणि गोपाळरावांची ओळख झाली होती हें) असल्याचें पाहून आम्हांस फारच आश्चर्य वाटलें! त्यानंतर आमची त्यांच्याशीं दाट ओळख झाली व आम्हांस अडीअडचणींच्या वेळीं ह्यांचा सल्ला व मार्गदर्शन मिळत असे.

### गुप्त अंक-लिपी

" ह्या कामांतील पत्रव्यवहारासाठीं आम्ही अेक (कोड) लिपी बसविली होती व त्या लिपींतून पत्रव्यवहार चाले. लिपी आंकड्यांची होती. दर्शनीं शाअीनें सुवाच्य लिहिलेल्या पत्राच्या मागील बाजूस (पाठकोरे कागदाच्यावर) खरें पत्र अुदाहरणासारखें पेन्सिलीनें लिहिलेलें असें. म्हणजे अितर कोणासहि पाठकोऱ्या कागदावर पत्र लिहिलें आहे असा भास व्हावा व पेन्सिलीनें अुदाहरण सोडविलेल्या पद्धतीनें लिहिलेल्या मुख्य पत्रांकडे कानाडोळा व्हावा. शाअीनें लिहिलेल्या मजकुरांतसुद्धां पाठीमागें लिहिल्या मजकुरांचा बोध होण्यास सुलभ जावें म्हणून सांकेतिक भाषेंत, म्हणजे विशिष्ट वस्तूस विशिष्ट नावें देअून, आमचें म्हणणें कळवीत असूं; जसें नारायण म्हणजे नायट्रिक ॲसिड, सदाशिव म्हणजे सल्फ्यूरिक ॲसिड, वगैरे. चि. नारायण बराच कृश झाला आहे हें वाक्य नायट्रिक ॲसिड संपुष्टांत आलें आहे ह्या अर्थानें लिहिलें जात असें. 'चि. सदाशिव ह्याची तब्येत ठीक असून, अभ्यास चांगला करतो आहे. त्याची काळजी नसावी.' ह्यावरून सल्फ्यूरिक ॲसिड पुरेसें असून चांगलें काम देत आहे, त्याबाबत काळजी करूं नये असा बोध होत असें. तसेंच सुरती बर्फीचें पार्सल मागविलें आहे, ते दोन-चार दिवसांत येअील. त्या सुमारास तुम्ही आल्यास तुमचा वांटा तुम्हांस मिळेल. ह्यावरून पिक्रिक ॲसिड दोन-चार दिवसांत बरेचसें तयार होअील, तुम्ही यावें, कारण तें वेळेवर हलविलें पाहिजे, असा अर्थबोध होत असे.

" होतांहोअीतों पत्रव्यवहार करण्याचें आम्हीं टाळीत असूं. परंतु विशेष जरूरी लागल्यास पत्रव्यवहार करण्याचें कांहीं तरी गुप्त साधन असावें म्हणून आम्हीं ही गुप्त ( कोड ) लिपी बसविली होती. पत्र अिंग्रजींत अगर मराठींत कोणत्याहि भाषेत लिहावें. मराठींत पत्र लिहिलें असल्यास त्यांचें प्रथम रोमन मराठींत रूपांतर करावें लागे. नंतर प्रत्येक अक्षराची संज्ञा त्यांच्या ठिकाणीं लिहावयाची. संज्ञा खालीलप्रमाणें होत्या.

संज्ञा

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| A, | B, | C, | D, | E, | F, | G, | H, | I, | J, | K, | L, |
| 11, | 13, | 15, | 17, | 19, | 31, | 33, | 35, | 37, | 39, | 51, | 53, |
| M, | N, | O, | P, | Q, | R, | S, | T, | U, | V, | W, | X, |
| 55, | 57, | 59, | 61, | 71, | 73, | 75, | 77, | 79, | 91, | 93, | 95, |

Y, Z. . ? ! sign of Exclamation

97, 99. 22 44 66 शब्द वेगळेवेगळे लक्षांत यावे म्हणून + − × ÷ अधिक, अुणें, गुणिलें, भागिलें या संज्ञांचा फार अुपयोग होत असे.

" साधें मामुली खुशालीचें पत्र शाअीनें लिहावयाचें व त्याच्या पाठीवर पेन्सिलीनें कोडलिपीत खरें पत्र लिहीत असूं. पेन्सिलीनें लिहिलेल्या आंकड्यांना व्यवहारी अपूर्णांकाचें अगर दशांश अपूर्णांकांत लिहिलेल्या अुदाहरणाचें रूप आणावयाचें. म्हणजे पत्र लिहिण्यास पाठकोरा कागद घेतल्याचा भास व्हावा. ह्या युक्तीमुळें आमची फार सोय झाली. अिकडून तिकडे व तिकडून अिकडे व्यवस्थेशीर रीतीनें कालाचा व पैशाचा अपव्यय न होतां संदेश जाऊं येअूं लागले. पत्र हातीं पडल्याबरोबर प्रथम २२, ४४ व ६६ या सम आकड्यांबद्दल त्यांचीं चिन्हें करून हे आंकडे खोडून टाकावयाचे. कोडलिपींत कोणतेहि अितर सम आकड्यांचा समावेश नाहीं. म्हणून कोड अुलगडून पाहण्याचा कोणी प्रयत्न केल्यास त्याची पूर्ण दिशाभूल करण्याकरितां पाहिजे तितके सम आंकडे पत्रांत लिहिण्यास पूर्ण मोकळीक मिळे. विराम चिन्हें मुक्रर केल्यानंतर दुसरें अगत्याचें काम म्हणजे सर्व सम आंकडे खोडून टाकणें. नंतर अुरलेल्या विषम आंकड्यांवरून पत्रांचा

अर्थ तात्पुरतें कोड स्मरणानें कागदावर लिहून काढून लावणें. नंतर तें पत्र व लिहिलेले कोड यांचा ताबडतोब नाश करणें.

परशराम = पारा; नथू = नॅफ्थलीन वगैरे अशी परिभाषा असे. असो.

### ज्याक्सनचा खून व निरवानिरव

" कामाचा व्याप वाढल्यामुळें यापुढें मी शाळेच्या नोकरीत गुंतून राहूं नये, असें सर्वानुमतें ठरल्यामुळें मी नोकरीचा राजीनामा दिला व मोकळा झालों. कांहीं दिवस गोपाळरावांनीं मला मुंबअीस बोलावून घेतलें होतें. तेथून पुण्यास गोपाळरावांबरोबर गेलों. रा. मोरोपंत गोरे यांचें लग्न ठरत होतें. आम्हीं दोघेहि त्यांच्या वऱ्हाडी मंडळींत सामील झालों. लग्न ठरलें. मुहूर्त ४–५ दिवसांवर होता. दे. भास्करराव फडके यांच्याकडेसच मोरोपंताचा जानोसा होता. डॉ. गो. बा. गोखलेहि लग्नाकरितां आले होते. (यांच्याच हाफकीन अिन्स्टिटयूटमधल्या बिऱ्हाडीं अण्णा कर्वे व मी खलबत करीत असूं.) लग्न होअीपर्यंत आम्हीं पुण्यासच राहावें असा सर्वांचा आग्रह पडल्यामुळें आम्ही तेथेच राहिलों. असे २–३ दिवस गेले, आणि अचानक ज्याक्सनच्या खुनाची बातमी आमच्यापर्यंत येअून थडकली. गोपाळराव ताबडतोब मुंबअीस निघून गेले. आतां पुढें काय करावयाचें हा प्रश्न पडला. दे. फडके व डॉ. गोखले यांच्या विचारें मी ताबडतोब वसअीस जावें व सर्व निरवानिरव करून बंदोबस्तानें राहावें असें ठरलें; व मी रात्रीच्या गाडीनें निघून मुंबअीस आलों. केशवजी नायकाच्या चाळींत जाणें धोक्याचें वाटलें म्हणून दुरून दुरून तपास केला. परंतु कांहीं थांगपत्ता लागेना. नाशीकच्या लोकांवर अितकी कडक नजर होती की, खाणावळींत त्यांना जेवणखाण सुद्धां मिळणें अशक्य झालें होतें! सदहू परिस्थिति पाहून मीं ताबडतोब वसअीचा रस्ता सुधारला. वसअीच्या मंडळींना सर्व हकीगत सांगितली. ज्याक्सनच्या खुनाशीं आमच्या मंडळींचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नव्हता.* परंतु दे. तात्याराव सावरकरांनीं पाठविलेल्या वीस पिस्तुलांपैकीं अेक

---

* अेकमेकांच्या गटांतल्या लोकांची अेकमेकांस ओळख सुद्धां असूं नये, ह्या सुरक्षितपणासाठीं केलेल्या नियमामुळें ज्याक्सनच्या खुनाशीं संबंध नव्हता असें या मंडळीस व आम्हां सर्वांस सहजच वाटलें.

आमच्याकडे होतें. सदरहू पिस्तुलें गोपाळरावांच्या मार्फत वाटलीं गेलीं होतीं व त्यांपैकीं ४ पिस्तुलें दे. कान्हेरे, कर्वे वगैरे मंडळींपाशीं नाशिकलाच मिळालीं तीं पोलिसांनीं जप्त केलीं होतीं. आतां सुतानें स्वर्गास जाणारे पोलीस आपला माग काढीत आज ना अुद्यां येतील, असा जबरदस्त संभव होता. मुंबअीस दूत पाठवून दररोज परिस्थितीत होणारे फेरबदल डोळ्यांत तेल घालून पाहणें भाग होतें. २–३ दिवसांनीं गोपाळरावांना अटक झाल्याची बातमी आली. आतां मात्र स्वस्थ राहणें धोक्याचें वाटूं लागलें. रात्रीं दे. बापू वाघ यांच्या बागेंत सर्वांनीं जमून विचारविनिमय केला. दे. बापूंची हिंमत दांडगी. त्यांना हजारबाराशें रुपयांचा माल नाश करून टाकणें पटेना. म्हणून त्यांनीं सर्व माल जमिनींत गाडून टाकण्याचा बेत ठरविला. अितर मंडळींना "सर्व माल समुद्रास्तृप्यंतु" केला असें सांगून आम्ही चौघांनीं तो माल रात्रीं, अहोरात्र काम करून, जमिनीत गाडून टाकला! पिस्तुल डॉक्टरांनीं बंदोबस्तांत ठेविलें होतें. व अितर सर्व लिखाणाच्या वह्या वगैरे दे. ठाकूर वकील यांनीं जिवापलीकडे जतन करतों, असें आश्वासन दिल्यामुळें त्यांच्या स्वाधीन केल्या.

"अशा प्रकारें सर्व व्यवस्था करून मी भाअिंदरास गोखले यांच्याकडे जाअून राहिलों. कै. मोरो नारायण गोखले हे मला पुत्राप्रमाणें मानीत असत. त्यामुळें मला गोखले यांच्या घरीं मुळींच परकेपणा वाटत नसे. मुंबअीस घडणाऱ्या सर्व घटनांचा कानोसा रा. गोपाळ मोरेश्वर, व गंगाधर मोरेश्वर, हे दोघे गोखले बंधु घेत असत. त्यांच्या व्यापारानिमित्त वरचेवर मुंबअीस खेपा होत. गोखले मंडळींनीं या वेळीं मला जें साहाय्य केलें त्याबद्दल मी त्यांचा कायमचा ऋणी आहें.

"दे. गोपाळरावांच्या मागें पोलीसांचा लकडा लागल्यामुळें कांहीं गोष्टी त्यांना अखेर कबूल कराव्या लागल्या. त्यांना पकडलें त्या वेळीं त्यांच्या हातावर (अंगावर व कपड्यावरहि) पिक्रिक ॲसिडचे डाग होते. परंतु पोलिसांच्या ध्यानांत ही भानगड काय आहे तें आलें नाहीं. पोलिसांच्या तत्कालीन बॉंबबद्दलच्या अज्ञानाचा हा प्रत्यक्षच पुरावा होता. २० पिस्तुलांचा पत्ता लावून द्या म्हणजे आम्ही तुम्हांला त्रास देणार नाहीं, असें पोलिसांनीं आग्रहाचें बोलणें लावलें व "सर्व नाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः" या

न्यायानें, व अंगावर असलेला पिक्रिक ॲसिडचा पुरावा गुलदस्तांत ठेवण्याच्या अुद्देशानें, त्यांनीं म्हणजे गोपाळरावांनीं पोलीसचें म्हणणें कबूल केलें व त्यांना घेअून ते पेणेस गेले.

"पेण येथेंहि वसअीसारखें अेक केंद्र होतें. त्याचे व्यवस्थापक मराठे – वर अुल्लेखिलेले रा. त्र्यंबक गंगाधर मराठे – म्हणून होते. ते मराठी ट्रेन्ड शिक्षक असून पेणच्या सरकारी शाळेंत नोकरी करीत होते. सदरहू मराठे व कोठूरचे दे. वामन श्रीधर बरवे हे, आमच्याकडे येअून सर्व विद्या शिकून, आपल्या गांवीं गेले असल्यामुळें आमचा त्यांचा दृढ परिचय होता. पेण येथें गोपाळरावांचा अेक आतेभाअू (विठोबा मराठे) रहात असे. तो २-३ महिन्यापूर्वी मयत झाला होता. लपवून ठेवण्याकरितां त्याच्याजवळ पिस्तुलें दिली होतीं, असा गोपाळरावांनीं बहाणा केला. परंतु त्या ८ पिस्तुलांपैकीं दोन पिस्तुलें याच्याकडून त्याच्याकडे व त्याच्याकडून आणखी तिसऱ्याकडे अशीं फिरत गेलीं होतीं. शिंदे व सदावर्ते असे दोघे पोलीस अधिकारी गोपाळरावांच्या बरोबर पेणला आले होते. मि. शिंदे यांनीं या दोन पिस्तुलांकरितां ८ तरुणांना गुन्हेगार म्हणून गोंवलें. त्यांत मराठे मास्तर, विनायक कोल्हटकर, शंकर भट वगैरे मंडळी सांपडली गेली. शंकर भटाची तर, शिंद्यांनीं अेक थोबाडींत देतांच, अितकी गाळण अुडाली कीं त्यानें हात जोडून "माझ्या पाशीं दोन आहेत ती देतों" असें सांगितलें. शिंदे म्हणाले माणूस मागतो अेक डोळा तर देव देतो दोन: वाहवा रे शूर ब्राह्मणा ! ! !

"अशा रीतीनें ज्याक्सन खुनाच्या केसच्या तपासाला अुग्र स्वरूप येत चाललें. गोखले यांच्या घरीं मी पकडला गेलों तर गोखले यांना फार त्रास होअील, व त्यांच्याकडून भरमसाट पैसे अुकळण्याचा पोलीस प्रयत्न करतील, अशी साधार भीति वाटूं लागली. त्यामुळें मी पहाटेस अुठून, फराळाचा डबा व पाणी पिण्याकरितां भांडें घेअून, आजूबाजूच्या निर्जन प्रदेशांत अगर रानावनांत सर्व दिवस काढीत असे व रात्रीं दहाची शेवटची मुंबअीची गाडी येअून गेल्यावर कांहीं वेळानें घरीं येअून झोपत असे. परंतु अशा तऱ्हेनें भटकणें जास्त धोक्याचें वाटल्यामुळें मी पुन्हां वसअीस येअून राहिलों.

"महिना दीड महिना लोटला. आमचा थांग पत्ता अद्याप पोलिसांना

लागला नव्हता. ( आमच्या गुप्त कारस्थानांच्या परिपूर्णतेचा हा विजय होता. ) परंतु केव्हां धाड येअील याचाहि नेम नव्हता. पेणेस आलेल्या अनुभवानें गोपाळराव सावध झाले व त्यांनीं आम्हांस धक्का न लागतां पिस्तुल काढून घेण्याची मसलत मि. सदावर्ते यांच्या साहाय्यानें रचली. ( ही आम्ही नाशकास तुरुंगांत असतांच कशी रचली ती हकीकत पुढें येअील. ) अेके दिवशीं दुपारीं १२ च्या गाडीनें रा. बाळकृष्ण गोरे वसअीस माझ्याकडे आला. त्यानें सर्व हकीकत सांगितली व पिस्तुलाची मागणी केली. पिस्तुल देण्याचें मीं कबूल केलें. परंतु ( भित्रेपणानें ) बाळकृष्णा तें स्वतः नेण्यास तयार नव्हता. तो मला तें मुंबअीस आणून दे, असें म्हणूं लागला. त्यामुळें मला यांत कांहींतरी दगा आहे असा संशय वाटूं लागला. म्हणून मीं मुंबअीस पिस्तूल बरोबर घेअून जाण्याचें साफ नाकारलें. बाळकृष्णानें माझी समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण मग तूं तें घेअून कां जात नाहींस, याचें समर्पक अुत्तर त्यास देतां येअीना. अखेर हताश होअून त्यानें गोपाळरावांचें स्वदस्तुरचें पत्र मला दिलें. गोपाळरावांना अशी कांहीतरी भानगड अुपस्थित होअील असें वाटल्यामुळें हें पत्र त्यांनी दिलें होतें. अगदी नाअिलाज होअी-पर्यंत पत्र दाखवूं नको, पत्राशिवाय काम झालें तर पहा, असें बजावलें होतें. परंतु जिन्नस मिळाल्याखेरीज तेथून हालूं नको, अशी ही ताकिद दिली होती. सदरहू पत्र मीं वाचलें व डॉ. परूळेकरांच्या हातीं वाचून पाहण्यासाठीं दिलें. पत्रांतील मजकूर खालीलप्रमाणें होता :– " कोणत्याहि तऱ्हेचा अविचार न करतां वस्तु ( पिस्तुल ) आमच्याकडे परत करावी. यांतच सर्वांचें कल्याण आहे. ज्यास्त लांबण लावल्यास, ज्या गोष्टी प्रकट होणें अिष्ट नाहीं त्या प्रकट होतील, व वसअी केंद्राची पेणसारखी धुळधाण अुडेल. मीं योजलेली मसलत अुत्तम व बिनधोक्याची आहे; तरी तिचा फायदा घ्यावा व स्वतःचें – व सर्वांचें – रक्षण करावें. तुम्हीं तसें न केल्यास अनर्थ होअील. मी पूर्ण विचार-पूर्वक ही योजना केली आहे. यापेक्षां ज्यास्त लिहितां येत नाहीं. " तरी तुम्हीं अनमान करूं नये, तुम्हांला माझी शपथ आहे. "

पत्र वाचून आम्ही बरेच घोटाळ्यांत पडलों. कांहीं वेळ डॉक्टरशीं अेकीकडे विचारविनिमय करून बाळकृष्णास सांगितलें कीं, आतां आमची

समजूत पटली. मी ४ च्या गाडीनें वस्तु घेऊन येतो. तूं खुशाल मुंबअीस परत जा व "मी येतों काळजी करूं नये" असें गोपाळरावांना सांग.

"४ च्या गाडीनें जाण्याच्या अैवजी मी २। च्या गाडीनें वस्तु (पिस्तुल) घेऊन निघालों; व वांद्र्यांस त्या गाडींतून अुतरून दुसरी फास्ट गाडी तयार होती तिच्यांत बसलों व चर्नीरोडपर्यंत न जातां ग्रँटरोडला अुतरून पायींपायीं केशवजी नायकाच्या चाळीत गेलों. बाळकृष्णा अेकटाच गॅलरींत सचिंत बसला होता. मला आलेला पाहून त्याला हायसें वाटलें. गोपाळ-रावांना बरोबर घेऊन सदावर्ते (पोलीस अिन्स्पेक्टर) कोठें तरी गेले आहेत, असें बाळकृष्णानें मला सांगितलें. त्यांनीं दाखविलेल्या ठिकाणीं वस्तु (पिस्तुल) ठेवून दिली व त्याच्या कानांत सांगितलें कीं, "पिस्तुलांत सात बार भरलेले आहेत. जरूर पडल्यास त्याचा अुपयोग करावा", असें गोपाळरावांना अेकीकडे घेऊन सांग. त्यानंतर चहा घेऊन तेथून पाय काढला तो रात्रीं ८॥ ला भाअिंदरास आलों. गोखले मंडळीस सर्व हकीकत सांगून सावध राहण्याचा अिशारा दिला व पुढच्या गाडीनें वसअीस येऊन दाखल झालों.

## समुद्रास्तृप्यंतु।

"मुंबअीस जाण्यास निघण्यापूर्वी मुख्य मुख्य मंडळीस बोलावून पुढची व्यवस्था ठरविली. यापुढें कोणतेंहि जोखम जवळ ठेवावयाचें नाहीं असें निश्चित केलें. ज्यांना ज्यांना म्हणून या कारखान्याची माहिती होती ते सर्व लोक वेठीला धरून त्यांच्या हस्तें सर्व माल रात्रीं समुद्रकांठीं वाहून न्यावयाचा व त्यांच्यासमक्ष सर्वच्या सर्व वस्तूंचा नायनाट करून टाकावयाचा, लोभ बिलकुल धरावयाचा नाहीं, असें ठरवून हें काम डॉक्टरकडे सोंपविलें. त्यांनीं ठरल्याप्रमाणें सर्व काम व्यवस्थित केलें. अखेरीस अशा तऱ्हेनें पिक्रिक ॲसिडच्या १५–१६ बरण्या, कॅरबालिकच्या ३०–४० बाटल्या, मोठीं मोठीं फ्लास्कस्, थरमॉमीटर, पारा वगैरे सर्व वस्तु खरोखरीच "समुद्रास्तृप्यंतु" झाल्या.

"मी वसअीस आल्याबरोबर दे. बापू वाघ यांच्याकडे गेलों. सर्वजण समुद्रावर गेले असल्याचें समजलें म्हणून समुद्रावर गेलों. मंडळी रिकाम्या बरण्यांचें काय करावें या विचारांत होती. सबंध बरण्या पाण्यांत बुड

विल्यास त्या अुघडकीस येण्याची भीति होती. समुद्रकांठीं बरण्या फोडण्यास दगडहि मिळण्यासारखा नव्हता. तेव्हां बरणीवर बरणी आपटून त्यांचे तुकडे तुकडे केले व समुद्रांत ठिकऱ्यांचा खेळ करून फेकून दिले. नंतर सर्व-जण वेगवेगळया रस्त्यानें घरोघर चालते झाले !

## बाँबचे कारखानदार सरकारी नोकर झाले !

"आतां यापुढें काय करावयाचें असा विचार पडला. नाशिकहून वडिलांचीं* पत्रें नासिकला येण्याबद्दल येत होतीं. मार्च १९१० अखेर वडील पेन्शनमध्यें निघण्याचें निश्चित ठरलें होतें. म्हणून मी नोकरीकरितां डायरेक्टरसाहेबांकडे ताबडतोब अर्ज करावा, व पुण्यास जाअून खटपट करावी, असें वडिलांचें आग्रहाचें पत्र आलें. मीहि दिङ्मूढ झालों असल्या-मुळें वडिलांची आज्ञा मान्य करून पुण्यास वडील बंधूकडे गेलों व पुढें तेथेंच राहिलों.

"कर्मधर्मसंयोगानें मे. डायरेक्टरसाहेब – मि. शार्प – हे नाशिकला जातीनें आले. ह्या भेटीचा संबंध ज्याक्सन मर्डर केसशीं होता. तें काम अुरकून ते नाशिक हायस्कुलांत आले. जाण्याच्या पूर्वी त्यांनीं पेन्शनमध्यें जाणाऱ्या लोकांना भेटण्याकरितां बोलाविलें. 'तुला कांहीं सांगावयाचें आहे काय', असें त्यांनीं वडिलांना विचारलें. तेव्हां वडिलांनीं सांगितलें कीं, साहेब, मी अद्यापपर्यंत नोकरीकरितां अगर प्रमोशनकरितां अर्ज केलेला नाहीं ! ! हा माझा पहिला व शेवटचाच अर्ज आहे. माझ्या अेका मुलाला नाशिकची माझी जागा मिळावी व मला अखेरपर्यंत नाशिकक्षेत्रीं राहतां यावें, म्हणून मी माझ्या मुलाला स्कूल ऑफ आर्टमध्यें ठेवून या जागेला पूर्णपणें लायक ( क्वालिफाअिड ) करून ठेवला आहे. त्यास माझ्या जागेवर नेमून मला अुपकृत करावें असा अर्ज करतों. ह्या बोलण्याचा शार्पसाहेबांवर फार अिष्ट परिणाम झाला. त्यांनीं आपल्या डायरींत सर्व माहिती टिपून घेतली व वडिलांना आश्वासन देअून साहेब पुण्यास परत गेले. दिलेलें आश्वासन

---

* वडिलांनाच काय पण आमच्याशिवाय कोणालाहि रामभाअू भाटे हे बाँबच्या कारखान्याचे चालक होते हें माहीत नव्हतें. म्हणूनच त्यांना ही नोकरी मिळाली, टिकली व आज ते सरकारी नोकरींतून सेवानिवृत्त झाले आहेत.

त्यांनीं अक्षरशः पाळलें व आलेले १००–२०० अर्ज बाजूस सारून माझी १ अेप्रिल १९१० पासून नाशिक हायस्कूलमध्यें ड्रॉअिंग मास्तर म्हणून नेमणूक झाली " ( भाटे यांच्या स्मृति समाप्त ).

दैवानें खैर केली

वसअी केंद्राची, म्हणजे आमच्या अभिनव भारताच्या प्रचंड बॉंबच्या कारखान्याची, अशी शेवटीं विल्हेवाट लागली! त्यांत भाग्य अितकेंच कीं, ह्या भयंकर गुन्ह्याबद्दल – अिंग्रज सरकारच्या कायद्याप्रमाणें बॉंब तयार करणें हा त्यावेळीं अत्यंत भीषण असा गुन्हा मानला गेला होता – या वसअी केंद्रांतल्या कोणाहि सभासदास यत्किंचितहि तोशीस लागली नाहीं! याचीं कारणें अनेक आहेत. त्यांपैकीं पाहिलें म्हणजे वसअी केंद्राबद्दल माहिती असणाऱ्या आमच्यापैकीं कोणीहि आरोपितानें अेक अवाक्षरहि काढलें नाहीं. अ. भारताच्या मूळ शाखेपैकी आम्ही जे पकडले गेलों होतों, त्यांनी कोणीच कबुलिजबाब दिले नाहीत. गोपाळराव पाटणकर, अण्णा कर्वे, बाबुराव खरे, त्र्यंबकराव मराठे, व्यंकटराव नागपूरकर, मुकुंदराव मोघे यांनीं व अितर कांहींनीं, नाअिलाजानें पोलीस-छळामुळें, कबुलीजबाब दिले होते. पण त्यांत प्राप्त संकट थोडक्यांत वारण्याअितकीच माहिती त्यांनीं सांगितली होती. खरा धोका होता तो पाटणकर व कुळकर्णी ( राजसाक्षी, अॅप्रून्हर ) यांच्या बाबतींत. कारण पाटणकर पकडले गेले त्याक्षणापूर्वी त्यांच्या घरीं पिक्रिक ॲसिड, फल्मिनेट वगैरे बरेंच होते. पेणला ते तें पाठवणार होते. त्याचें नीट बोचकें बांधून तें त्यांनीं ( आतां कैलासवासी ) गणपतराव काळे ( आहिताग्नि राजवाड्यांचे चिटणीस ) यांच्याबरोबर दिलें होतें. गणपतराव काळे तें घेअून घराबाहेर निघालेहि होते. केशवजी नायकांच्या चाळीला अुतरावयाचे जिने दोन. नेहमीं फक्त मोठ्या दरवाजाच्या जिन्यानें जाण्यायेण्याची वहिवाट असे. गणपतराव काळ्यांच्या व आमच्या सर्वांच्या नशिबानें म्हणा, काळ्यांना नेहमींच्या जिन्यानें अुतरण्याची बुद्धि झाली नाहीं! ते दुसऱ्या बाजूच्या जिन्यानें अुतरण्याच्या अुद्देशानें अुलट बाजूस निघाले! आणि नेहमींच्या जिन्यानें नेमकें, त्याच क्षणीं, गोपाळरावांना अटक करण्यास पोलिस अधिकारी वर येत होते! ते अधिकारी वर आले आणि काळे अुलट बाजूनें खालीं गेले. पण पोलिसांस पाहतांच चाळींत व खालीं कुजबूज सुरू झालीच होती. ती

पाहतांच तें बाँबचें बोचकें घेऊन काळे जे निघाले ते तडक अेकदम मिळाली ती व्हिक्टोरिया करून थेट बंदरावरच गेले आणि बोटीचा रस्ता धरला. समुद्रावर बोटींत चढल्यानंतर, व बरेंच पुढें गेल्यावर, योग्य संधि साधून, तोल गेल्यासारखें सोंग करून, तें बोचकें समुद्रांत त्यांनीं टाकून दिलें. अशा सुयोगानें ते स्वतः तर वाचलेच पण आम्हीहि त्या संकटांतून अचानक वांचलों. आतां कै. रा. काळ्यांनीच ही सर्व हकीकत मी सुटून आल्यावर मला सांगितली. अेकदोन मिनिटांचाच अुशीर होअून काळे सांपडते तर आमच्या खटल्याचें स्वरूप फारच भयंकर होअून, आम्ही बहुतेक जण निदान जन्मठेप म्हणा, किंवा ८–१० वर्षें काळेपाणी म्हणा, भोगण्यास अंदमानांत तरी खास गेलों असतों. पण ते २–४ क्षण काळ्यांच्या व आमच्या आयुष्यांतले अमोल ठरले! खुद्द गणपतराव काळ्यांनीं मला जेव्हां ही गोष्ट सांगितली तेव्हां ते व मी आश्चर्यचकित होअून अीश्वरी कृपेमुळें गांहिवरलोंच. काळे या संकटांतून अजिबातच बचावले.

## नियमच भोंवला

पण गणपतराव काळ्यांना बाँबची शिदोरी बांधून देतांना गोपाळरावांचें अंग व कपडे पिक्रिक ॲसिडनें पिवळे झाले होते. गोपाळरावांच्या पुढें तेवढ्यांत पोलिस येअून अुभे राहिले, आणि नासिकच्या ज्याक्सनच्या खुनासंबंधानें तुम्हांला अटक करण्यास आम्ही आलों आहों, असें त्यांना सांगितलें. गोपाळराव अेकदम दिङ्मूढच झाले! येथेंहि मागें अुपकारक ठरलेला आमच्या गुप्तता व सुरक्षिततेचा नियमच आम्हांस भोंवला. अण्णा कर्वे यांच्या गटांपैकीं अनंतराव कान्हेरे यांनीं २१ डिसेंबरला (१९०९) ज्याक्सनचा बळी घेतला होता. नियमाप्रमाणें आम्हांला फक्त कर्व्यांची ओळख होती. अनंताची नव्हती. त्यामुळें ज्याक्सनच्या खुनाशीं आपला कांहीं कोठें संबंध येअील, ही कल्पनाहि गोपाळरावांना, व मलाहि १ जानेवारी १९१० पर्यंत, नव्हती. वृत्तपत्रांत तोंवर फक्त कान्हेऱ्यांचें नांव आलें होतें. कर्व्यांचें नव्हतें. शिवाय माझ्या व अण्णा कर्व्यांच्या ऑक्टोबर १९०९ च्या गुप्त बैठकींत ठरल्याप्रमाणें अेकमेकांना कळविल्याशिवाय खुनासारखें कांहीं कृत्य करावयाचें नाहीं, असें शपथा घेअून ठरलें होतें. त्यामुळें या खुनांत अण्णा कर्व्यांचें अंग असेल, अशी आम्हांला व गोपाळरावांना कल्पनाहि

नव्हती. कारण खुनाची बातमी प्रसिद्ध झाल्याबरोबर पेणचे त्र्यंबकराव मराठे तडक मुंबअीस येअून गोपाळरावांना जेव्हां भेटले तेव्हां "या खुनाशीं आपला कांहीं संबंध नाहीं" असें पाटणकर स्पष्ट म्हणाल्याचें मराठेच सांगत आहेत ( मराठे यांच्या आठवणी ). विष्णुशास्त्री केळकर तर नाशिकचे राहणारे. त्यांनाहि पण कर्व्यांचें अंग यांत असेल अशी कल्पना नव्हती, असें ते आपल्या लेखांत म्हणतात. म्हणून अण्णा कर्व्यांवरच्या पूर्ण विश्वासामुळें गोपाळराव व आम्ही सावध पण निश्चितच होतों. पण दुर्दैव असें कीं, ही आमची कल्पना अनाठायीं ठरली ! आणि गोपाळरावांचें नांव अण्णा कर्व्यांनाच प्रथम, पोलिसास, पिस्तुलें त्यांच्याकडून घेतलीं म्हणून, सांगावें लागलें. त्या अनुरोधानें गोपाळरावांना अटक झाली. अण्णांनीं पाटणकरांचें नांव कां सांगितलें तें पुढच्या प्रकरणांत येअील. येथें फक्त बॉंबच्या प्रकरणापुरतेंच विवेचन असल्यानें तें सूत्रच पुढें चालवूं.

## पाटणकरांना पडलेला भयंकर पेचप्रसंग

अटक झाल्यावर गोपाळराव पाटणकरांना नाशकास आणलें. त्यावेळीं पोलिसांकडून पकडलेल्या लोकांनीं कबुलीजबाब देअून पोलिसांचें काम सुलभ करावें म्हणून सर्व तऱ्हेच्या सामदामदंडभेदाच्या अघोर कारवाया चालू होत्या. गुन्हा कबूल न करणाऱ्यांना पोलीस अधिकारी अत्यंत निर्दयतेनें मारीत, छळीत. या मारण्याच्या तंत्रासाठीं अल्लीखान या नांवाचा चोरी-दरवडेखोरीसाठीं ७ वर्षे शिक्षा भोगून आलेला अेक बदमाष माणूस 'सब-अिन्स्पेक्टर' म्हणून नेमलेला होता. त्या हरामखोराला सहीशिवाय लिहितांहि नीट येत नव्हतें. छळ करणें अेवढेंच त्याचें काम. तो आरोपींना बेदम मारी. आमच्या खटल्याचा सूत्रचालक गायडर हा डेप्युटी अिन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस ( सी. आय. डी. ) होता. त्यानें या अल्लिखानाला आरोपींना हवें तितकें छळण्याची मुभा दिली होती. आमच्या विष्णुशास्त्री केळकरांना तर यानें, ते कबुलीजबाब देत नव्हते म्हणून, अितकें मारलें होतें कीं, त्याला कांही सीमाच नव्हती. यांपैकीं कोणी आरोपी या छळानें मेला तर कॉलऱ्यानें मेला म्हणून जाहीर करूं, असेंहि गायडर म्हणाला होता. त्यामुळें बहुतेक आरोपींनीं या छळास त्रासूनच कबुलीजबाब दिले होते. अेवढें मात्र खरें कीं, ज्याच्या गुन्ह्याबद्दल गायडरची खात्री झाली

होती, पण जो कबूल होत नव्हता, त्यासच तो अली खानाच्या ताब्यांत "सीधा करण्याकरितां" देअी. अितरांना तो फारसा त्रास देत नसे. असो. गोपाळरावांना पकडून आणल्यानंतर त्यांनीं हा सर्व प्रकार पाहिला. गायडरनें त्यांना कर्व्यांच्या समोर नेलें. तेथें कर्व्यांनीं "यांच्याचजवळून पिस्तुलें घेतली" असें गायडरला सांगितलें. गोपाळराव हा सर्व देखावा पाहून क्षणभर सर्दच झाले! ज्या कर्व्यांच्यावर अलोट विश्वास, त्यांनींच आपल्यासमोर असें म्हणावें, हें शल्य त्यांच्या जिव्हारीं लागलें. पण त्या परिस्थितीत करणार काय? कबूल न करावें तर छळ होणार. आणि छळाला सुरुवात झाली म्हणजे पिस्तुलांचें लचांड तर गळ्यांत पडणारच, पण आपल्या अंगावरचे पिकिकचे डाग, आणि त्यानेंच रंगलेला आंतला शर्ट, अुघडकीस येअून सर्व वसअीच्या बॉंबच्या कारखान्याचें प्रकरण अंगावर शेकणार! अशा शृंगापत्तींत वसअी वांचवावयाचीच असा तत्क्षणीच निकाल ठरवून पाटणकरांनी पिस्तुलांची सर्व माहिती सांगण्याचें कबूल केलें. "सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः" या न्यायानें त्यांनीं केलें तेंच योग्य केलें, यांत शंका नाही. पण त्यांनींहि त्या बावरलेल्या स्थितींत, पिस्तुला-साठी माझें व चतुर्भुजचें नांव सांगितलें. कारण चतुर्भुजनें विलायतेहून आणलेलीं पिस्तुलें माझ्यासाठीं पाटणकरांनींच आणून पेणला पाठवलीं होतीं. यावेळीं पाटणकरांनींहि ठराविक युक्ति योजली असती तर पुढील अनर्थ टळता. असा कांहीं प्रसंग आला म्हणजे कोणातरी नुकत्याच २–३ महिन्यांपूर्वी मेलेल्या स्नेह्याचें नांव मध्यें घालून त्याच्या-कडून ही पिस्तुलें वगैरे सामान घेतलें असें सांगावें, असें मीं त्यांना कित्येक महिने अगाअूच निक्षून बजावून सांगितलें होतें. अशा युक्तीनें सांखळी तुटते, व पुढच्या सर्व माणसांचा बचाव होतो. पण पाटणकर गोंधळल्यामुळें म्हणा, किंवा त्यांच्या अुपजत विसराळूपणानें म्हणा, ही युक्ति योजण्याचें ते नेमकें त्यावेळीं विसरले. ती युक्ति त्यांनीं पेणला पिस्तुलें ठेवलीं होतीं तेथें अर्धवट-पणानें योजली. त्याचा अुल्लेख भाव्यांच्या वरच्या लेखांत आलाच आहे. पण तीहि वायां गेली. असो. या युक्तीचा अुपयोग केला असता तर कदा-चित् पुढची सगळीच सांखळी तुटली असती, आणि पाटणकरांपर्यंतच सर्व प्रकरण थांबलें असतें. म्हणजे मी, थत्ते, चतुर्भुज, तात्या सावरकर, पुणें

गटांतले खरे व अितर मंडळी, पेणची सर्व मंडळी, यां खटल्यांतून सहज वांचलों असतों. पण, बीडकरमहाराजांनीं म्हटल्याप्रमाणें, भवितव्यताच आमच्या विरुद्ध होती ! अण्णा कर्व्यांच्या सारख्या धुरंधर पुढाऱ्याला आपल्या सहकाऱ्यांचीं नांवें सांगावीं लागल्यानें सर्वांचाच धीर खचला होता. हीं सर्व पिस्तुलें न सांपडलीं तर निदान २० अधिकाऱ्यांचे खून होतील अशी धास्ती गायडरला होती. म्हणून त्यांनीं हवें तें करून हीं विलायतेंतून आलेलीं २० पिस्तुलें प्रथम हुडका व ताब्यांत घ्या, अशी सक्त आज्ञा खालच्या अधिकाऱ्यांस केली होती. त्यामुळें वाटेल तो छळ करण्यास पोलीसहि मागेंपुढें पहात नव्हते. त्या कारणानें पकडलेली मंडळी अगदीं अगतिक झाली होती. छळ तर अितका होत होता कीं, आंबडेकरासारख्या कोंवळ्या १६ वर्षांच्या मुलाच्या दोन्ही पायांत पोलिसांनीं हातांतली हातकडी घालून त्याला दिवसभर करून जेरबंद टाकण्यासहि मागें पुढें पाहिलें नाही ! पण तरीहि त्यानें कबुलीजबाब दिला नव्हता. यावरून पोलिसांचा जुलूम कोठल्या थराला चालला होता याची कल्पना येअील. या जाचामुळें विवश होअून कांहींजण ‘ तुला सोडून देअूं, माफी देअूं ’ या फुसलावणीला बळी पडून गुन्हा कबूल करून जबाब देत होते. पण अशाहि भेसूर परिस्थितींत, अवश्य तेवढीच माहिती सांगून, शक्य तेवढें अितरांस वांचविण्यास सर्वच झटत होते. खुद्द हायकोर्टाच्या स्पेशल ट्रायब्यूनलनेंहि आपल्या निवाड्यांत आरोपी व साधे साक्षीदारच काय, पण माफीचे साक्षीदारहि सर्व माहिती सांगत नाहींत, असा शेरा मारला आहे ! असो. गोपाळराव पाटणकर या पेंचांत सांपडून गोंधळून गेले होते. वसअीचें प्रकरण वांचविण्यासाठीं त्यांनीं पिस्तुलांचें प्रकरण कबूल करून छळांतून आपली सुटका करून घेतली. रात्रीं झोपेंचें सोंग करून, डोक्यावरून पांघरूण घेअून, आपला पिक्रिकनें पिवळा झालेला शर्ट अुंदराप्रमाणें दांतानें कुरतडून त्यांनी त्याच्या चिंध्या केल्या, आणि त्या लपवून दुसरें दिवशीं सकाळीं शौचास गेल्यावर शौचकुपांत टाकून दिल्या. याप्रमाणें अेक पुरावा त्यांनीं बेमालूम नाहींसा केला. अंगावरचे डाग धुवून पुसून टाकले.

### पाटणकरांनीं मला गोंवलें

पण पिस्तुलांचें प्रकरण कबूल करतांना त्यांनीं माझें व चतुर्भुजचें

नांव सांगितलें होतें. त्यामुळें आम्हां दोघांना अटक झाली. आणि या मिळालेल्या व चतुर्भुजच्या पुराव्यावर विलायतेस सावरकरांवरहि पकडवारंट सुटलें. आणि तेहि, निष्कारण फ्रान्सहून परत आल्यामुळें, अटकले गेले. त्यांना हिंदुस्थानांत आणावयास बराच वेळ लागला. मला पकडून नेलें तेव्हांच, कर्व्यांनीं सांगितल्यावरून, बाँबचें कवच करणारे म्हणून, व्यंकटराव नागपूरकरांनाहि पकडून आणलें होतें. नाशिकास नेल्यावर मला गायडरनें या बाबतींतला माझा संबंध कबूल करण्यास दटावलें. मला तो म्हणाला, "भट, मी तुम्हांला बरेच दिवसापासून पाहतों आहे. तुम्ही या फंदांत असाल असा माझा तर्क होता. पण तुम्ही तो नाकबूल करीत होतां.* पण आतां माझ्या हातांत पक्के सांपडला आहांत. आतां सर्व कबूल केल्याशिवाय तुमची सुटका नाहीं. पाटणकरांनीं व चतुर्भुजनें सर्व कबूल केलें आहे. तरी तुम्हीहि कबूल करा. या मूर्खांच्या नादीं लागून आपल्या आयुष्याचें मातेरें करूं नका, असें मीं तुम्हाला तुमच्या सासऱ्याच्या घरींच बजावलें होतें. तुम्ही अैकलें नाहीं. आतां तरी कबूल करा म्हणजे मी तुम्हांला यांत गोंवणार नाहीं" असें म्हणून माझ्या अुत्तराची अपेक्षा तो करीत बसला.

---

* याची हकीकत अशी :– बाबांना माझ्या घरीं मुंबअीस पकडलें तेव्हां मलाच त्यांच्या खटल्याबद्दलची सर्व व्यवस्था करावी लागली होती. कारण सावरकरांचे माझ्याशिवाय कोणीहि नातलग ती करण्यास तयार नव्हते. त्यामुळें मजवरचा पोलिसांचा संशय दृढ झाला होता. अेके दिवशीं गायडर नाशकास माझ्या श्वशुरांकडे आला. ते सेवानिवृत्त डेप्युटी कलेक्टर होते. त्यामुळें, त्यांचें वजन मजवर पडेल अशा समजुतीनें, त्यानें मला त्यांच्याकडे बोलावून घेतलें. आणि "सावरकरांच्या कटांत राहूं नका. त्यामुळें तुम्ही संकटांत पडाल. त्यांच्याबरोबर काय काय करीत होतां तें आम्हांला सर्व सांगा. आम्ही तुमचा बचाव करूं. तुम्ही अेल्‌अेल्. बी., अेम्. बी. बी. अेस्. होणार असल्यानें तुमचें भावी आयुष्य अत्यंत सुखांत, सरकारच्या कृपेंत, जाअील. म्हणून तुम्ही या भानगडींत पडूं नका. हा महत्त्वाचा सल्ला माझ्याप्रमाणेंच तुमचे श्वशूरहि देतील. तरी काय तें मला सांगा." असा अुपदेश त्यानें चालविला. तेव्हां मी सर्व गोष्टी साफ नाकबूल केल्या होत्या. सावरकरांचें व माझें नातें आहे. शिवाय आम्ही अेकाच कॉलेजचे व गांवचे. त्यामुळें मला त्यांच्या संकटांत मदत करणें भाग होतें, म्हणून मी बाबांना मदत केली, अितकें सांगून मीं ती वेळ मारून नेली होती.

मीं त्याला सांगितलें कीं, “ हें सर्व खोटें आहे. पाटणकर चतुर्भुज हे माझ्या फारशा ओळखीचे नाहींत. तेव्हां त्यांनीं कांहीं जरी सांगितलें असलें तरी मला तें खरें वाटत नाहीं, आणि कबूल तरं नाहींच नाहीं. ” माझें अुत्तर अैकून त्यानें पाटणकरांना बोलावून आणलें. गोपाळरावांनी मला स्पष्टच सांगितलें कीं, “ भाअू, आतां लपवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मी सर्व सांगून टाकलें आहे. ” हे पाटणकरांचे शब्द अैकतांच मी थंडाच झालों ! पण अधिक कांहींच बोललों नाहीं. गायडरनें मला सदावर्ते अिन्स्पेक्टर यांच्या ताब्यांत दिलें, व सर्व कबूल करून घ्या म्हणून त्यांना आज्ञा करून तो निघून गेला. हा सर्व प्रसंग रात्रीं घडला होता.

रात्रभर मला झोंप आली नाहीं. पाटणकरासारखा जिवाला जीव देणारा स्नेही सर्व कांहीं कबूल करतो, आणि मलाहि कबूल करावयास सांगतो, हें पाहून मी स्तिमितच होअून गेलों होतों. पण अिलाज काय ! यांतूनहि शक्य तितकें निभावून गेलेंच पाहिजे, असे विचार डोक्यांत चालले होतें. आम्ही सर्व पोलीस पहाऱ्यांत असल्यानें अेकमेकांशीं बोलण्याचीहि चोरी होती. पण पोलिसांची नजर फिरतांच, किंवा ते डुकल्या घेत असतां, आम्ही हळूंहळूं कुजबुजतच होतों. या कुजबुजींतच मला छळाचा भयंकर प्रकार कळला. तेव्हां “आलीया भोगासी असावें सादर” याशिवाय पाटणकरांस गति नव्हती, असें मला कळून आलें.

## पोलीस अिन्स्पेक्टर सदावर्ते यांची सहानुभूति व मदत

सकाळीं शौचमुखमार्जन झाल्यावर गायडरच्या आज्ञेप्रमाणें मला अिन्स्पेक्टर सदावर्ते यांनीं बोलावून घेतलें. बदमाष अळीखान यांच्या हाताखालीं छळण्याचें काम करीत होता. सदावर्ते यांनीं आरंभापासूच सलगी दाखविण्यास सुरुवात केली. प्रथम मला त्यांनीं आपल्याबरोबर चहा घेण्यास आग्रह केला. मीहि तो घेतला. मला प्रथम वाटलें कीं, ही सलगी म्हणजे अस्वलाच्या गुदगुल्या आहेत. म्हणून मीहि सावधच होतों. पण त्यांनीं प्रथम “ रामभाअू दातारांना तुम्ही ओळखतां काय ” असें मला विचारलें. रामभाअू म्हणजे आमच्या मित्रमेळ्याचे सभासद व माझ्या परमस्नेह्यांपैकीं वामनशास्त्र्यांचे वडील बंधु. तेव्हां मी त्यांना चांगलेंच ओळखतों असें सदावर्त्यांना सांगितलें. माझा व त्यांचा व पुण्याचे गणपतराव फडके यांचा अत्यंत

निकट स्नेह आहे, असेंहि सदावर्ते म्हणाले. मीहि जरा हिय्या करून त्यांना म्हणालों कीं, "असें जर आहे तर तुम्ही आम्हांस मदत केली पाहिजे." "कोणती मदत हवी" असें त्यांनीं विचारतांच "पाटणकरांची व माझी गांठ अेकअेकटी घालून द्या" असें, मी त्यांना म्हणालों. "आतांच ती संधि देतों" असें म्हणून त्यांनीं पाटणकरांना बोलावणें पाठविलें. पाटणकरांना व मला अेकत्र ठेवून हळूच सदावर्ते म्हणाले, "तुम्ही दोघांमिळून काय जबाब द्यावयाचे ते ठरवा. आम्हांला पिस्तुलें हवीं आहेत. त्यांचा छडा लागत चालला आहे. तीं न मिळालीं तर निदान २० टोपडे तरी मारले जातील, ही गायडरला भीति आहे. म्हणून त्याचीं पिस्तुलें मिळविण्याची अितकी धडपड आहे. तीं मिळालीं म्हणजे मी तुमच्या अितर सर्व भानगडी अुघडकीस येअूं देणार नाहीं; आणि त्या बाबतींत हवी ती मदत तुम्हांस करीन. रामभाअू दातारांचा मी स्नेही. म्हणजे तुमचाहि मी स्नेहीच आहे, असें समजा. आणि पूर्ण भरंवसा मजवर टाका. मजवरच भरंवसा टाकलांत तरच बरें. अितर म्हणजे पुढें सेवानिवृत्त झालेले, समर्थ भक्त म्हणून गाजलेले, आग्र्याहून सुटका या ग्रंथाचे कर्ते बाबासाहेब देशपांडे व पागे, कामटे वगैरे कोणीहि तुम्हांस मदत करणार नाहीं. त्यांच्याबद्दल सावध असा." असें सांगून सदावर्ते निघून गेले व मी व पाटणकर असे अेकटेच तेथें राहिलों.

### सदावर्ते यांची थोडी माहिती

आमचा वसअीचा बॉंबचा कारखाना व त्यांतले सहकारी हे केवळ या सदावर्त्यांच्या बिनमोल साहाय्यामुळें आम्ही वांचवूं शकलों. यामुळें त्यांच्याबद्दल येथेंच दोन गोष्टी सांगणें बरें. यांचें नांव शिवराम विष्णु सदावर्ते. लो. टिळकांच्या वाड्याच्या मागेंच यांचें राहतें घर व सदावर्त्यांचें राममंदिर आहे. या अेकाच अकल्पित सांनिध्याचा त्यांना मोठा अभिमान वाटे. देशभक्तीचें वारें आमच्या घरावर नेहमीच वाहतें, असें ते म्हणत. लो. टिळकांना मंडालेहून आणण्यासाठींहि ते पोलीस अधिकारी म्हणून गेले होते. त्यामुळेंच त्यांच्या अंतःकरणांत देशभक्ती रुजली होती; आणि म्हणून अशा राजकीय खटल्यांत आरोपींना शक्य तितकी संधि, सवलत द्यावी, अशी त्यांची वृत्ति झाली होती. त्यांतहि त्यांचा व आमच्या अभिनव भारतांतल्या रामभाअू दातारांचा अकृत्रिम स्नेह होता. त्यामुळें ही देशभक्तीची भावना दुणावली

होती. त्यांचें शिक्षण वगैरे बेताचेंच होतें. नोकरी पोलिसांतली असल्यानें अनायासें व फुकट त्यांची चैनबाजी चालत असे. त्यामुळें त्यांना थोडासा बाहेरख्यालीपणाचाहि नाद लागला होता. राजकीय गुन्ह्यांखेरीज अितर, म्हणजे खून, चोरी, दरोडे अित्यादि, गुन्ह्यांतील आरोपींना ते मुळीच दयामाया दाखवीत नसत. त्यामुळें गायडरचा त्यांच्यावर फार विश्वास बसला होता; आणि म्हणूनच या आमच्या खटल्यांतहि त्यानें त्यांचीच नेमणूक केली होती. असो.

### आमचें साहस व सदावर्त्यांवर विश्वास

पाटणकर व मी अेकत्र बसल्यावर त्यांना सर्व हकीकत विचारली. त्यांनीहि ती मोकळेपणानें सांगितली, वसअीचा बॉंबचा कारखाना वांचविण्यासाठींच केवळ मी कबुलीजबाब दिला, असें ते म्हणाले. मी अगाअू सांगितलेली – मृतमनुष्य मध्यें घालून सांखळी तोडण्याची – युक्ति कां योजली नाहींत म्हणून मी त्यांना विचारलें. तें म्हणालें कीं, “मी गोंधळून गेल्यामुळें भलत्याच ठिकाणी ती योजली व ती फसली. पण ती योग्य तऱ्हेनें न अुपयोजिल्याबद्दल त्यांना मनापासून वाअीट वाटत होतें. परंतु हातचा बाण सुटून गेला होता. नंतर त्याबद्दल खेद करण्यांत अर्थहि नव्हता. चतुर्भुजप्रमाणें त्यांनीं रा. थत्ते यांचेंहि नांव सांगितलें होतें. त्यांनाहि अटक करून आणलें होतें. पण त्यांच्या विरुद्ध पुरावा फारसा नव्हताच. तेव्हां सर्व जबाबदारी आम्ही दोघांनीं घ्यावी, व हरीभाअू थत्त्यांना सुटण्याची संधि द्यावी, असें आम्हीं ठरविलें. पण मी मॅजिस्ट्रेटपुढे कबुलीजबाब देणार नाहीं, असेंहि गोपाळरावांस सांगितलें. अद्याप बॉंबच्या कारखान्यांत भाल्यांच्याजवळ ठेवलेल्या पिस्तुलाची हकीकत पोलिसांस सांगावयाची होती. ती सांगतांना आम्ही दोघांनीं सदावर्त्यांना पूर्ण विश्वासांत घेण्याचें धाडस पत्करावयाचें ठरविलें. आणि तेथलें पिस्तुल त्यांच्या हवाली करावयाचें, व त्यांनीं आमचा बॉंबचा कारखाना अुघडकीस आणावयाचा नाहीं, असा त्यांच्याशीं करार करावयाचा, असाहि बेत ठरविला. अेवींतेवीं कोणते तरी साहस त्या वेळी पत्करणें भागच होतें. सदावर्त्यांना विश्वासांत घेतलें नसतें तर तेथल्या पिस्तुलाच्या पायीं तो सर्व कारखाना, व तत्रस्थ शेंकडों सहकारी, अुघडकीस येअून त्यांची गळचेपी व्हावयाची, व आमचें संकट आभाळाअेवढें सहस्रगुणित व्हावयाचें. बरें

त्यांना विश्वासांत घेतलें, आणि त्यांनीं विश्वासघात केला, तरी आधिक ते काय होणार ! असा विचार करून नशिबाची परीक्षा पाहण्याचा आम्हीं निर्धार केला; आणि सदावर्त्यांवर विश्वास टाकावयाचें ठरविलें.

सदावर्ते आल्यावर आम्हीं त्यांना आमचा बेत कळविला. पाटणकरांनीं हरिभाऊ थत्त्यांना बोलाविण्यास त्यांना सांगितलें. थत्ते आल्यावर आम्ही आमचा बेत त्यांना कळविला. " तुम्ही सुटण्याचा संभव आहे. तेव्हां आम्ही दोघे तुम्हांस यांत गुंतवीत आहों. सर्व जबाबदारी पिस्तुलांच्या बाबतींतली आम्ही घेतों. तुम्ही सुटलांत तर आमच्या दोघांच्या अनाथ कुटुंबांच्या चरितार्थाची सोय करा, " असें थत्त्यांना आम्हीं सांगून त्यांच्याकडून त्याबद्दलचें अभिवचन घेतलें. थत्त्यांनींहि ते दिलें. त्या अभिवचनाप्रमाणें, अपेक्षेप्रमाणें निर्दोष सुटल्यावर, त्यांनीं आमच्या कुटुंबांची चौकशीसुद्धां केली नाहीं, मग चरितार्थाची सोय करणें तर दूरच ! असो. याप्रमाणें खलबत करून आम्हीं पाटणकरांनीं मॅजिस्ट्रेटसमोर काय सांगावयाचें, हें ठरविलें. त्याला सदावर्ते यांनींहि संमति दिली.

### बाँबचे कारखानदार वांचविले

दुसरे दिवशीं सदावर्ते त्या बाँबच्या कारखान्यांतलें पिस्तुल हस्तगत करावयासाठीं गोपाळरावांना बरोबर घेऊन मुंबअीस गेले. सदावर्त्यांवर आम्ही जसा विश्वास टाकला होता त्याप्रमाणें त्यांनींहि आमच्यावर टाकला होता. त्या वेळीं गायडर पुण्यास गेला होता. गोपाळरावांना – खुनाच्या आरोपावरून पकडलेल्या आरोपीला – त्यांनी स्नेह्याप्रमाणें सर्वस्वी वागविलें. बरोबर अेकहि पोलीस घेतला नव्हता. गोपाळरावांना हातबेडी किंवा काढणी घातली नव्हती. स्नेही ज्याप्रमाणें गांवीं जातात, त्याप्रमाणेंच दोघे गेले. मुंबअीस गेल्यावर गोपाळरावांच्या मेव्हण्याकडे – रा. बाळकृष्णपंत गोरे याच्याकडे – ते थेट गेले. तेथें गोपाळरावांनींहि थोडी सावधागिरी दाखविली. आपण स्वतः, सदावर्त्यांना घेऊन, वसअीस न जातां आपल्या मेव्हण्यास – बाळकृष्णपंत गोऱ्यांस – त्यांनीं पत्र देऊन वसअीस पिस्तुल आणण्यास पाठविलें. पुढची हकीकत रामभाऊ भाट्यांच्या मनोरंजक वर्णनांत वर आलीच आहे. म्हणून तिची पुनरुक्ति करीत नाहीं. पण त्याहिपेक्षां मनोरंजक हकीकत पुढेंच आहे. ती म्हणजे सदावर्त्यांना पुण्यास आपल्या प्रिय पात्रांकडे

जाण्याची आलेली हुकी. पिस्तुल सांपडलें म्हणजे त्याचा पंचनामा करावाच लागतो. वसअीस तर तो करावयाचा नव्हता. म्हणून दुसरें गांवच ठरविणें भाग होतें. आणि सदावर्त्यांना पुण्यास जाण्याची लहर आली होती. म्हणून तें पिस्तुल घेअून सदावर्ते व पाटणकर पुण्यास गेले; आणि बाँबच्या कारखान्याचा मागमूसहि सदावर्त्यांखेरीज कोणासहि कळला नाहीं. अशा रीतीनें केवळ आमच्या त्यांच्यावरच्या विश्वासामुळें वसअीचा बाँबचा कारखानां व सहकारी आम्हीं वांचविलें.

### सदावर्त्यांच्या गमती

पुण्यास सदावर्ते व पाटणकर दोन दिवस राहिले. प्रिय पात्राबरोबर सदावर्त्यांनींहि आपली चैन करून घेतली. पिस्तुलाचा पंचनामा हवा तसा करून घेतला. त्यावेळीं गायडर पुण्यास होता. नियमाप्रमाणें सदावर्त्यांना त्यांची भेट घेणें भाग होतें. त्याप्रमाणें ते गेले. पिस्तुलाबद्दल गायडरनें विचारतां पिस्तुल अेकदोन दिवसांत मिळेल, सुगावा लागला आहे, अशी लोणकढी थाप त्याला ठेवून दिली. आणि आपली चैनचमन करून पाटणकरांसह पुण्याहून नाशकास परत आले. अितका धाडसी, विश्वासू, देशभक्त अिन्स्पेक्टर आम्हांला वश झाला; व सर्व वसअीचा बाँबचा कारखाना व तेथले अभिनव भारताचे सर्व सहकारी त्याच्या मदतीनें आम्ही वांचवूं शकलों, हें परमेश्वराचे अुपकारच मानले पाहिजेत.

सदावर्त्यांच्याबद्दल आमची खात्री झाल्यामुळें आम्ही आमच्या पकडून आणिलेल्या सहकाऱ्यांना त्यांच्यावर विश्वास टाकण्यास सांगितलें; पण पोलिसासंबंधाच्या सर्वत्र पसरलेल्या गैरविश्वासानें कोणी त्यांचा फारसा फायदा घेतला नाहीं. अितर पोलीस अधिकाऱ्यांनीं अितर आरोपींना कांहीं मदत केल्याचें अैकिवांत नाहीं. आतां कैलासवासी झालेले बाबासाहेब देशपांडे हे अनेक लोकांना सांगत असत कीं, ' मीं नासिक केसमधल्या आरोपींना फार मदत केली. पण माझी माहिती त्याच्या अगदीं अुलट आहे. अितकें मात्र खरें कीं, अितर कांहीं ब्राह्मणद्वेष्ट्या पोलीस अधिकाऱ्यांनीं, आम्ही केवळ ब्राह्मण म्हणून, आम्हांला अधिक खड्ड्यांत टाकण्याची जी द्वेषबुद्धीनें छळणूक केली तशी अितर कांहीं ब्राह्मण व ब्राह्मणेतर अधिकाऱ्यांनींहि केली नाहीं. जातिद्वेषानें अंध झालेलीं माणसें कसें पशुवत् आचरण करतात, हें आम्हांला या खट-

त्यांतहि प्रत्ययास आले. अुलट ब्राह्मण असूनहि, आणि चाफेकरांसारख्या देशभक्तांच्या बरोबर द्रवीडांच्या खुनांत सामील असल्यामुळें कित्येक वर्षे तुरुंगवासाची शिक्षा भोगून आलेले, पण पुढें पोलीसांत नोकरीस लागलेले, साठे यांनीं आमच्या बाबुराव खऱ्यांना लाथा मारण्यासहि कमी केलें नाहीं! असो. या सर्व प्रकरणाची हकीकत पुढें येअीलच.

## बॉंब करण्याचे अन्य प्रयत्न

बॉंबच्या बाबतींत अितरत्र प्रयत्न चालूच होते. आतां अकालीच कैलासवासी झालेले पुरुषोत्तमपंत दांडेकर, व फांशीं गेलेले विनायकराव देशपांडे, हे बाबुराव खऱ्यांच्या जवळ ही विद्या शिकून नाशिकास पिक्रिक ॲसिड व फल्मिनेट करीत होते. कोठुऱ्यासहि वामन श्रीधर बर्वे त्या अुद्योगांत होते. मुंबअीसहि आमच्याखेरीज अितर लोक हे यत्न करीत होते असें दिसतें. कारण ग्रँट मेडिकल कॉलेजमधली पिक्रिकची बाटली बेपत्ता झाली होती. पुण्यासहि कांहीं प्रयोग झाले होते. त्यांपैकीं अेका प्रयत्नाची हकीकत मनोरंजक आहे. पुण्याच्या गटांतले (आतां कैलासवासी) आमचे शंकर पांडुरंग महाजन हे या प्रयत्नांत होते. त्यांच्या घरीं पिक्रिकच्या व अितर ॲसिडांच्या कांहीं बाटल्या होत्या. त्या घरांत असतांच, त्यांना त्यांच्या बऱ्याच दाट ओळखीचे पोलीस अधिकारी अचानक अटक करावयास व झडती घ्यावयास आले. शंकरराव क्षणभर बुचकळ्यांतच पडले. पण त्यांनींहि आपल्या सुपीक मेंदूतून अेक शक्कल लढवली. त्या अधिकाऱ्यांची ओळख असल्यानें शंकररावांनीं सलगी दाखवून म्हटलें, "बसाहो, चहा वगैरे घ्या, आणि मग तुमची झडती होअू द्या, तुम्ही व मी येथेंच आहोंत." असें म्हणून मी चहा सांगून येतो म्हणून अुठले व घरांतल्या मंडळींना चहा ठेवण्यास सांगितलें; आणि चहा होअीपर्यंत पिक्रिकच्या बाटल्या मागच्या संडासांत ओतून त्यांचा नायनाट करा, असें सांगून परत बैठकींत येअून बसले. अिकडच्या तिकडच्या यांच्या गप्पा चालल्या होत्या, तों तों आंत बॉंबचा मुद्देमाल नाहींसा होत होता! तें मुख्य काम अुरकल्यावर मगच चहाचा निरोप आला. तोंपर्यंत तो चहा होतच नव्हता! चहाची वर्दी आंतून आल्यावर शंकरराव साळसूदपणानें आंत जाअून, सर्व निरवानिरव झाली याची खात्री झाल्यावर मगच, चहाचे कप घेअून

बाहेर आले. चहा, विडी वगैरे झाल्यावर मग झडती झाली. त्यांत मग काय सांपडणार?

अशा प्रकारें बॉंबच्या प्रकरणाचीं हीं अुपाख्यानें संपलीं. येथें मला प्रत्यक्ष ज्यांची माहिती होती तेवढीच दिली आहे. दुर्दैवानें आज पुरुषोत्तमपंत दांडेकर व विनाकराव देशपांडे हयात नाहींत. ते असते तर यापेक्षां अधिक विश्वसनीय माहिती मी पुरवूं शकलों असतों. पण "सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः" म्हणत, औंधचें प्रकरण सांगून, हें प्रकरण पुरें करतों.

### औंधचा प्रयत्न व साताऱ्याचा अभियोग

अभिनव भारताच्या सभासदांवर सशस्त्र राज्यक्रांतीच्या कटाचा खटला चालू असतांनाहि, १९१० च्या मे महिन्यामध्यें, आमच्याशीं संलग्न असलेल्या औंधच्या गुप्त मंडळीपैकीं आर्टिस्ट रा. म. रा. हिंगे यांनी औंधास स्वदेशी पद्धतीनें बॉंब तयार करण्याचें काम चालू ठेवलें होतें. आणि वसअीच्या मंडळींप्रमाणें त्यांनीं तो अुडवूनहि पाहिला. त्या आनंदाच्या भरांत त्यांनीं त्यांचे सहकारी मेहेंदळे यांना ती सर्व कृति सांगितली. पण दुर्दैव असें कीं, मेहेंदळे हे कच्च्या दिलाचे निघाल्यामुळें त्यांनीं ती बातमी पोलिसास कळविली; आणि त्यामुळें डॉ. वा. वि. आठल्ये ( सातारा ), हिंगे, मेहेंदळे व अिंगळे यांच्यावर साताऱ्यास सेशन कोर्टांत खटला होअून त्यांत पहिल्या तिघांना आमच्याप्रमाणेंच भयंकर शिक्षा – ५–८–३॥ वर्षे अशा शिक्षा – झाल्या आणि हा राज्यक्रांतीचा अल्पसा प्रयत्न मुळांतच खुडला गेला. ( डॉ. आठल्ये यांच्या आठवणी ).

### आमच्या विध्वंसक्षमतेचें गमक

वर दिलेल्या बॉंबच्या सामानाच्या नासधुसीवरून वाचकांना आम्ही केवढा प्रचंड अुद्योग चालविला होता, व किती ठिकाणीं बॉंबचे कारखाने चालू केले होते, आणि योजनेप्रमाणें जर बॉंबचे धूमधडाके अुडवण्याचें ठरवलें असतें तर ब्रिटिश सरकारला ठिकठिकाणीं कसें हादरवलें असतें, याची थोडी तरी कल्पना येअील. आमच्याखेरीज देशांत अितर गुप्त मंडळ्यांचेहि हे अुद्योग चालूच होते. त्याच वर्षी व्हाअिसरॉय लॉर्ड मिंटोवर अहमदाबादेस फेकलेला बॉंबच त्याची साक्ष देत आहे. आमच्या या सर्व खटपटी,

अेकदम अचानक, कोणाहि सहकाऱ्यास अगाअू न कळवतां, जो ज्याक्सन-वध झाला त्यामुळें, वायां गेल्या याचेंच आम्हांला अत्यंत वाअीट वाटलें. शत्रूच्या शेंकडों हजारों लोकांना गारद किंवा जन्माचे जायबंदी करण्याची आमची तयारी होती. पण अेकाच अधिकाऱ्यांच्या वधासाठीं अेवढें आर्थिक, आणि शेंकडों कुटुंबांचें जन्माचें, नुकसान झालें, कैकांना तुरुंगवास व देहदंड सोसावे लागले, ही दुर्दैवाची शर्थ झाली. नियोजनपूर्वक कार्य करावयाचें ठरलें असूनहि, तशा आणाभाका झाल्या असतांना, केवळ मोहवशतेनें, असा सर्वस्वाचा घात झाला, आणि शत्रूला हादरा बसण्याअैवजीं आम्हांला व आमच्या चळवळीलाच अुलट हादरा बसला, याबद्दलच खेद होतो. पण राष्ट्राच्या दीर्घकालीन जगड्व्याळ युद्धांत या चकमकीमध्यें असे अपघात व्हावयाचेच, हें जाणूनच आम्ही आमचें समाधान करून घेत होतों.

प्रकरण आठवें

# सरकारचे अभिनव भारतावरील हल्ले

रात्रिर्गमिष्यतिभविष्यति सुप्रभातम् ।
भास्वानुदेष्यति हसिष्यति पंकजश्रीः ॥
अित्थं विचिंतयति कोषगते द्विरेफे ।
हा हंत ! हंत ! नलिनीं गजमुज्जहार ॥

" रात्र जाअील, सुप्रभात होअील, सूर्य अुजाडेल आणि कमल अुमलून तें आपल्या शोभेनें हसूं लागेल, असा कमलांत अडकलेला मधुकर विचार करीत होता. तोंच हायरे दैवा ! हत्तीनें तें कमलच अुपटून टाकलें " या सुंदर कवितेंत जी कमळांतल्या मधूचा अुपभोग घेण्यासाठीं त्यांतच गुंगून अडकलेल्या मधुकराची रम्य कल्पना होती तशीच आमचीहि होती. अिंग्रज सरकारच्या राज्याविरुद्ध, अेकदम, अनेक प्रांतांत, सशस्त्र क्रांतीची अुठावणी करून तें अुधळून टाकावयाचें, असे कल्पना-तरंग व योजना हिंदुस्थानांतल्या शेकडों क्रांतिकारकांच्या मनांत थैमान घालीत होत्या. त्या अुद्देशानें गुप्तपणें लोकसंग्रह व शस्त्रास्त्र संग्रहहि ठिकठि-

काणीं चालू होते. या भीषण संग्रामाची कल्पना अिंग्रज सरकारलाहि आलेली होती. क्रांतीसाठीं जो वृत्तपत्रांतून, सभांतून, अुत्सवांतून, ग्रंथांतून अुघड प्रचार चालू होता त्यावरून हें वादळ लवकरच माजणार, अशी कल्पना बंगाल महाराष्ट्र, पंजाब या प्रांतांतल्या सुभेदारांना (गव्हर्नरांना) तरी नक्कीच डांचत होती, असें "राजद्रोहकमिटीचें अितिवृत्त" म्हणतें. पण हा प्रचारहि रिक्रूट भरतीसाठीं आम्हांला करणेंच भाग होतें. त्यांतला धोकाहि आम्ही जाणून होतों. पण तो पत्करूनहि आम्हांला तें दिव्य करणें अगतिकतेनें अवश्यच होतें.

## वंदे मातरम्‌चा खटला

हें प्रकट कार्य करण्याचा अपेक्षित परिणाम म्हणजे पोलिसांची नजर व पुढाऱ्यांची अुचलबांगडी, हा झालाच. १९०६ मध्यें २७ सप्टेंबरला दसऱ्याच्या वार्षिक मिरवणुकीच्या वेळीं अेका पोलिसानें 'वंदे मातरम्' या जयघोषाला बंदी केली व बाबा सावरकरांच्या अंगावर हात टाकला. त्यासरशी त्याला बाबांनीं लोळवलें व तिंबलें. ही हकीकत समजतांच दंगल झाली. आणि पुढें मित्रमेळ्याच्या ११ आरोपींवर खटला झाला. किरकोळ मारामारीचा खटला. त्यांतहि एका दारू प्यायलेल्या शिपायानें माजविलेला, पण पोलीस म्हणजे ब्रिटिश साम्राज्याच्या रक्षकांचा प्रतिनिधि! लगेच सर्व ब्रिटिश सत्ताधिकारी त्याच्यामागें अुभे राहिले; आणि दुसऱ्या दिवशीं ११ जणांना पकडून जामिनावर मोकळे केले. त्याबद्दलची हकीकत रा. गोखले यांच्या "क्रांतिवीर बाबाराव सावरकरांच्या" चरित्रांत तपशिलासह दिली आहे. त्या निमित्तानें सत्ताधाऱ्यांनीं आपल्या सत्तेचें प्रदर्शन २०० पोलीस आणून गांवांत मिरवून केलें. नंतर खटला भरला गेला; व तो वर्षभर, मॅजिस्ट्रेटच्या मर्जीप्रमाणें मुक्काम करीत करीत, जिल्हाभर नाचला व गाजला. अभिनव भारताच्या सदस्यांना ती अिष्टापत्तिच झाली. त्या निमितानें त्यांनीं मॅजिस्ट्रेटच्या मुक्कामाच्या ठिकाणीं, व खेडोपाडीं आणि जागोजागीं, रात्रीं सभा भरवून वंगभंगाच्या चळवळींत स्वराज्य, स्वदेशी बहिष्कारादि अुपायांवर अुत्तेजनार्ह शेंकडों भाषणें केलीं. शेवटीं हा खटल्याचा डोंगर १२ महिने पोखरून मॅजिस्ट्रेटनें १०।२० रु. दंडाच्या किरकोळ शिक्षेचा अुंदीर काढून त्याची बोळवण केली! पण या अभियोगामुळें "मित्रमेळा" व त्याचे पुढारी पोलि-

सांच्या काळ्या याद्दींत गुंतले गेले. राजद्रोहात्मक चळवळी हे लोक करतात, यांची गुप्त संस्था आहे, आणि ती क्रांतिकारक आहे, हें पोलिसांना अगोदर कळलेंच होतें. पण प्रत्यक्ष कृत्य सरकाराविरुद्ध कांहीं घडलें नव्हतें. तें या मारामारीनें घडलें; आणि पोलिसांस हात घालावयास जागा सांपडली. " मित्रमेळ्यापासून पोलिसांस फार त्रास होत होता, " असें आपल्या साक्षींत आमच्या खटल्यांत डेप्युटि सुपरिंटेंडट मारुतीराव तोडरमल म्हणालेहि.

## १९०८ मधला बाबांवरचा दुसरा खटला

महाराष्ट्रांतल्या क्रांतिप्रचारकांत सावरकर बंधूंचीं नांवें पोलिसांनीं १९०६ नंतर गोंवून ठेवलीं होतीं, असें आमच्यावरील खटल्यांत या पोलीस अधिकाऱ्यानें आपल्या जबानींत सांगितलेलें आढळतें. आणि त्यामुळें अशा क्रांतिवीरांना संकटांत घालण्यास सरकार टपलेलेंच होतें. परस्परच त्यांच्यावर संकटें आलीं तर सरकारला गुदगुदल्या होतच असत. लो. टिळकांना म्हणूनच ताअीमहाराज-प्रकरणांत पेचांत आणण्याचा बेशरम प्रयत्न कित्येक वर्षें चालू होता. पण परस्पर अशा वीरांचा कांटा असा न निघाला तर, जी संधि येअील ती साधून, अशा चळवळ्या लोकांना तुरुंगांत डांबण्याचा खटाटोप करण्यांत येअी. तशी संधि १९०८ मध्यें बाबांच्यावर, त्यांच्या अधीरतेनें, पुन्हां आली. त्या वेळी देशभक्त अण्णासाहेब परांजप्यांच्यावर राजद्रोहाचा अभियोग मुंबअीस सुरू होता. बाबा तेवढ्यासाठीं लोकमान्यांच्या आग्रहावरून मुंबअीस गेले होते. परांजप्यांच्या खुटल्याच्या वेळीं मॅजिस्ट्रेटच्या आवाराभोंवतीं खूप गर्दी त्यांना पाहण्यास जमली होती व रेटारेटी चालू होती. रेटारेटींत अेका पोलीस अधिकाऱ्यानें अेका बोहोऱ्यावर गालिप्रदान चालविलें होतें. बाबांनीं त्याबद्दल त्याची कानअुघाडणी केली. प्रकरण हातघाअीवर आलें, आणि पोलीस सुपरिंटेंडंट गायडरनें त्यासाठीं बाबांना अटक केली. बाबांचें नांव त्याला कळलें नसतें, किंवा बाबांनीं खोटें नांव सांगितलें असतें, तर कदाचित् त्यानें बाबांना सोडूनहि दिलें असतें. किंवा जामिनावर त्यांची मुक्तता तरी केली असती. पण 'सावरकर' या नांवाची अिंगळी डसतांच त्यानें हें सावज पक्केंच पकडलें. वास्तविक हा बेकायदा जमावाचा साधा गुन्हा. तोहि मुंबअींत घडलेला. त्या निमित्तानें नाशकास त्यांच्या घराची 'झडती' घेण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण पोलीस निमित्तालाच

टपलेले होते. आणि मॅजिस्ट्रेटहि त्यांचे गुलाम झाले होते. त्यांनीं त्यासाठीं नाशकास बाबांच्या घराची झडती दुसऱ्या दिवशीं घेतली. नारायणराव सावरकरांनीं दूरदर्शीपणानें, हें भावी संकट हेरून, विश्वनाथराव केळकरांना रात्रींच नाशकास पाठवून, झडतीत कांहीं सांपडूं नये अशी व्यवस्था केली होती. त्यांनीं व घरांतल्या मंडळींनीं शक्य ते कागदपत्र रातोरात जाळले. तरीहि बऱ्याच माझिनीच्या प्रती, क्रांतिकारकांचीं, गुप्त संस्थांचीं, लष्करी शिक्षणाचीं कांही पुस्तकें व अितर प्रकाशनें, कांहीं पत्रें पोलिसांस मिळालींच. त्यांचा उपयोग या "बेकायदा जमावाच्या" गुन्ह्याच्या खटल्यांत कांहींच झाला नाहीं. पण पुढच्या १९०९ मधल्या सशस्त्र राज्यक्रांतींची तयारी व चिथावणी या १२१ कलमाखालच्या आरोपावरील त्यांच्या, व आमच्यावरील, खटल्यांत पूर्णपणें झाला. बेकायदा जमावाच्या गुन्ह्याबद्दल बाबांना १ महिन्याचीच शिक्षा झाली.

## सरकारचें मवाळांशीं कारस्थान

बंगालमध्यें १९०८ मध्यें मुजफरपूरच्या बॉंबप्रकरणामुळें, क्रांतिकारक लो. टिळक व अण्णासाहेब परांजपे यांना राजद्रोहाच्या आरोपांवरून अनुक्रमें ६ वर्षें, व १९ महिने, अशा जबर शिक्षा देअून सरकारनें आपापल्यापरी महाराष्ट्रांत 'निर्वीरं अुर्वीतलं' करून ठेवलें होतें. पण या सुमारास व तत्पूर्वींहि अिंग्लंडमध्यें विनायकराव सावरकर, बापट यांनीं राजद्रोही भाषणें व प्रकाशनें यांचा सपाटा चालविलेला होता. त्यामुळें सावरकर व बापट हे अधिकाऱ्यांच्या डोळ्यांत अगोदरपासूनच सलूं लागले होते. त्यांतच बंगालमध्यें क्रांतिकारकांनीं स्फोटक अस्त्रांचा अुपयोग चालविला होता. त्यांत बापटांचें नांव येअून ते अज्ञातवासीहि झाले होते. टिळक, परांजपे, सावरकर, बापट अित्यादिकांचा, महाराष्ट्रांत अिंग्रज सरकारचें राज्य सशस्त्र क्रांतीनें अुलथून टाकण्याचा बंगालप्रमाणेंच अेक अवाढव्य कट आहे, अशी सरकारी अधिकाऱ्यांची समजूत झालेली होती. त्याला कांहीं आधार चांगल्या विश्वासू मवाळांकडून मिळतो कीं काय, याची खटपट चालली होती. टिळकांवरच्या खटल्याच्या वेळीं त्यांचे शिष्य व मित्रपरिवार — म्हणजे तात्यासाहेब केळकर, दादासाहेब करंदीकर, दादासाहेब खापर्डे, वगैरे — यांनीं सरदारगृहांत तळ दिला होता. त्या संधीस आम्हांस सरकारच्या या अंतस्थ कारवाअीचा पुरावा बिनतोड

मिळाला. ती हकीकत मोठी मनोरंजक, व बाबांवरच्या पुढच्या १९०९ मधल्या अभियोगाच्या दृष्टीनें, सूचक व बोधप्रद आहे. ती अशी : —

## आमचे हेर मोघे

लो. टिळकांवर १९०८ मध्यें जो राजद्रोहाचा खटला झाला त्याला त्यांच्या देशभर चाललेल्या राजद्रोही चळवळी हेंच प्रमुख कारण होतें. १९०७ पासून वंग देशांत बॉंबचा अुपयोग क्रांतिकारक करूं लागले होते. महाराष्ट्रांतहि त्याचा पडसाद अुठणार याची सरकारला चुणूक कळली होती. या सर्वांच्या बुडाशीं टिळक, परांजपे, सावरकर हेच आहेत, हेंहि सरकारला ठाअूक होतें. पण याबद्दल सरकारच्या गुप्त मसलती, कोण कोणाशीं, कशा काय, चालल्या आहेत ते जाणण्याची आमची अुत्कंठा होती. म्हणून आम्ही त्या पाळतीवर होतों. विलायतेहून हिंदुस्थान सरकारास रात्रीं तारा येत. त्यांत त्याचा सुगावा लागेल अशी आमची अटकळ होती. आणि अपेक्षेप्रमाणें तें खरेहि ठरलें. आम्हांलासुद्धां ही अटकळ बांधण्यास टिळकांवरील खटल्याच्या वेळीं न्यायाधीश डावर यानें व्हाअिसरॉयच्या तारेला अुत्तर म्हणून केलेली अुघड तार हीच होती. Defence grave, depending jury अशी ही तार होती. ब्रिटिश राज्यांत न्याय-खातें, निदान हायकोर्टें, हीं स्वतंत्र मानलीं जात. पण असा दुबळा न्यायाधीश ( व्हाअिसरॉयला ) राजप्रतिनिधीला तारा पाठवतो, व कदाचित् त्याच्या अिच्छेप्रमाणें अगदींच वागत नसला तरी, त्याच्या गोर्डीगुलाब्रींत राहूं अिच्छितो अशी वस्तुस्थिति या तारेवरून दिसते. असो. त्यावेळीं रा. मोघे या नांवाचे आमचे अेक अभिनव भारतीय सदस्य मुंबअीच्या मोठ्या तारखात्यांत नोकर होते. त्यांनीं डावरची तारेची नक्कल आमच्याकडे सरदारगृहांत पोंचविली. आम्हांला विस्मय वाटला आणि टिळकांना डावर शिक्षा देणार, हें ठरल्यासारखेंच होतें.

नंतर मोघ्यांना आम्ही अितर कांहीं तारा मिळतात कां पहा, असें सांगितलें. पण त्या बाबतींत सरकारचा बंदोबस्त कडेकोट होता. रात्रपाळीच्या कामावर अेकजात ख्रिस्ती व अँग्लोअिंडियन लोक असावयाचे, असा नियमच होता. शिवाय विलायतच्या तारा आंकडे-लिपींत ( कोडवर्ड ) असावयाच्या. यामुळें आम्ही व मोघे बुचकळ्यांत पडलों. पण मोघ्यांना त्यांच्या ख्रिस्ती व

अँग्लो-अिंडियन दोस्तांची खोड माहीत होती. रात्रपाळीच्या वेळीं हे लोक कामावर असले की, त्यांचीं प्रीतिपात्रेंहि आवतीभोवती असत. आणि पाळी-पाळीनें हे कामगार त्यांच्याशीं धिंगाणा घालीत असत. मोघ्यांनीं यांपैकीं त्यांच्या अेका दोस्ताला "रात्रपाळीचें काम मी करतो तूं तुझ्या छेलछबेलीशीं खुशाल गुंगत रहा" असे आमिष दाखविलें. तो कबूल झाला. आणि मोघ्यांनीं अंकलिपीतली (कोडवर्ड) अेक तार नकळत आमच्याकडे पाठवली. पण ही अंक-लिपी कशी अुलगडावयाची हें कोडें आम्हांला पडलें. परंतु मोघे हे त्यामुळें निराश झाले नाहींत. त्यांनी सेक्रेटरीअेटमधल्या त्यांच्या अेका दोस्ताशीं संधान बांधलें. आणि त्याकरितां कोड जेथे ठेवतात त्या कपाटाचें तावदान, ऑफिस संपल्यावर, संध्याकाळीं फोडून कोडच आम्हांला आणून दिलें! त्या किल्लीनें आम्हीं – मी व माझे सहकारी हरि अनंत थत्ते यांनीं – ती सर्व तार अुलगडली.

## ना. गोखल्यांची भेट व मोर्ल्यांचीं कारस्थानें

स्टेट सेक्रेटरी लॉर्ड मोर्ले यांनीं व्हाअिसरॉयला ती तार केली होती. त्यांत जी. के. म्हणतात, "टिळकांचा सावरकर व बापट यांच्याशीं घनिष्ठ संबंध आहे. तरी तुम्ही सावरकरांवर सक्त नजर असूं द्या" असा मजकूर होता. आम्हीं ती तार टिळकांच्या परिवारांतल्या निवडक मंडळींनाहि दाखविली. त्यावेळीं ना. गोपाळ कृष्ण गोखले (जी. के.) हे विलायतेस होते. मोर्ले यांच्या भेटीगांठी ते घेत. त्यावरून 'जी. के.' म्हणजे नामदार गोखलेच होत, यांत शंका नव्हती. गोखल्यांनी हे बुद्धिपुरःसर कदाचित् मोर्ल्यांना सांगितलें नसेल. त्यांच्या भोळसटपणाचा फायदा मोर्ल्यांनीं घेतला असेल. पण पुण्याचा मवाळकंपू हा टिळकांना पाण्यांत पहात होता हेंहि तितकेंच खरें आहे. तत्कालीन मवाळ हे सरकारचे "मित्र" बगलबच्चे होते हें अुघडच होतें. टिळकांना शिक्षा झाली त्या दिवशीं या कंपूनें पेढे वाटले असाहि लोकप्रवाद होता. या कंपूचे गोखले हे परात्पर गुरु होते. टिळकांबद्दल त्यांनीं फारसा आदर नव्हता, हेंहि पुष्कळांना माहीत होतें. त्यामुळें गोखल्यांबद्दल आदर नसणाऱ्यांना, व टिळकांबद्दल निष्ठा असणाऱ्यांना, गोखल्यांचें हें मोर्लेंशीं झालेलें संभाषण देशद्रोहीपणाची चुगली (?) वाटली असल्यास नवल नाहीं. आणि तशी ती वाटली म्हणूनच पुण्यांतल्या अेका गुप्त संस्थेंतील

ब्रह्मगिरीबुवा, पाळंदे, परांजपे, शिधये या क्रांतिकारकांनीं गोखल्यांना या चुगलखोरीबद्दल प्रायश्चित्त द्यावयाचें ठरविलें होतें. आमच्यावरील १९१० मध्यें सशस्त्र राज्यक्रांतीच्या आरोपावरून झालेल्या खटल्यांत या आरोपींनीं ही गोखल्यांच्या खुनाच्या प्रयत्नाची हकीकत कबूल केली होती. पण त्या खुनशीपणाचें बीज या गोखल्यांच्या चुगलखोरींत (?) होतें. असो.

### गोखल्यांचें कारस्थान व बाबांवर सक्त पहारा

या तारेतल्या आज्ञेप्रमाणें सरकारी चक्रें फिरून लागलीच बाबा सावरकरांवर २४ तास पोलिसांचा पहारा बसला, ही अेकच गोष्ट त्या तारेच्या खरेपणाचा सबळ पुरावा आहे. बाबांच्या चळवळी त्यामुळें अर्थातच रोखणें, बंद करणें, भाग पडलें. तरीहि ते या घरांतून त्या घरांत अुडी मारून जाअून, पहारेकऱ्यांस, कधीं महत्त्वाच्या प्रसंगीं, गुंगाऱ्या देअून ८–८ दिवसहि घरांतून नाहीसे होत. पोलीस त्यामुळें अतिशय चिडत. पण करणार काय ? बाबा त्यांचे कांहीं गुलाम नव्हते. पण या बाबांच्या गुप्त होण्याच्या हिकमतीमुळें, बाबांना हवें तेव्हां पकडतां यावें म्हणून, त्यांचें पकडवॉरंट तारखेशिवाय जय्यत तयार ठेवलेलें होतें. आणि १९०९ मध्यें फेब्रुवारी महिन्यांत ते असेच पोलिसांस गुंगाऱ्या देअून मुंबअीस मजकडे येअून राहिले असतां त्यांना माझ्याच खोलींत पकडण्यांत आलें. विलायतेहून चतुर्भुज हा त्याच सुमारास पिस्तुलें घेअून येणार होता, ही बातमी कदाचित् त्यांना तात्यांच्या पत्रांतून सांकेतिक शब्दांनीं कळली असावी, आणि म्हणूनच ते मुंबअीस आले असावें, असा अेक तर्क आम्हीं बांधला होता.

### बाबांना जन्मठेपीची शिक्षा

असो. गोखल्यांच्या कारस्थानाचें हें थोडेसें आगंतुक प्रकरण सोडून आपण बाबांच्या प्रकट कार्यामुळें त्यांच्यावर ओढवलेल्या संकटांची गोष्ट पुरी करूं. सरकारनें यावेळीं त्यांच्यावर जे आरोप ठेवले होते ते " लघु अभिनवभारत-मालें "तल्या पदांनी, व माझिनीच्या प्रकाशनानें, त्यांनीं " राजाविरुद्ध सशस्त्र युद्ध करण्याचा प्रयत्न केला, व अशा युद्धास अुत्तेजन दिलें " असें होतें. १२१, १२१ अ, १२२, १२४ अ वगैरे विधिनिर्बंधांतली ( अिंडियन पिनल कोड ) कलमें त्यांच्यावर लागू केलीं होतीं. प्रकट प्रकाशनांचाच हा परिणाम होता. त्यांतहि " रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळेना " या गोविंद

कवीच्या अुघड अुघड सशस्त्र बंड करण्याचा अुपदेश करणाऱ्या पदांवर सरकारचा फार कटाक्ष होता. पिनल कोडप्रमाणें तो बरोबर लागू पडत होता. मागें निर्दिष्ट केल्याप्रमाणें १९०८ मधल्या त्यांच्या घरांच्या झड-तींत सांपडलेले बॉंबचें चोपडें, कागदपत्रें, लष्करी शिक्षणाची व युरो-पांतल्या गुप्त संस्थांचीं पुस्तकें, हा पुरावाहि सरकारला फार अुपयोगी पडला. प्रकाशनांच्या, व या अुघड पुराव्याच्या, आधारावर बाबांना त्या कलमाखालीं जन्मठेप व अिस्टेटजप्ती ही अघोर कठोर शिक्षा फर्मावण्यांत आली! बाबांच्या हातून युद्धाचे असें प्रत्यक्ष कृत्य कोणतेंच घडलेलें नव्हतें.त्यामुळें आपण देतो ही शिक्षा राज्यक्रांतीच्या, केवळ अुपदेशाच्या स्वरूपाच्या, गुन्ह्याला फारच जबर निर्दयपणाची आहे हें बी. सी. केनेडी या अिंग्रज न्यायाधिशा-लाहि वाटलें होतें. पण फांशी किंवा जन्मठेप यांशिवाय कायद्यांत त्या गुन्ह्याला दुसरी शिक्षाच सांगितली नसल्यानें "नाअिलाजानें मला ती द्यावी लागत आहे, सरकारनें ती वाटल्यास कमी करावी," असें या न्याया-धिशानें निवाड्यांत स्पष्ट म्हटलें होतें. पण सरकारच्या जिवावर अुठलेल्या बाबांना खुनशी सरकार दया कशी दाखविणार? त्यांना त्यांनीं अंदमानांत झिजून झिजून मरण्याच्या हेतूनें पाठविलें, व त्यांचा किती अमानुष छळ केला, हें बाबांच्या चरित्रांत आलेंच आहे.

या खटल्याच्या वेळेस बाबा सावरकरांच्या हातून अेक मोठी चूक झाली तिचा अुल्लेख येथेंच केलेला बरा.

### बाबांची घातकी अितिहास-लोलुपता

कै. बाबांना, अभिनव भारताच्या भावी अितिहासाला अुपयोगी पड-तील अशीं, कागदपत्रें जपून ठेवण्याची फार हौस होती. त्यांच्या या अिति-हासप्रेमाचा धोका त्यांना कळत नव्हता, असें नाही. पण अितर धोक्याच्या गोष्टी आपण करतोच आहोंत, मग यानेंच काय जास्त होणार, असा त्यांचा विचार असे. आम्ही सर्वजण त्यांची कानअुघाडणी याबाबत करीत होतों. पण मग ते आम्हांला न कळत या लेखी पुराव्याची गुप्त व्यवस्था करीत. त्यांना मुंबअीस १९०८ मध्यें पकडल्यानंतर रातोरात चि. बाळ सावरकरांच्या मसलतीप्रमाणें (आतां कै. ॲडव्होकेट) बाबूराव केळकर नाशकास आले, व ते व दातारशास्त्री यांनीं रात्री घरांची झडती घेतली तेंव्हां, विनायकराव सावरकरांची

लंडनच्या गुप्त चळवळीचीं कित्येक पत्रें त्यांना मिळालीं! तीं त्यांनीं सर्व जाळलीं. म्हणून दुसऱ्या दिवशीं अपेक्षित पोलीस-झडतींत तीं सरकारच्या हातीं लागलीं नाहींत! तीं सांपडलीं असतीं तर बाबासुद्धां आमच्या सर्वांच्या विरुद्ध भक्कम पुरावा तेव्हांच मिळता; व त्यांत निर्दिष्ट केलेल्या अितर कैक सभासदांची व त्यांच्या हालचालीची अित्थंभूत माहिती १९०८ मध्येंच पोलिसांस मिळती. त्यानंतर त्यांना जेव्हां माधवाश्रमांत १९०९ च्या फेब्रुवारींत माझ्या खोलींत पकडलें तेव्हांहि मी त्यांच्या जामीनकी वगैरे व्यवस्थेसाठीं त्यांच्याबरोबर नाशकास गेलों होतों. शिवाय, मी व माझे मित्र यांनीं ठरवल्याप्रमाणें माझ्या बरोबर आमचे दुसरे अभिनवभारतीय सदस्य ( हल्लीं जुन्नरला वकिली करीत असलेले ) रा. गणपतराव जोगळेकर हे निराळ्या डब्यांत बसून नाशकास आले. जामिनकीची खटपट व्यर्थ गेल्यावर खाण्यापिण्याची व्यवस्था रात्रीं तुरुंगांत मीं केली. आणि नंतर मी, गोविंद कवि, दातारशास्त्री आणि येसू वहिनी यांनीं पुन्हा घराची रात्रभर झडती घेतली. तेव्हांहि आम्हांला बरीच विलायतचीं तात्यांचीं पत्रें व अितर कागदपत्र मिळाले. आम्ही ते जाळले. त्यांशिवाय मी व्यायामपटू रा. कृष्णराव महाबळांना व गणपतराव मगर यांना रातोरात भगूरला पिटाळून तेथें असलेले सर्व कागदपत्र — दैनंदिन्या-सुद्धां — जाळण्याची व्यवस्था केली. मित्रवर्य जोगळेकरांना, बरोबर सोबत देअून, कोठुरें येथें तसेंच रात्रीं पिटाळलें, व तेथें असलेल्या बाँबच्या साहित्याची वासलात लावली. या दक्षतेमुळें बराचसा पुरावा व मुद्देमाल पोलिसांच्या दुसऱ्या दिवशींच्या संकल्पित झडतींत सांपडला नाहीं. तरीपण आम्हांला, व सौ. येसू वहिनींनाहि, नकळत बाबांनीं असे बरेचसे कागदपत्र, सभासदांचे पत्ते, बाँबच्या कृतीची पुस्तिका वगैरे घराच्या छपराखालीं कौलारांत लपवून ठेवलेच होते!

बाबांची ही कागदपत्र ठेवण्याची खोड आम्हांला माहीत असल्यानें, मी त्यांच्याशीं, मुंबअीहून रेल्वेंत बोलतांना, त्यांनीं कोठें कागदपत्र ठेवलें असल्यास मला आतां सांगा, म्हणजे मी त्यांचा नाश करतों, असें खोदखोदून विचारलें. पण त्यांनीं त्यावेळीं मला ‘कांहीं नाहीं’ असेंच अुत्तर दिलें! पोलीस अिन्स्पेक्टर रामभाअू बल्लाळ यांच्या सहानुभूतीनें बाबा, मी व २ अडाणी सशस्त्र पोलीस अेवढेच अेका डब्यांत होतों. आम्ही अिंग्रजींत बोलत होतों.

पोलिसांस तें येत नव्हतें. ती संधि फारच नामी होती. पण ती बाबांनीं घालवली. कौलारांतल्या कागदपत्रांची हकीकत मला तेव्हां कळती तर पुढच्या झडतींत ते सांपडले नसते. पण बाबांच्या त्या चुकीमुळें घोर अनर्थ झाला. मला न सांगतां ती गोष्ट त्यांनीं, पुढें कांहीं दिवसांनीं, त्यांचे धाकटे बंधू बाळ सावरकर याला, तो त्यांचें अन्न घेऊन गेला तेव्हां, “ कौलारांत ५ रुपयांची नोट ठेवली आहे ती घे ” अशा शब्दांनीं सुचवली. त्यावेळीं सरकारी नियमाप्रमाणें मॅजिस्ट्रेट जोशी हजर होते. त्या अिंग्रजांशीं अेकनिष्ठ राहणाऱ्या, पण देशाशीं द्रोह करणाऱ्या, नोकराला संशय आला व त्यांनीं वाटेंतच पोलिसाकरवीं बाळला थांबवलें; व झडतीचें वॉरंट घेअून त्याच्याबरोबर घरीं जाअून, सुचवलेल्या ठिकाणची झडती घेतली. त्यांत अनेक कागदपत्र, पत्ते, बॉंबच्या कृतीचें पत्रक सांपडलें ! तरी चि. बाळनें तेवढ्यांत, नजर चुकवून, अेक दप्तर हातोहात अुडवलेंच !

बाबांच्या या कागदपत्र ठेवण्याच्या खोडीमुळें सरकारला त्यांच्या, व नंतर १९१० मध्यें आमच्या सर्वांच्या विरुद्ध, बराचसा पुरावा मिळाला. पत्त्यांच्या सुगाव्यानें पोलिसांनी व सरकारनें शेंकडों लोकांना सतावलें. बडतर्फ केले ते वेगळेच. आम्ही जे कागदपत्र जाळले तितके जर सरकारच्या हातीं पडते तर शेंकडों लोकांची आमच्याबरोबरच अंदमान किंवा तुरुंग यांत दीर्घकाल भरती झाली असती.

असो. गुप्त संस्थांचा खरा अितिहास कसा व कां मिळणें शक्य नसतें, याचीं कारणें वर दिलींच आहेत. आमच्याहि अभिनव भारत संस्थेच्या गुप्त चळवळींचा अितिहास, म्हणूनच, सर्वच्या सर्व देणें या कारणामुळेंच अशक्य आहे. स्मृतिपटावर, वयोमानाप्रमाणें पुसत पुसत, जो अवशिष्ट राहिला आहे तेवढाच येथें देत आहे. बाकी कर्मयोगाच्या फलत्यागाच्या सिद्धांतानुसार परमेश्वरार्पणच झाला आहे. असो.

### वाळवे यांना शिक्षा

यानंतर पुन्हा कथानुसंधानाकडे वळूं. बाबांच्याशिवाय, अुघड प्रकाशनाचें कार्य करण्याबद्दल, आमचे सदस्य धानाप्पा सिद्रामाप्पा वाळवे यांनाहि ६ महिन्यांची शिक्षा, टिळक व परांजपे यांचीं व्याख्यानें प्रसिद्ध केल्याबद्दल, झाली होती. हे गृहस्थ चिवड्याचे व्यापारी होते व अेकनिष्ठ

होते. पण पोलिसांच्या गरक्यांत ते या प्रकाशनाच्यां निमित्तानें सांपडले. त्यांना झालेल्या शिक्षेचें विशेष महत्त्व नव्हतें. पण त्या जोरावर त्यांना पोलिसांनीं हुडकून, १९१० मध्यें महान् शिक्षेचा धाक दाखवून, आम्हां अभिनव भारताच्या सदस्यांविरुद्ध साक्ष देण्यास लावलें. त्यांनीं ती नाअिलाजानें दिली; पण पुष्कळच छपवून बाकीची फारच थोडी माहिती सांगितली.

## श्रीधर वामन बर्वे यांना शिक्षा

त्यांच्यानंतर विलायतेहून १९०७मध्यें तात्या सावरकरांनीं कांहीं तामिळ भाषेंतलीं पत्रकें मद्रास प्रांतांत वांटण्याचें काम बाबांवर सोंपवलें होतें. बाबांनीं तें काम कोठूरचे अभिनव भारतीय सदस्य वामन श्रीधर बर्वे यांजवर टाकलें. हेतु हा कीं, कोठुऱ्यासारख्या खेड्यांतून ती पाठवलीं गेलीं तर त्यांच्याबद्दल फारसा संशय कोणी घेणार नाही. आणि मद्रासी लोकांना कोठून तीं आलीं याचा अुलगडा होणार नाहीं. हेच बर्वे बाँबची विद्या शिकून ते तयार करण्याच्या कारवाअींत होते. तात्या बर्वे यांनीं हीं पत्रकें वांटण्याचें काम चोख बजावलें. पण मद्रास अिलाख्यांत तीं सरकारच्या हातीं पडलीं. आणि सुतानें स्वर्गास जाणाऱ्या पोलिसांनीं पोस्टाच्या शिक्क्यावरून कोठूरचा छडा लावला, व तात्या बर्व्यांना पकडलें. पण, बर्व्यांना तामिळ भाषा येते हें पोलिसांना सिद्ध न करतां आल्यानें, बर्व्यांना केवळ राजद्रोहाचें टपाली काम केल्याबद्दल ६ महिन्यांची शिक्षा ज्याक्सनसाहेबानें दिली.

सोलापूरचे आमचे कार्यकर्ते व 'स्वराज्य' पत्राचे संपादक बळवंत शंकर लिमये यांनाहि १९०८ मध्यें राजद्रोहाच्या आरोपावरून तुरुंगवासांत अडकवून टाकलें. यांचा व होतीलाल वर्मा यांचा घनिष्ट संबंध होता. यांचें वतनहि सरकारनें खालसा केलें.

## गाडगीळ व जोशी यांना शिक्षा

अभिनव भारताच्या आपल्या सवंगड्यांपैकीं ग्वाल्हेरहून पिस्तुल आणण्याच्या आरोपावरून रा. विठ्ठल बाळकृष्ण जोशी व महादेव बळवंत गाडगीळ यांना ६ महिन्यांची शिक्षा हत्यारांच्या कायद्याखालीं ज्याक्सनसाहेबानें दिल्याचें मागें सांगितलेंच आहे. तदनुरोधानेंच ग्वाल्हेरच्या राज्यक्रांतीकारक कटाच्या खटल्याचा अुल्लेख येअून गेलेला वाचकांस आठवत असेलच. सरकार आमच्या विरुद्ध हात धुवून पाठीस लागलेलें होतें. आम्हीहि या

परिणामांना शक्य तों तोंड देतच होतों. गाडगिळांनीं शिक्षा भोगली, पण सरकारला फसवून पिस्तुल मात्र जाअूं दिलें नाहीं.

### खऱ्यांचा मोकासा जप्त व राजद्रोह न करण्याबद्दल जामीन

या शिक्षासत्रांत नाशिकचे सुप्रसिद्ध वकील कै. **वामन सखाराम अूर्फ बाबासाहेब खरे** यांची, त्यांना राजद्रोही भाषणें करण्याची संवय असल्याबद्दल, मुस्कटदाबी करण्यांत आली; आणि ज्याक्सनसाहेबांनीं राजद्रोहाच्या आरोपावरून त्यांचा मोकासाहि जप्त केला. बाबासाहेब खऱ्यांनीं अभिनव भारतासाठीं सर्व तऱ्हेचे कष्ट सोसले होते. द्रव्याची मदतहि ते केव्हां केव्हां करीत असत. बाबांवर त्यांचा अतिशय लोभ होता. अितका कीं, कांहीं खासगी व अत्यंत नाजूक कामांत बाबांच्या अभिप्रायावर त्यांनीं आपली मदार ठेवली होती. ते अत्यंत भावनावश असत. १९०६ व ०७ सालीं ते माझ्याबरोबर कलकत्ता व सुरत येथें कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या निमित्तानें, पण बंगालच्या क्रांतिकारकांच्या भेटीगांठीसाठीं, आले होते. त्यांनीं पदेंहि केलीं होतीं. आणि कोणतीहि सभा किंवा संमेलन असो, त्यांत ते तीं स्वतः मोठ्या आविर्भावानें म्हणत असत. या भावनावशतेमुळें, व खाजगी व सरकारी आपत्तीमुळें, त्यांना पुढें वेडहि लागलें होतें. त्यांना कांहीं दिवस सरकारनें धारवाडास ठेवलें होतें. तेथून ते सुटून आले पण मनानें व शरीरानें कायमचें खंगून आले. वेड लागल्यानें वकिलीहि गेली आणि सरकारनें मोकाशाचें अुत्पन्नहि बुडवलें! यामुळें प्रतिमासीं २–३ हजार रुपये वकिलींत सहज मिळवणाऱ्या या अत्यंत भावनाप्रधान देशभक्ताला अखेरीस दारिद्र्यांत, हालअपेष्टांत, झिजून झिजून मरावें लागलें!

### नारायणराव कल्हअीकरांना शिक्षा

अिंग्रज सरकारनें राजद्रोही चळवळी जाळून टाकण्यासाठीं पेटवलेल्या खाअींत रा. नारायण तुकाराम कल्हअीकर या गृहस्थांसहि हत्यारांच्या कायद्याचा चांगलाच चटका दिला. खुदिराम बोसप्रमाणें आपणहि कांहीं दिव्य करावें असा नारायणरावांचा बेत होता, असें त्यांच्याविरुद्ध अेका साक्षीदारानें सांगितलें होतें. १८ महिने सक्तमजुरीची शिक्षा या गुन्ह्यासाठीं त्यांना देण्यांत आली. 'विहारी' पत्रांत राजद्रोही लेख प्रसिद्ध केल्याबद्दल आमचे

अ. भा.चे सदस्य भास्करराव फडके व रामभाअू मंडलीक यांना शिक्षा झाल्याचा अुल्लेख मागें आलाच आहे.

याप्रमाणें १९०७ पासून तो आमच्या १९१० मधल्या खटल्यापर्यंत महाराष्ट्रांतली राजद्रोही व राज्यक्रांतिकारक चळवळ दाबून टाकण्याचा सरकारचा खुनशी व घातक अुद्योग चालूंच होता. लो. टिळकांपासून तों अगदीं सामान्य माणसापर्यंत जो जो कोणी राजद्रोही वाटेल त्यास या शिक्षासत्राच्या वणव्यांत टाकून, होरपळून, भाजून काढण्याचा त्यांनीं चंगच बांधला होता. आणि त्यांस या राक्षसी कामांत आमच्यांतलेच कांहीं निमकहराम अधिकारीहि मदत करीत होते. या त्यांच्या मदतीबद्दल अिंग्रज सरकारनें कोणाला जहागिऱ्या, कोणाला जमिनी, बढत्या व अितर सुखसोयी बहाल केल्या होत्या. त्यावेळच्या कोणकोणत्या देश-द्रोह्यांनीं अशीं बक्षिसें सरकारकडून मिळवलीं त्यांची, नांवनिशीवार यादी काढून, सध्याच्या राष्ट्रीय सरकारनें त्या सर्व जहागिऱ्या, जमिनी व अितर सवलती जप्त करणें अगदीं धर्म्य व अुचित ठरेल. १९४२ च्या चळवळीं-बद्दल सरकारनें जर हें धोरण स्वीकारले आहे, तर मागच्या चळवळींतल्या हरामखोरांबद्दलहि असलेंच धोरण पत्करणें जरूर आहे. निमकहरामी ही जरी कांहीं दुष्टांना, फितुऱ्यांना, तात्पुरती फायदेशीर वाटली, तरी परिणामीं, पुढच्या पिढ्यांनासुद्धां ती घातक ठरते, असें फितुरी लोकांना कळलेंच पाहिजे.

## जुलुमाची प्रतिक्रिया प्रतिहिंसा ही अहिंसाच आहे

या सर्व सरकारच्या दडपशाहीची प्रतिक्रिया जुलमी अिंग्रज अधि-काऱ्यांच्या खुनांच्या स्वरूपानें हिंदुस्थानांत व विलायतेंतहि दिसून यावयास लागली. सरकारच दडपशाही करतें असें नव्हे. त्यांच्या विरुद्ध शीर हातावर घेअून अुठलेले आणि देशभक्तीनें नखशिखांत मुसमुसणारे देशभक्तहि सर-कारी अधिकाऱ्यांना जमीनदोस्त करूं शकतात, आणि प्रसंगीं त्यांना कंठस्नानाहि घालतात, हें क्रांतिवीरहि दाखवूं शकले. बंगाल, पंजाब, महा-राष्ट्र, मद्रास प्रांतांनीं या बाबतीत स्पृहणीय कामगिरी करून दाखवली आहे. अर्थात् सरकारचें सामर्थ्य प्रचंड. त्यामुळें त्यांची दडपशाहीहि विस्तृत प्रमाणावर होअूं शकली ही गोष्ट खरी. पण त्यांच्या विरुद्ध खवळून अुठलेले देशभक्त थोडे असले, आणि त्यांचें सामर्थ्य थोडें असलें, तरी जशाला तसा

भेटतो, टोल्याला टोला बसतो, निधड्या छातीचे वीर अद्यापहि भारतभू प्रसवूं शकते, हें दाखवण्यापुरती चमक या प्रसंगीं अभिनव भारताच्या वीरांनीं विलायतेंत व नाशकांत दाखवली. कर्झन वायलीचा धिंग्रांनीं विलायतेंत अेक बळी घेतला आणि कान्हेऱ्यांनीं नाशकास ज्याक्सनला अुडवला.

क्रांतिकारकांना जुलमी राज्यसत्तेविरुद्ध अल्पस्वल्प अशी जी, सत्ताधारी किंवा त्यांचे बगलबच्चे यांची, हिंसा करावी लागते ती, तत्त्वतः न्यायतः पाहिलें तर, मूळ हिंसा नसून राज्यकर्त्यांनीं केलेल्या जुलमी व हिंसात्मक कृत्यांची प्रतिक्रिया – प्रतिहिंसा – किंवा अहिंसाच असते. खुनी माणसाला फांशी देणारी न्यायदेवता ही तरी, आरोपीच्या हिंसक कृत्याची प्रतिक्रिया म्हणूनच त्याला फांशी देण्यांत होणारी हिंसा ही न्याय्य मानते. नरराक्षसांशिवाय अुगाच कोणी हिंसेस सहसा प्रवृत्त होत नाहीं. जुलूम, अन्याय, आत्मरक्षण यांसाठीं, अगदीं सर्व सामोपचाराचे अुपाय संपल्यावरच, कोणीहि सूज्ञ हिंसेस अुद्युक्त होतो. पण ही हिंसाहि प्रतिहिंसा असते, मूळ हिंसा नव्हे. मूळ हिंसा, खरी हिंसा, ही स्वार्थानें अंध आणि अुन्मत्त झालेला माणूस, किंवा वेडगळ अशा राजकीय व धार्मिक समजुतींनी मूढ झालेला पक्ष, यांच्या हातून प्रथम होते. देहदंड, मनोदंड, द्रव्यदंडापासून देहान्तापर्यंतच्या सर्व हिंसा या स्वार्थ किंवा पक्षांध झालेल्यांच्या हातून होतात. या सर्व हिंसा खऱ्या व मूळ हिंसा होत. आणि त्याच दोषार्ह आहेत. त्यांची प्रतिक्रिया म्हणून केलेली प्रतिहिंसा ही दोषार्ह कोणी मानीत नाहीं. न्यायतः होणारी प्रतिहिंसा ही जर सदोष असती तर सर्व दंडांची वा फांशीची शिक्षा देणें हेंहि अन्याय ठरलें असतें. त्या आधिकृत शिक्षांना कोणी सदोष मानीत नाहींत. अितकेंच नव्हे, तर प्रतिहिंसेला धर्मस्मृतींमध्यें मुद्दाम धर्म्य व न्याय्य असेंच मानतात. तसेंच आत्मरक्षणासाठीं, किंवा दुसऱ्याच्या रक्षणार्थ, केलेली प्रतिहिंसा ही सुद्धां धर्म्य व न्याय्य असेंच सर्व देशांतले कायदे मानतात. ही न्यायधर्म्य प्रतिहिंसा या दृष्टीनें अल्प हिंसा व म्हणून खरी अहिंसाच आहे. व्यवहार्य अहिंसा अितकीच.

हाच नियम क्रांतिकारकांच्या प्रतिहिंसेलाहि लागूं असतो; नव्हे असंला पाहिजे. क्रांति हीच मुळीं जुलूम किंवा अन्याय यांची प्रतिक्रिया असते. कारणाशिवाय जसें कार्य नाहीं त्याप्रमाणेंच जुलमाशिवाय क्रांति

नाहीं. जुलमी राज्यकर्त्यांना हें समजत नाहीं असें नाहीं. पण त्यांची सत्तालोलुपता, स्वार्थ, हा त्यांना न्याय-अन्यायाची चाड बाळगूं देत नाहीं, आणि हा अन्याय, हा जुल्म, सतत होत राहिला, त्या सत्तेखालीं राबणाऱ्यांच्या सहनशीलतेच्या मर्यादाहि ओलांडूं लागला, म्हणजेच त्याच्या विरुद्ध मग प्रतिक्रिया होऊं लागते. आणि सत्ताधाऱ्यांनीं केलेल्या हिंसेच्या विरुद्ध प्रतिहिंसा करणें हें, न्यायाची व सत्याची चाड बाळगणाऱ्या सद्गुणी निःस्वार्थी नरवीरांचें, पुण्य अहिंसक कर्तव्यच होऊन बसतें. आजपर्यंत अितिहासांत ज्या प्रतिहिंसा झालेल्या आहेत त्यांच्या मूलहेतुनुसार त्या सर्व अशाच न्याय्य आणि धर्म्य अहिंसाच आहेत. भगवद्गीतेंतहि श्रीकृष्णांनीं याच न्यायाला अनुसरून अर्जुनाला धर्म्ययुद्ध, धर्म्यहिंसा, करावयाला प्रवृत्त केलें. प्रतिहिंसेला याप्रमाणें सर्व व्यवहार्य धर्मांत व न्यायालयांत अवश्य तें अहिंसेचें, मानाचें, व प्रतिष्ठेचें स्थान आहे.

तेंच मानाचें स्थान क्रांतिकारकांच्या सद्धेतुमूलक केलेल्या अल्प-स्वल्प प्रतिहिंसेलाहि मिळालें पाहिजे. सत्ताधिकाऱ्यांना धाक बसावा म्हणून त्यांच्या जुलमाविरुद्धच क्रांतिकारक त्यांच्या जिवावर अुठतात, आणि कोठें अेखाद-दुसरें प्रतिहिंसेचें कृत्य करतात. तसें अगदीं न्यायाच्या तराजूनेंच मोजून पाहिलें तर जुलमी सत्ताधिकाऱ्यांनीं केलेल्या हिंसेच्या मानानें प्रतिहिंसेचें पारडें जड भरतच नाहीं. त्यांच्या हिंसेच्या मानानें प्रतिहिंसेचें प्रमाण कमीच भरतें. पण ती प्रतिहिंसा अवश्य असते, आणि म्हणूनच अहिंसा ठरते. म्हणूनच ऱ्यांडचा वध करणाऱ्या चाफेकरांना, कर्झन वायलीचा वध करणाऱ्या धिंग्रांना, आणि ज्याक्सनचा वध करणाऱ्या अनंता कान्हेऱ्यांना martyrs 'धर्मवीर' असें देशभक्तांनी संबोधलें आहे. धिंग्रांनीं आपल्या समर्थनांत याच विचारसरणीला अनुसरून पुढील वक्तव्य केले होतें.

Terrorise the officials, English and Indian, and the collapse of the whole machinery of oppression is not very far. The persistent execution of this policy, that has been so gloriously inaugurated by Khudiram Basu, Kanayalal Dutt and other martyrs, will soon cripple the British Govt. in India. This campaign of separate assassinations is the

best conceivable method of paralysing the bureaucracy and of arousing the people. The initial stage of the revolution is marked by the policy of separate assassinations.

BANDE MATARAM.

(सावरकरांनीं विलायतेंत छापलेल्या अेका पत्रकांतील हा अुतारा आहे) – “ अिंग्रज व हिंदी अधिकाऱ्यांना खुनांची जरब बसवा कीं, सर्व जुलमाचें यंत्र लौकरच कोलमडून पडेल. खुदिराम बसू, कनय्यालाल दत्त व अितर महाभागांनीं जें हें धोरण अितक्या यशस्वितेनें तेजस्वितेनें सुरू केलें आहे, त्यामुळें हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्य लौकर खिळखिळें होअील. लोकांमध्यें जागृति अुत्पन्न करण्यास, अधिकाऱ्यांस गर्भगळित करण्यास, निरनिराळया ठिकाणीं अधिकाऱ्यांच्या वधांची मोहीम सुरू करणें हीच सर्वोत्कृष्ट युक्ति आहे. राज्यक्रांत्यांच्या प्रारंभी असे विविध ठिकाणीं वध झालेले आढळून येतात. वंदे मातरम् ॥

### क्रांतिपूर्व प्रतिहिंसेची आवश्यकता

हेच अैतिहासिक क्रांतिपूर्व धोरण हिंदुस्थानांतहि अनुसरलें जावें अशी क्रांतिकारकांची अिच्छा होती. दुसऱ्याहि अेका मुद्यानें हें हिंसात्मक समर्थन होअू शकतें. तें असें. सशस्त्र क्रांतीची अुठावणी करण्यापूर्वी प्रत्येक देशांत जनमताकर्षक असे कांहीं ठळक भडक प्रसंग क्रांतिकारकांनीं मधून मधून मुद्दाम घडवून आणले आहेत. जुलमी सरकारी अधिकाऱ्यांना चांगलीच जरब व दहशत बसावी, प्राणांची भीति वाटावी, आणि लोकांनाहि क्रांतिकारकांचीं प्रचंड पण गुप्त कारस्थानें चालू आहेत हें सोदाहरण पटावें, म्हणून प्रत्येक परतंत्र देशानें,क्रांतीचा वणवा भडकवण्यापूर्वी, असलीं दहशतवादाचीं कांहीं कृत्यें मुद्दाम केलेलीं आढळतात. सरकारचें नैतिक धैर्य ( morale ) कमी व्हावें, आणि लोकांचें तें वाढावें, हा त्यांत अेक अुद्देश असतो. या कृत्यांबद्दल कांहीं क्रांतिकारकांना फांशी दिल्यानें जशी क्रांति थांबत नाहीं, तसेंच या असल्या हल्ल्यांनीं, किंवा जुलमी अधिकाऱ्यांच्या कांहीं वधांनीं, राज्यक्रांति पुरी होअील ही क्रांतिकारकांचीहि अपेक्षा नसते. देशस्वातंत्र्याच्या कार्यांत जे बुद्धिमान् लोक, आपल्या प्राणांचीच काय, पण सर्वस्वाचीहि कदर न करतां, तनमनधनानें पडलेले असतात

त्यांना या असल्या क्षणिक, तुरळक, दहशती चढाओीच्या यत्नांनीं स्वातंत्र्य मिळणार नाहीं, हें कळण्याअितकी अक्कल खास असते. आणि तरीहि ते तीं अुपर्युक्त हेतूकरतां करतात. हीं असलीं हिंसक कृत्यें अेखादे वेळीं फसलीं तर त्याचा परिणाम कर्त्यांना तर भोगावा लागतोच, पण कधीं कधीं त्यांच्या संस्थांनाहि घातक ठरतो, आणि अितरांनाहि जाणवतो. ज्या सरकाराविरुद्ध असलीं हिंसात्मक खुनी किंवा विनाशक कृत्यें होतात तें पिसाळतें, आणि सूडबुद्धीनें कर्त्यांवर, त्यांच्या संस्थावर, व देशावर आणखी जुलूम करण्यास प्रवृत्त होतें. क्रांतिकारकांच्या दृष्टीनें ही अिष्टापत्तिच असते. त्यामुळें लोकहि अधिक चवताळतात. सुखासीन लोकांच्या दृष्टीनें क्रांतिकारकांचीं हीं कृत्यें अपघाती वाटतात; आणि हे लोकहि, सरकारप्रमाणेंच, पण जरा खालच्या सुरांत, क्रांतिकारकांना शिव्या देतात, किंवा "अुच्छृंखल, माथेफिरू, देशघातकी" अशीं नांवें ठेवतात. सतीचें वाण घेतलेल्या देशभक्तांना हें सर्व समजून-अुमजूनच सोसावें, करावें, लागतें. तसें केलें नाहीं, जुलमी अधिकाऱ्यांना त्यांच्या जुलमाचें प्रायश्चित्त म्हणून जर देहान्त शासन घडलें नाहीं, तर "क्रांतिकारक भागूबाअी बनले, सरकारपुढें नमले, भ्यायले, पळाले" अशा वलगना, शिव्याशाप, अुच्चारावयालाहि हेच लोक तयार असतात. सामान्य लोकांचें नैतिक धैर्य अशानें खचतें, आणि असल्या नियोजित हिंसेनें तें अगदीं अुच्चतम बिंदूपर्यंत ठेवणें हें तर क्रांतिकारकांचें कर्तव्यच असतें. कारण लोकांचें हें नैतिक धैर्यच प्रसंगोपात क्रांतिकारकांना अुपकारक ठरतें. : १९४२च्या "चलेजाव"च्या आंदोलनांत काका कालेलकर व मश्रूवाला यांच्यासारख्या म. गांधींच्या भक्तांनीं हेंच धोरण पत्करलें होतें. त्यामुळें गुप्तसंचारी, भूमिगत, देशभक्तांना लोकांच्या य नैतिक मनोधैर्यामुळेंच महिनोमहिने गुप्त आश्रय मिळाला, आणि त्यांच्या सर्व सोयी पुरवल्या गेल्या. महाराष्ट्र, बंगाल, पंजाब, युक्तप्रांत, बिहार वगैरे प्रांतांतल्या माजी व आजी क्रांतिकारकांना — चंद्रशेखर आझाद, राजगुरू, पिंगळे, जयप्रकाश नारायण, सुभाषचंद्र बोस, सरदार अजितसिंग, अच्युतराव पटवर्धन, अरुणा असफअली, साने गुरुजी वगैरे देशसेवकांना — या लोकांच्या गुप्त सहानुभूतीवरच कित्येक महिने, वर्षेंहि, जगतां आलें, गुप्तपणानें देशत्याग करतां आला, तुरुंगांतूनहि गुप्तपणानें सुटका करून घेतां आली! हजार रुपा

यांच्या बक्षिसांच्या सरकारी आमिषास लोक बळी पडले नाहींत! ज्यांना ज्यांना गुप्त रीतीनें देशभर फिरणाऱ्या या देशभक्तांचा ठावठिकाणा माहीत होता त्यांनीं विश्वासघात व राजद्रोह केला नाहीं! हें कशाचें फळ आहे? लोकांच्या वाढत्या मनोधैर्याचेंच हें फळ आहे. हें मनोधैर्य कशानें वाढेल? देशभक्तांच्या निरुपम त्यागानें! तुरुंगवास, फांस, वगैरे शिक्षांची भीति न बाळगतां सरकारी जुलमाचा प्रतिकार केल्यानें. हिंसक मार्गहि पत्करून, आगगाड्या पाडून, सरकारी मालमत्तेची जाळपोळ करून, सरकारी अधिकाऱ्यांवर हल्ले चढवून, क्रांतिकारकांनीं हें मनोधैर्य कायम राखलें, वाढवलें, देशाला अुपकारक केलें. आणि त्याच प्रमाणांत अुलट पक्षाचें, सरकारचें, मनोधैर्य बरबाद केलें. या आतांच्या, किंवा १९०५ ते २५ पर्यंतच्या, बंगाल व अितर प्रांतांतल्या क्रांतिकारांनीं हें सर्व जाणूनबुजून केलें. ह्या कृत्यांचे झालें तर सुपरिणाम, नाहींतर तात्पुरते दुष्परिणाम होतील, हें या सर्व देशभक्तांना पूर्ण माहीत होतें. पण काळच असा होता की, असली हिंसक प्राणघातकी विनाशक कृत्यें हें मनोधैर्य टिकवण्यासाठीं करणें भागच होतें.

असल्या कृत्यांत कांहीं निरपराधी माणसें मरतात हें खरें. पण असें व्हावयाचेंच. अितकी निरपराधी माणसांचीहि किंमत क्रांतीसाठीं दिलीच पाहिजे. देशासाठीं व्यक्तिविषयक नुकसान हें होणारच. लढाअींत नाहीं कां कांहीं निरपराधी माणसें मरत? वाळल्याबरोबर कांहीं ओलेंहि जळतेंच. त्याला अिलाज नाही. म्हणून अितकी स्वतःच्या प्राणांची, सर्वस्वाची, क्वचित् संस्थांची, क्वचित् निरपराध माणसांची, हानि झाली तरी परवडली. पण देशाचें लोकांचें मनोधैर्य, स्वातंत्र्यप्रेम, हें चढतें, वाढतें, अुसळतें ठेवलेंच पाहिजे. सर्वच देशांतल्या सर्वच जाणत्या क्रांतिकारकांनीं हाच मार्ग चोखाळला आहे. यांत त्यांचे ऐतिहासिक सिद्धांतांचें, मानसशास्त्राचें, ज्ञानच व्यक्त होतें. सशस्त्र क्रांति करावयाची ठरवल्यावर मग क्रांतिपूर्व हे असले वधाचे प्रकार घडवून आणल्याशिवाय ("न निश्चितार्थाद्विरमन्ति धीराः") ह्या धीर गंभीर वीर पुरुषांना विराम कुठला? अेक पिढीच काय, पण कैक पिढ्यांचीं स्वातंत्र्ययुद्धें असल्या वीरांच्या या मनोवृत्तीनेंच चालतात, आणि क्रांत्या यशस्वी होतात, असा अितिहासाचा निष्कर्ष आहे.

### अहिंसेचा व्यवहार प्रतिपक्षसापेक्ष असतो

प्रतिहिंसा म्हणजे व्यवहार्य अहिंसा होय हें जें वर म्हटलें त्याला महात्मा गांधींनीं मुरड घातली असें सकृद्दर्शनी वाटतें. पण खुद्द महात्माजींनाहि संपूर्ण अहिंसाव्रताचें पालन करणें पुष्कळ वेळां अशक्य झाल्याचें त्यांनीं स्वतःच कबूल केलें होतें, हेंहि विसरतां कामा नये. त्यांतहि ज्याच्याविरुद्ध अहिंसा कांहीं अंशांनीं यशस्वी झाली त्यांच्या संस्कृतीचाहि विचार करणें अगत्याचें ठरतें. दक्षिण आफ्रिकेंतलें जनरल स्मट्स्‌चें सरकार, किंवा अिंग्लंडचें मजूर सरकार, हें संस्कृतीच्या कांहीं तरी अुच्च पातळीवरचे तत्त्वनिष्ठ, न्यायप्रिय, समाजाचे अग्रणी होते व आहेत. आणि त्यांच्या या सुसंस्कृततेलाच महात्माजींच्या अहिंसक आत्मक्लेशी चळवळीनें द्रव आला, हें मुख्यतः ध्यानांत ठेवलें पाहिजे. अुलट, पिसाळलेल्या माकडांना ठार मारा, त्यांत हिंसा नाहीं, हेंहि महात्माजींनींच म्हटलें आहे. आणि मनुष्यसमाजांतहि पिसाळलेल्या लोकांविरुद्ध – अुदाहरणार्थ पाकिस्तानांतले अत्याचारी – महात्माजींची अहिंसा निरुपयोगी ठरली, हेंहि आपणच पाहिलें आहे. ‘अहिंसा परमो धर्मः’ हें तत्त्व अुच्चतम आहे हें कबूल. पण त्याचा व्यवहार प्रतिपक्षसापेक्ष असतो. आणि म्हणूनच अहिंसा ही अंशतःच, आणि तीहि कांहीं वेळां, आणि कांहीं सुसंस्कृत प्रतिपक्षाविरुद्धच, अुपयुक्त ठरते. हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांत महात्माजींचे अनुयायी असलेल्या मंत्र्यांनासुद्धां अहिंसा पाळणें अशक्य झालें होतें. आणि कम्युनिस्टांसारख्यांच्या विध्वंसक चळवळीविरुद्धहि अवश्य तितकी अल्प हिंसा करणें आज आपल्या स्वतंत्र भारतांतल्या अहिंसाव्रती मंत्र्यांनाहि करणें भागच पडत आहे. समाजसंरक्षणार्थ अवश्य तेथें, आणि अवश्य तितकीच, प्रतिहिंसा करणें हें कोणत्याहि सुसंस्कृत राज्यकर्त्यांना टाळतां येत नाहीं. आणि प्रतिक्रियार्थ, सर्व सामोपचाराचे अुपाय थकल्यावर, सशस्त्र युद्धापासून तो अल्पस्वल्प हिंसेपर्यंतचे सर्व प्रकार या ‘धर्म्ययुद्धां’त येतात. लक्षावधि मनुष्यप्राण्यांची हिंसा ज्यांत होते असें युद्ध हें सुद्धां जर ‘धर्म्य’युद्ध ठरतें तर समाजरक्षणार्थ, अवश्य तेव्हां व अवश्य तितकी हिंसा, अहिंसेचे सर्व मार्ग निरुपयोगी ठरल्यावर, करणें ही प्रतिहिंसा म्हणजे अहिंसाच होय.

राज्यकर्त्यांना तर कांहीं प्रसंगीं, अन्यायी प्रतिपक्षाकडून हिंसात्मक

समाजघातक कृत्यें होण्यापूर्वी, केवळ त्यांच्या हेतूसाठींच, प्रतिहिंसा म्हणजे अटक करणें अगत्याचें असतें. प्रतिपक्षी हिंसा करील तेव्हां तर प्रतिहिंसा अवश्यच असते. पण त्याची हिंसा टाळण्यासाठीं त्याला बंदिवासांत टाकणें ही हिंसा असली तरीहि ती अपरिहार्यच असते. आणि ह्यांत त्याला दहशत दरारा बसवणें हाच हेतु असतो. राज्यरक्षणार्थ अेवढाले प्रचंड खर्च करून मोठमोठालीं सैन्यें ठेवणें हें जसें प्रतिपक्षाला ठेचण्याचें, तसेंच त्याला दरारा बसवण्याचेंहि, साधन असतें. आणि आम्ही महात्माजींचे अनुयायी असलों तरी सैन्य ठेवीतच आहोंत. अहिंसेचेंच रक्षण त्यामुळें होत आहे, असो. हा हिंसा-अहिंसेचा वाद सोडून आपण मूळ विषयाकडे वळूं.

### मदनलाल धिंग्रा

या निष्कर्षाप्रमाणें अिंग्रजी अमलांतल्या जुलमांमुळें जीं मनें अगोदरच पेटलीं होतीं तीं बाबांना झालेल्या राक्षसी शिक्षेच्या निमित्तामुळें अधिकच भडकली. औरंगाबादेस हुतात्मा कान्हेरे हाहि त्यामुळेंच तळमळत होता. आणि त्याची व गणू वैद्याची जेव्हां प्रथम भेट झाली तेव्हां तुम्ही बाबांच्या अमानुष शिक्षेबद्दल अधिकाऱ्यांचा वध करून सूड कां घेत नाहीं म्हणून त्यानें गणूस विचारलेंहि होतें. आणि कोणी वध करण्यास तयार नसतील तर मी स्वतः त्या अधिकाऱ्याचा खून करण्यास तयार आहे, असें त्यानें तेव्हांच गणूस सांगितलेंहि होतें. अशीच सूडाची मनोवृत्ति, पृथ्वीच्या दुसऱ्या टोंकाकडे, ६००० मैलांवर विलायतेंत असलेल्या हुतात्मा मदनलाल धिंग्रा याला चैन पडूं देत नव्हती. त्यानें बाबांसुद्धां हिंदी देशभक्तांवर झालेल्या या अघोर अन्यायाबद्दल सूड अुगवण्याचें ठरवलें, आणि तात्या सावरकरांजवळ ती गोष्ट काढली. करंदीकरांच्या "सावरकर-चरित्रांत" (पृ. २५३-३००) या धिंग्रा-प्रकरणाचा विस्तारशः अुल्लेख आला आहे. वाचकांना तेथें तो पूर्ण साद्यंत वाचावयास मिळेल. म्हणून येथें त्याचें विस्तृत वर्णन मी करीत नाहीं. पण पृथ्वीच्या दोन टोंकांवर असलेल्या या दोन देशभक्तांच्या, हुतात्म्यांच्या, अंतःकरणांत सूडाची अेकच वीरवृत्ति कसें थैमान घालीत होती, हें दृश्य पाहणें खरोखरच हृदयंगम व रोमांचकारी आहे. या दोघांनीं जे अिंग्रज अधिकाऱ्यांचे वध केले त्यांतलें साम्य पुढें ज्याक्सन-प्रकरणीं येअीलच. पण धिंग्राचें अंतःकरण कसें जळत होतें हें त्यानें खिशांत ठेवलेल्या, पण कोर्टानें दडवलेल्या,

त्यांच्या वक्तव्यावरून कळून येतें. पोलीस व अितर अधिकाऱ्यांनीं जरी तें दडवलें, तरी सावरकरांनीं तें साऱ्या जगांतल्या मुख्य मुख्य वृत्तपत्रांतून, धिंग्रा फांशी जाण्यापूर्वीच, प्रसिद्ध केलें. हुतात्मा कान्हेऱ्यांच्या खिशांतलें वक्तव्य "खुनास खून" असें होतें. तेंहि 'न्यायालय' म्हणून मिरविणाऱ्या हायकोर्टात आलें नाहीं. पण या दोघां हुतात्म्यांच्या विचारसरणींत वृत्ती-प्रमाणेंच साम्य असणार. धिंग्रांनीं आपल्या वक्तव्यांत म्हटलें होतें कीं, "परवा अेका अिंग्रजाचें (सर वुअिल्यम् कर्झन वायलींचें) रक्त सांडण्याचा मीं प्रयत्न केला ही गोष्ट मला मान्य आहे. देशाभिमानी हिंदी तरुणांना निर्दयपणें फांसावर लटकविण्यांत आलें, व निर्वासित करण्यांत आलें, याबद्दलचा अल्पसा सूड म्हणून मीं हें कृत्य केलें ... परकी शस्त्रास्त्रांच्या साहाय्यानें दास्यांत जखडून टाकलेलें राष्ट्र हें निरंतरच युद्धयमान राष्ट्र असतें. निःशस्त्र जातीला अुघड अुघड रणांगणांत अुतरून सामना देणें अशक्य होत असल्यामुळें, मीं दबा धरून हल्ला चढवला. मला तोफा वापरूं देण्यांत आल्या नाहींत म्हणून मीं माझें पिस्तुल काढलें व झाडलें ... हिंदु म्हणून माझी अशी भावना आहे कीं, माझ्या देशाचा अप-मान हा परमेश्वराचाच अपमान होय. ज्याची प्रकृति धडधाकट नाहीं, आणि ज्याची बुद्धीहि सामान्यच आहे, अशा मजसारख्या भारतपुत्राजवळ मायदेशाप्रीत्यर्थ देतां येअील असें कांहीं असलेंच तर तें स्वतःचें रक्तच होय. तें रक्त मीं मातृभूमीच्या वेदीवर अर्पिलें आहे," अित्यादि. धिंग्राला पुढें फांशीची शिक्षा झाली; आणि १७–८–१९०९ रोजीं हा हुतात्मा, अभि-नव भारताचा अेक देदीप्यमान हिरा, शांत चित्तानें फांसावर चढला!

धिंग्राच्या या रोमहर्षक प्रकरणानंतर आपण अखेरच्या ज्याक्सनच्या वधाकडे वळूं. या ज्याक्सन-वधानें अभिनव भारताचा अंतच झाला असल्यानें तें प्रकरण किंचित् विस्तारानें देत आहे!

## प्रकरण नववें

# ज्याक्सन-वध

धिंग्रानें ज्याप्रमाणें इंग्लंडमध्यें कर्झन वायलीचा वध केला त्याचप्रमाणें, ६००० मैलांवर इकडे नाशकास, अनंत लक्ष्मण कान्हेरे यानें ज्याक्सन कलेक्टरचा वध केला. त्याची हकीकत थोडक्यांत देण्यापूर्वींच एक गोष्ट प्रामुख्यानें सांगितली पाहिजे. आणि ती म्हणजे या (स्पेशल ट्रायब्यूनल) विशिष्ट न्यायासनासमोर चाललेल्या ज्याक्सन-वधाच्या खटल्यांत बऱ्याच सुशिक्षित आरोपी देशभक्तांनीं जी माहिती, पोलिसांच्या भयंकर छळामुळें, सांगितली ती सर्वस्वीं खरी व पूर्ण नाहीं. सर्व आरोपी शिकलेले असल्यानें, त्यांनीं आपल्या साथीदारांस शक्य तितका बचावण्याचा यत्न केला; आणि प्रसंगापुरतींच, अवश्य तेवढीच, आणि कित्येक वेळां तीहि मुरड घालून ठरवलेली, हकीकत कबुलिजबाबांत सांगितली. त्यामुळें आम्ही गमावल्यापेक्षां वांचवलेंच पुष्कळ. आरोपींनींच हें केलें असें नाहीं, तर "सरकारतर्फेचे साक्षीदार आणि माफी दिलेले साक्षीदार (approvers) यांनीहि सर्व अंतःकरण खुलें करून सांगितलें नाहीं," असें खुद्द स्पेशल ट्रायब्यूनलचे

न्यायाधीशच आपल्या निकालपत्रकांत म्हणतात; आणि तेंच बरोबर आहे. बॉंब-प्रकरणांत आम्हीं, अिन्स्पेक्टर सदावर्ते यांना विश्वासांत घेअून, तें सबंध बॉंब-प्रकरण कसें दडवून ठेवलें, यांची हकीकत दिलीच आहे. तशाच अनेक कारवाया, हिकमती, जरी आमच्याअितक्या मोठ्या प्रमाणावर, या वधाच्या निराळ्या खटल्यांत अितरांनीं केल्या नाहींत, तरी शक्य तेवढें आपलें, व आपल्या कटांतल्या साथीदारांचें, नुकसान होअूं नये म्हणून सर्वांनींच मनोभावें प्रयत्न केले. म्हणून खुद्द न्यायदरबारांत ज्या ज्या गोष्टी अुघडकीस आल्या त्या सर्वस्वीं विश्वसनीय व खऱ्या आहेत असा कोणींहि गैरसमज करून घेअूं नये.

पण याबरोबरच खरी हकीकत मिळवण्याच्या बाबतींत बरेचसे देशभक्त दिवंगत झाले ही दुसरी अडचण अुपस्थित झाली आहे. या कटांतील मुख्य ३ देशभक्त – अनंतराव कान्हेरे, कृष्णराव कर्वे आणि विनायकराव देशपांडे – हे ज्याक्सन-वधासाठीं फांशी गेले. जन्मठेप शिक्षा झालेल्या आरोपितांपैकीं शंकर रामचंद्र सोमण येरवड्यासच ११ डिसेंबर १९११ मध्यें वारले. ज्याक्सन-वधाबद्दल जन्मठेप शिक्षा झाल्यावर, सुटण्याच्या आशेनें, पुढें आमच्याविरुद्ध माफीचा साक्षीदार झालेला गणू वैद्य हाहि मरून गेला. आणि माझ्या दुर्दैवाची कहाणी अशी कीं, पुढें पश्चात्ताप होअून, केवळ लो. टिळकांविरुद्ध चिरोल-केसमध्यें यानें चिरोलला अनुकूल साक्ष दिली नाहीं, या अेकुलत्या अेकच सत्कार्यासाठीं, आमच्या घरादारावरून नांगर फिरवणारा हा सरकारी साक्षीदार जो मला चिकटला तो शेवटीं, प्लेगनें तडकाफडकी पुण्यास मेल्यावर, गांवांत त्याला अुचलावयाला पुरेशीं माणसें नव्हतीं म्हणून, माझ्याच खांद्यावर गेला!! माझ्या आणि टिळकांच्या दैवाच्या या गफलतींत गणू मात्र असा माझ्यावर मात करून गेला ही गोष्ट खरी! असो. त्या ज्याक्सन-वधाच्या मुख्य आरोपितांपैकीं फक्त वामनराव नारायण जोशी अेवढेच शिल्लक आहेत. त्यांना मी त्यावेळची सर्व हकीकत कळवा म्हणून पत्रें लिहिलीं. पण अद्याप त्यांच्याकडून मला कांहींच समजलें नाहीं. त्यामुळें मला जी माहिती मिळाली त्यावरूनच मी थोडक्यांत त्या घडामोडींची माहिती येथें देत आहें.

## कर्व्यांची गुप्त शाखा

अभिनव भारताच्या मुख्य शाखेपासून कृष्णाजी गोपाळ कर्वे हे मतभेदामुळें फुटून निघाल्यावर त्यांनीं आपली अेक स्वतंत्र गुप्त संस्था काढली. प्रथमतः ते 'मित्र-समाज' या संस्थेचे सभासद होते. हा 'मित्र-समाज' ही तत्कालीन हायस्कुलांतील २०० विद्यार्थ्यांची अभिनव भारताची अेक शाखा होती. कर्वे अुच्च शिक्षणासाठीं मुंबअीस अेल्फिन्स्टन कॉलेजांत गेले होते. हे अतिशय हुशार, अुत्साही, धाडसी, त्यागी व कळकळीचे कार्यकर्ते होते. त्यांचे सहकारी रा. गोपाळराव धारप लिहितात कीं, "विद्यार्थी असतांना त्यांनीं नाशिकच्या ग्रंथालयांतील अितिहास व राजकारणावरचीं सर्व पुस्तकें वाचून काढलीं होतीं. शिवाय मित्र-समाजाचे त्यांचे सहकारी जे दांडपट्टा, नेमबाजी, तरवारीचे हात वगैरे शिक्षण नाशकास डोंगरअुताऱ्यावर घेत होते त्यांत त्यांनीहि हें शारीरिक व लष्करी बाण्याचें शिक्षण घेतलें होतें." "राज्यक्रांतीचें काम गुप्तपणें झालें पाहिजे ... आणि अशा गुप्त कार्याशीं सार्वजनिक प्रसिद्ध झालेल्या लोकांचा कोणत्याहि प्रकारें कांहींहि संबंध टेवावयाचा नाहीं, ही त्यांच्या गुप्त संघटनेची पहिली अट होती." कर्व्यांच्या या संस्थेंत रा. विनायक नारायण देशपांडे, वामन नारायण जोशी, शंकर रामचंद्र सोमण, हे प्रारंभीं सभासद होते. त्यानंतर आमच्या अभिनव भारतापैकीं दामोदर महादेव चंद्रात्रे, गायधनी, व विष्णु गणेश केळकरशास्त्री हेहि त्यांनीं त्यांत ओढले. शंकरराव सोमणांनीं गोपाळराव धारपांना त्या संस्थेच्या दुसऱ्या गटांत शपथबद्ध करून घेतलें. आणि धारपांनीं नंतर गणू वैद्य, पुरुषोत्तम लक्ष्मण दांडेकर, सदाशिव श्रीधर दांडेकर, रामचंद्र आबाजी काथे, रघुनाथ चिंतामण अंबडेकर, विनायक वासुदेव मनोहर, बा. ज. मराठे, ना. कृ. जोशी यांची अेक गुप्त संस्था स्थापन केली. सर्वांचे अुद्देश अभिनव भारताप्रमाणेंच होते. पण या धारप गटापैकीं गणू वैद्य हा कर्वे गटांत फार खोल शिरला; आणि शस्त्रास्त्रें, पैसे वगैरेचा पुढें कोठीवालाहि तोच होता. कर्व्यांच्या या गटांनीं आमच्याकडून व अितरांकडून पिस्तुलें जमवलीं होतीं, व नेमबाजीचें शिक्षणहि ते घेत. बॉंबची कृतीहि त्यांपैकीं कांहीं शिकले होते हें मागें आलेंच आहे. या गुप्त संस्थांतून साप्ताहिक बैठकी किंवा वादविवाद, विवेचन, पठन, अभ्यास वगैरे कांहीं होत नसे. त्यामुळें

अडीअडचणींतून कसें पार पडावें, अितर देशांचे क्रांतिकारक त्या प्रसंगीं कसे वागत, या ज्ञानाच्या, बुद्धीच्या, संस्कारांत ही मंडळी अगदीं कोरी करकरीत व नवखीं होतीं. आणि ही या गटांनीं मनाच्या बुद्धीच्या तयारीची, ज्ञानाची, केलेली हेळसांड हीच त्यांना, व त्यांच्यामुळें शेंकडों लोकांना, फार भोंवली. त्याबद्दलचें विवेचन पुढें ओघानें येअीलच. असो.

### अनंतराव कान्हेरे अभिनव भारताचे सभासद

आमच्या अभिनव भारतापैकीं येवल्याचे माजी सावकार व वतनदार देशमुख, विनायक सदाशिव बर्वे, यांना मीं शपथ दिली होती. त्यांनीं येवल्यास जी शाखा काढली तिच्यांत काशिनाथ दाजी टोणपे हे अेक होते. यांपैकीं बर्वे व टोणपे यांचा सराफीचा व्यवहार असे. या व्यवहारात औरंगाबादचा गंगाराम रूपचंद याचें कांहीं देणेंघेणें टोणप्यांकडे असे, आणि त्यामुळें तो व त्याच्याबरोबर अेकदां अनंत कान्हेरे हाहि येवल्यास आला होता. येवल्यास टोणप्यांनीं अनंतरावाला व गंगारामाला अभिनव भारताचे शपथबद्ध सभासद करून घेतले. बर्वे हे गणूचे वडील बंधु शंकरराव वैद्य यांचे मेहुणे. म्हणून धारप गटांपैकीं अंबडेकरानें हत्यारांसाठीं चोरलेली अेक सरी शंकररावांनीं, नाशकास संशय येअू नये म्हणून, येवल्यास आणून विकली. गणू वैद्यहि येवल्यास या नात्यामुळें आला होता; आणि येवल्याहून औरंगाबादेस गंगारामकडे, धारपांचें पत्र घेअून, शस्त्रास्त्रें विकत मिळतात कां हें पाहण्यास गेला. तेथें शस्त्रास्त्रांच्या अैवजीं अनंता कान्हेरे याची व त्याची ओळख गंगारामामार्फत झाली. अनंता गंगारामाच्याच घरीं राहत असे. त्यांची अत्यंत दाट मैत्री होती. गणूला अनंतानें टोमणा मारला कीं, "नाशिकला येवढा जुलूम चालला असतां तुम्ही गुप्त संस्थेचे शस्त्रधारी लोक अधिकाऱ्यांचे वध करून त्याचा सूड, वचपा, कां घेत नाहीं?" "आमचे लोक तयार नाहींत" अशी गणूनें कबुली दिली. अनंता म्हणाला, "तुम्ही तयार नसल्यास मी त्यांचा वध करण्यास तयार आहे." औरंगाबादेसहि असेंच अेक गुप्त संस्थेचें जाळें गोपाळराव धारपांनीं विणलें होतें. त्यांतच अनंताचे सहाध्यायी व स्नेही काशिनाथ हरी अंकुशकर व दत्तात्रय पांडुरंग जोशी आणि अितर सभासद होते.

## अनंताची वधाची तयारी व गणूची भंबेरी

गणूनें ही अनंताची वध करण्याची अिच्छा व सिद्धता कर्व्यांच्या गटापैकीं देशपांडे, सोमण व जोशी यांना कळवली. कर्वे तेव्हां तेथें नव्हते. या तिघांनीं अनंताला नाशकास बोलावून त्याला छेडण्याचें ठरवलें. अनंता आल्यावर त्यानें आपली तयारी दर्शवली, आणि जोशांच्या बरोबर ज्याक्सनच्या कचेरींत जाअून, त्याचा चेहरा ध्यानांत ठेवून, कोठून त्याला मारतां येअील हेंहि पाहून ठेवलें. पण "जोंवरी न पाहिलें पंचानना। तोंवरी जंबुक करी गर्जना" अशी गणूची स्थिति येथपासूनच होअूं लागली. त्याला हें वधाचें कृत्य नकोच होतें. तो स्वभावतःच भेकड होता. गुप्त संस्थेंतल्या शूर वीरांचीं पिसें लावलेला तो अेक डोमकावळा होता. त्यानें अनंताला स्वच्छच सांगितलें कीं, तूं या वधाच्या भानगडींत पडूं नको. कारण यांत जर मी सांपडलो, "आणि पोलिसांनीं मला (गणूला स्वतःला) मारलें तर मी सर्व सांगून देअीन" (अनंतराव कान्हेऱ्याचा अखेरचा जबाब). या भेकड वृत्तीमुळें, हा वधाचा बेत टाळण्यासाठीं त्यानें अनंताला २–३ अटी या लोकांच्यापुढें मांड असें बजावलें. त्या म्हणजे, "२ पिस्तुलें मला हवींत व नेम-बाजीचें शिक्षण दिलें पाहिजे, आणि कोणी तरी तुमच्यापैकीं जोडीदार पाहिजे." गणूची अशी कल्पना होती कीं, यांपैकी कोणीहि जोडीदार अनंताला मिळणार नाहीं आणि हा बेत फिसकटेल. आणि या अटींची मात्रा बरोबर लागूं पडली. त्यानंतर बऱ्याच वाटाघाटी झाल्या, आणि "हा बेत शेवटीं त्या गटाचे प्रमुख अण्णा अूर्फ कृष्णराव कर्वे यांच्या संमतीशिवाय पार पाडावयाचा नाहीं," असा कोलदांडा गणूनें घातला. येथपर्यंत कर्व्यांना यांपैकीं कांहींच माहीत नव्हतें, आणि त्यांना न कळतच अुतावळेपणानें या सर्व कारवाया होत होत्या. शेवटीं मुद्दाम कर्व्यांना मुंबअी-हून बोलवून आणलें, आणि त्यांच्यापुढें ही सर्व हकीकत मांडली. तेव्हां कर्व्यांनीं "तुम्ही जर कोणी अनंताला जोडीदार होत नाहीं तर त्याचा जीव कां धोक्यांत घालतां?" असें या आपल्या साथीदारांना शरमावून तो वधाचा बेत तात्पुरता मोडून काढला. गणूला आपण जिंकली याचा आनंद झाला व त्याचा जीव भांड्यांत पडला, आणि अनंता परत औरंगाबादेस गेला. जाण्यापूर्वी त्याची कर्व्यांच्यावर फार श्रद्धा जडली

होती, आणि मरणापूर्वी आपले फोटो असावेत म्हणून त्यानें तेहि काढून घेतले होते.

### अनंतरावची तळमळ

पण गणूच्या नादीं लागून आपण आपल्या ध्येयापासून च्युत झालों असें अनंताला वाटूं लागलें. त्याला चैन पडेना. मदनलाल धिंग्रा हा त्याचा आदर्श वीर होता. तेव्हां कांहीं तरी धिंग्रासारखें अलौकिक अिंग्रजाच्या वधाचें कार्य केलें म्हणजे आपण कृतकृत्य होअूं अशी त्याची कल्पना होती. त्यामुळें त्यानें रा. वामनराव जोशांना कळवलें कीं, "जोडीदारावांचून मी अेकटाच वध करण्यास तयार आहें." हें पत्र मिळतांच या त्रयीनें पुन्हा, पण या खेपेस भेकड गणूला न कळूं देतां, या वधाचा व्यूह रचला. या वेळेस मात्र कर्वे तेथें नाशकासच होते; आणि त्यांच्या संमतीनेंच देशपांडे हे अनंतास आणण्यास औरंगाबादेस गेले आणि अनंता २१ डिसेंबर १९०९ ला संध्याकाळींच नाशकास आला.

अिकडे गणूच्या मनोराज्यांत जे बेत चालले होते त्यांपैकीं अेक म्हणजे या औरंगाबादच्या साथीदारांना पेणच्या बॉंब कारखान्यांत पिक्रिक ॲसिड तयार करण्याचें शिकवावें हा. त्यासाठीं त्यानें अंकुशकरला "अेकदां केव्हां तरी नाशकास ये म्हणजे तुला पैसे देअुन तेथें रवाना करीन," असें निमंत्रण देअून ठेवलें होतें. अनेक कारणानें अंकुशकर अगोदर जाअूं शकला नव्हता. अनंता आपल्या भावी ध्येयसिद्धीच्या नादांत गर्क होता. त्यानें आपला हा वधाचा बेत या अंकुशकर व द. पां. जोशी या मित्रांना अगाअू सांगूनहि टाकला होता! देशपांडे जेव्हां त्याला न्यावयास आले तेव्हां हे दोघे स्नेहीहि त्याच्याच बरोबर यावयास निघाले. अनंता अितक्यांतच वध करील अशी मात्र या दोघांचीहि कल्पना नव्हती. जोशी हा किर्लोस्कर कंपनीचीं नाटकें पाहण्यास, आणि अंकुशकर तीं पाहून तेथून पेणला जाण्यास. म्हणून आले होते, असें दिसतें. या दोघांनीं नाशिक पाहिलें नसल्यानें, ते येणार हें गणूला अगाअू कळविल्यानें, त्यांना नेण्यास गणू स्टेशनवर गेला होता. पण अनंताला गणूस टाळावयाचें होतें. म्हणून अनंता दूर मागें गाडींत बसला होता; आणि स्टेशनवरून गणू, जोशी व अंकुशकर निघून गेल्यावरच अनंता नाशकास आला.

### कर्व्यांची वधाची योजना

अनंतास द्यावयास दोन ब्रांअुनिंगचीं भरलेलीं पिस्तुलें कर्व्यांनीं गणूकडून मागवलीं; पण मुबअीस पाटवण्याच्या अुद्देशानें तीं मागवलीं आहेत, असें गणूस भासवलें. तसेंच अनंताबरोबर आपणच सशस्त्र जोडीदार राहावयाचें असेंहि त्यांनीं, पण अनताला न कळवतां योजलें होतें. आणि तेवढ्यासाठीं सोमणांना संध्याकाळीं गणूकडे पाठवून तिसरेंहि पिस्तुल त्यांनीं गणूकडून, पण गणूला खुनाच्या बेताचा कसलाहि सुगावा लागूं न देतां, आणवलें. वध झाल्यावर मन डळमळूं लागलें तर, आत्महत्या करण्यासाठीं म्हणून, अनंताजवळ कर्व्यांनीं सोमलाची पुडीहि सोमणांच्या मार्फत दिली होती. तसेंच जरूर तर दुसऱ्या पिस्तुलानें त्यानेंहि आत्महत्या करावी, असें अनंताला देशपांड्यांच्या मार्फत सांगून ठेवलें होतें. " वध कां केला " हें, – अनंता लहान असल्यानें – सोळाच वर्षांचा तो होता – त्याला नीट कोर्टापुढें किंवा म्याजिस्ट्रेटपुढें सांगतां येणार नाहीं म्हणून " खुनास खून " या मथळ्याचें अेक पत्रकहि अनतास कर्व्यांनीं लिहून पाठवलें होतें. ही सर्व योजना अत्यंत दूरदृष्टीनें व पूर्ण निर्दोष अशी रचली होती. आणि ती त्यांनीं अितकी कसोशीनें पाळली होती कीं, कर्वे यांत आहेत हें अनंतालाहि, तो नाटकगृहांत वध करण्यास जाअीपर्यंत, कळलें नव्हतें. ते त्याच्या दृष्टीसहि तोंवर पडले नव्हते. शिवाय आपलें खरें नांव-गांव न सांगतां पुरभय्याचें, रामप्रसाद तिवारीसारखें, खोटें नांव व यू. पी.मधलें काशीसारखें गांवाचें नांव सांग अशीहि सक्त ताकीद दिली होती.

दहशतवादाच्या तत्त्वाप्रमाणें कोणत्या अिंग्रजी अधिकाऱ्याचा वध करावा याबद्दल कर्व्यांनीं, ज. डावरच्या वधाचा यत्न फसल्यावर ज्याक्सनच वधार्ह टरवला. स्वतः ज्याक्सन हा मोठा संस्कृतज्ज्ञ व विद्वान् होता आणि स्वभावानेंहि नरम होता. तो ज्या राज्यपद्धतीच्या चौकटींत होता ती पद्धतच अशी होती कीं, स्वतःची अिच्छा नसली तरी, वरच्या हुकुमाप्रमाणें त्याला काम करणें भागच होतें. पण मनानें तो बरा होता. दारूबंदीसारख्या निष्पाप चळवळीला तो अनुकूलहि होता; आणि तेवढ्यासाठीं त्याला सरकारकडून टंबीहि मिळाली होती. पण सरकारी धोरणाप्रमाणें त्यालाच काय पण प्रत्येक जिल्ह्यांतल्या अिंग्रज व देशी अधि-

काऱ्यांना वागणें भाग होतें. नाशकास अिंग्रजांविरुद्ध अभिनव भारतानें प्रचंड क्रांतिकारक चळवळ चालविली होती. बंगालमध्यें १९०८ मध्यें, बाँबचा अुपयोग करून, अिंग्रजी अधिकाऱ्यांच्या वधांचे प्रयत्न होअूं लागल्यानें, महाराष्ट्रांत अिंग्रज सरकारनें ही राजद्रोही चळवळ ठेंचून टाकण्याचें ठरविलें; आणि त्याप्रमाणें टिळक, परांजपे, सावरकर वगैरे राजद्रोही मंडळीस तुरुंगांतहि कोंडलें. या वरिष्ठ सरकारच्या धोरणाचा ज्याक्सन हा बंदा गुलाम होता. त्या धोरणाप्रमाणें त्यानें सभाबंदीचे हुकूम, बाबा सावरकरांना पकडणें व त्यांच्यावर खटला भरणें, आणि बाबासाहेब खरे वकिलांचा जामीन घेणें व मोकासा जप्त करणें, हीं जुलमीं कृत्यें केलीं होतीं. अेका गाडिवानाला जिवें मारल्याबद्दल वुअिल्यम् या अिंजिनिअरला त्यानें, पुराव्याच्या अभावीं, अजिबात सोडून दिलें होतें. हें त्याचें वर्तन पक्षपातीपणाचें दिसण्यासारखें खासच होतें. पण या बाबतींत तो वरिष्ठ सरकारची आज्ञाच मानीत होता. आणि त्याच्या या कृत्याकडे या दृष्टीनें पाहिलें तर तो विशेष जुलमी होता असें लोकहि मानीत नसत. पण कर्वे गटाची समजूत, वरील कारणांमुळें, निराळी झाली होती आणि म्हणून त्यांनीं तोच वधार्ह ठरवला. या बाबतींत नंतर अनंताचा व त्यांचा मतभेद झाला, असें अनंताच्या अुद्गारांवरून म्हणावें लागतें. "अेका चांगल्या माणसास मारलें याबद्दल मला वाअीट वाटतें", "ज्याक्सनसाहेबास मारलें याबद्दल मला पश्चात्ताप वाटतो", असें खुद्द अनंतानेंच आपल्या शेवटच्या १–२–१० च्या जबाबांत म्हटलें आहे. पण कर्व्यांची विद्वत्ता व न्यायबुद्धि यांवर त्याचा पूर्ण भरंवसा होता व म्हणूनच तो ज्याक्सनला मारण्यास कबूल झाला. आणि त्यानें २१–१२–१९०९ या दिवशीं, अेका पानसुपारीच्या समारंभाच्या वेळीं, विजयानंद नाटकगृहांत, ज्याक्सनसाहेबासाठीं मुद्दाम ठरवलेलें 'शारदा' नाटक पाहाण्यास ते आले असतां दाराशींच गोळ्या घालून त्याचा वध केला. आम्हां अभिनव भारताच्या सदस्यांना, किंवा कर्व्यांशीं संलग्न असलेल्या मुंबअी-पुण्याच्या त्यांच्या सभासदांना, हें माहीतहि नव्हतें.

## धिंग्रा व कान्हेरे यांच्यांतलें साम्य

अनंता कान्हेरे व मदनलाल धिंग्रा या अेकमेकांपासून ६००० मैल दूर असलेल्या व परिचितहि नसलेल्या, पण देशस्वातंत्र्याबद्दल रात्रंदिवस

तळमणाऱ्या देशभक्त व त्यागमूर्तींच्या या बाबतींतल्या मनोवृत्तींबद्दल विलक्षण आश्चर्यजनक साम्य दिसून येतें. त्यांच्या सूडबुद्धीबद्दलचें साधर्म्य वर सांगितलेंच आहे. दोघेहि सर्वस्वाची चिता पेटवून तिच्यावर आरूढ होण्यास विचारपूर्वक तयार झाले होते. दोघांनींहि आपल्या राजकीय गुरुजनांची संमति घेतली होती. दोघांनींहि आपल्या मनोधैर्याची व सहनशक्तीची सारखीच परीक्षा दिली होती. विस्तवावर ३०० अंशावर अुकळत असलेल्या ॲसिडाच्या कांचेच्या बरणीची मान धरून, तिनें हात होरपळून भाजून रक्ताळत होते तरी ती अुतरून, मदनलालनें, हूं कीं चूं न करतां, सावरकरांचा प्राण वांचवला होता. अनंतानेंहि अगदीं अशीच पेटलेल्या दिव्याची चिमणी हातांत धरून, हात पोळत भाजत होते तरी, न कुरकुरतां आपल्या मनोधैर्याची परीक्षा दिली होती. वधाच्या अगोदर दोघांनींहि आपलें लक्ष्य नीट हेरून अेकदां त्यावर हल्ला करण्याचा मनसुबाहि रचला होता. प्रयत्न शंभर नंबरी यशस्वी व्हावा म्हणून दोघांनींहि पिस्तुलांची प्रॅक्टिस करून आपली नेमबाजी अचूक ठरवून घेतली होती. मदनलालजींनीं आपला प्रयत्न हुकला तर तो पार पाडण्याकरितां बॅ. ग्यानचंद वर्मा व अिंजिनिअर कोरेगांवकर यांना सशस्त्र तयार ठेवलें होतें. तसेंच अनंताच्या साहाय्यासहि कृष्णाजी गोपाळ कर्वे व विनायक नारायण देशपांडे हे सशस्त्र हजर होते. दोघांनीहि जरूर पडल्यास आत्महत्येची तयारी करून ठेवली होती. दोघांच्या जबान्याहि ठरलेल्या होत्या आणि दोघांनींहि – अेकानें जुलैंत व दुसऱ्यानें डिसेंबरांत (१९०९) – आपापले बळी बिनचूक घेतले.

### हत्यारांचे विषम कायदे

कर्झन वायलीला मारण्याचा कट जसा फार विचारपूर्वक रचण्यांत आला होता तसा मात्र येथें नव्हता. विलायतेंतल्या कटांत सावरकरांचें अंग होतें हें धिंग्रानें कोर्टापुढें जें 'वक्तव्य प्रसिद्ध करण्याचें म्हणून योजलें होतें तें ( Challenge ) खुद्द सावरकरांनीं लिहून दिलें होतें, या अेकाच गोष्टीवरून ठरतें. आणि अिंग्रज सरकारनें जेव्हां तें कोर्टापुढेंहि येअूं न देण्याचें कारस्थान केलें तेव्हां त्याची जी अेक प्रत सावरकरांपाशीं होती तिला बॅ. ग्यानचंद वर्मामार्फत सर्व जगभर प्रसिद्धि देण्याचें प्रतिकारस्थान सावरकरांनींच केलें. ही गोष्टहि सावरकरांच्या पूर्ण सल्लयानेंच हा वध ठरला गेला होता हें

सिद्ध करतें. पण धिंग्रानें या खुनाशीं स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाचाहि संबंध नाहीं असें सांगून आपल्या अितर सहकाऱ्यांस पूर्णपणें सुरक्षित ठेवलें. अनंतानें जरी स्वतः तोच कित्ता गिरविला तरी त्याच्याबरोबर आलेल्या २ मुलांनीं, समयसूचकतेच्या अभावीं, सर्व सहकाऱ्यांचा सर्वस्वीं घात केला. विलायतेंत पिस्तुलें सहज मिळत होतीं, म्हणून धिंग्रांनीं तीं राजरोस विकत घेतलीं होतीं. नेमबाजीहि प्रसिद्ध शाळेंत ते शिकले. ते या गोष्टी अुघडपणें तेथें करूं शकले. त्यामुळें पोलिसांना हत्यारांच्या बाबतींत कांहीं करतां येत नव्हतें. राजकीय कारणासाठीं खून मीं केला हेंहि त्यांनीं अगाअूच मान्य केलें होतें. त्याबद्दलची सर्व जबाबदारी माझी आहे, अितर कोणीहि यांत सहकारी नाहींत, हेंहि त्यांनीं सांगून टाकलें. यामुळें विलायतेंतल्या पोलिसांनीं पुढें फारशी चौकशी केली नाहीं. आणि अेकट्या धिंग्रांच्यावर खटला होअून हें प्रकरण संपलें. येथें मात्र सर्वच अुलट प्रकार झाला; आणि त्यांत सावरकरांसकट कैक लोक सरकारच्या ताब्यांत सांपडले.

### हत्यारांचा कायदा भोंवला

धिंग्रांच्या बाबतींत जी गोष्ट सहज सुलभ होती तीच नेमकी हिंदुस्थानांत नव्हती. ती म्हणजे सुलभ शस्त्रप्राप्ति. धिंग्रांना पिस्तुल सहज विकत घेतां आलें. त्याची नेमबाजीहि राजरोसपणें अुघड अुघड अेका गुरूजवळ शिकतां आली. हिंदुस्थानांत नेमक्या याच गोष्टी हत्यारांच्या कायद्यामुळें दुर्लभ होत्या. म्हणूनच सावरकरांना गुप्तपणें पिस्तुलें अिकडे पाठवावीं लागलीं; आमच्या अभिनव भारताच्या व आमच्याशीं संलग्न असलेल्या सभासदांना तीं गुप्तपणें ठेवावीं लागलीं, व वारंवार गुप्तपणेंच पाठवावीं लागलीं. नेमबाजीहि गुप्तपणेंच करणें भाग पडलें. ही गुप्ततेची आवश्यकताच आम्हांस ज्याक्सन-वधानंतर फार नडली. आणि कटाचा सुगावा लागल्यानंतर, पोलिसांच्या भयंकर छळामुळें, आणि समयसूचकतेच्या अभावीं, बराचसा गोंधळ आणि त्यामुळें बरींच माणसें या गौप्यासाठींच अुघडकीस येअून तुरुंगांत आलीं. विलायतेंत पोस्टाच्या तिकिटांप्रमाणें पिस्तुलें मिळण्याची कायदेशीर सुलभता, व हिंदुस्थानांत, त्याच्या अगदीं अुलट कायद्यामुळें, तीं मिळण्याची आणि मिळाल्यानंतर त्यांच्या रक्षणाची दुष्करता, या गोष्टी धिंग्रा व कान्हेरे यांच्या खटल्यांची व कारवायांची तुलना करतांना

ध्यानांत ठेवणें जरूर आहे. या गोष्टी विलायतेंत कायदेशीर असल्यानें तेथल्या पोलिसांना त्याबद्दल चौकशी करणें जरूरच नव्हतें. हिंदुस्थानांत त्याच गोष्टीला प्रचंड महत्त्व आलें. आणि त्यासाठींच येथल्या हिंदुस्थानच्या पोलिसांनीं हवे ते अत्याचार आरोपितांवर करून त्यांच्याकडून पिस्तुलांच्या ठावठिकाणाबद्दल माहिती मिळवली, आणि तीं पिस्तुलें गुप्तपणें ठेवण्याबद्दल शेंकडों लोकांना छळलें, आणि तुरुंगांत कैक वर्षें डांबून ठेवलें. हिंदुस्थानांतल्या शस्त्रास्त्रांच्या कायद्यामुळें, आमच्याप्रमाणें सर्वच प्रांतांत, हजारों क्रांतिकारक तुरुंगांत पिचत पडले.

### ज्याक्सन-वधाचा गौप्यस्फोट

ही शस्त्रास्त्रांची दुर्मिळता आणि त्यांच्याबद्दलची गुप्ततेची अवश्यकता, या गोष्टी ध्यानांत धरून, मग हें ज्याक्सन-प्रकरण कसें उघडकीस आलें हें ध्यानांत येणें सुलभ होईल. ज्याक्सन-वधाची हकीकत सांगतांना वाचकांच्या स्मरणांत असेलच कीं, अनंतराव कान्हेऱ्यांच्याबरोबर, गणूनें निराळ्याच कारणाकरितां बोलावलीं होतीं म्हणून, दत्तात्रय पांडुरंग जोशी व काशिनाथ हरी अंकुशकर हीं दोन तरुण मुलें नाशकास औरंगाबादेहून प्रथमच आलीं होतीं. वास्तविक अनंतानें त्यांना बरोबर आणणें धोक्याचें होतें. आणि सर्व ओंफस् झाल्यावर त्यालाहि ती आपली चूक कळून आली, हें त्याच्या जबानीवरूनच दिसतें. पण आपला कट फुटणार आहे ही त्याला तेव्हां कल्पना तरी कशी येणार? म्हणून त्यांना त्यानें येऊं दिलें असावें. असो. गणू अतिशय भित्रा आणि वधाच्या विरुद्ध होता, म्हणून त्याला अनंता त्या रात्रींच वध करणार आहे ही बातमी कर्वे गटानें कळूं दिली नव्हती. पण अनंताबरोबर हीं औरंगाबादचीं २ मुलें आलीं आहेत, असें विनायकराव देशपांडे यांस माहीत होतें. ज्याक्सनचा वध करण्याच्या वेळीं अनंताचा डाव हुकला तर वधाचें काम पुरें पाडण्यासाठीं खुद्द कर्वे भरलेलें पिस्तुल घेऊन नाटकगृहांत हजर होते. त्याचप्रमाणें देशपांडेहि हजर होते. अनंतानें ज्याक्सनचा वध केल्याबरोबर आपलें नांव-गांव खोटें सांगावें, आणि "खुनास खून" हें खिशांत ठेवलेलें पत्रक दाखवावें, दुसऱ्या कोणास गुंतवूं नये; अशीहि त्याला सूचना कर्व्यांनीं देशपांडे, जोशी यांच्यामार्फत दिली होती. पण धिंग्राप्रमाणें मी वक्तव्य करणार आहें म्हणून आत्महत्या त्यानें नाकारली. ज्याक्सनचा

वध केल्याबरोबर पळशीकर म्याजिस्ट्रेटनें अनंताचा हात धरला तेव्हां, 'तूं केवळ हिंदी आहेस म्हणून मी तुला जीवदान देतों', असें म्हणून अनंतानें त्यांच्यावर हल्ला करून त्यांचा प्राण घेतला नाहीं. आणि हात धरला गेल्यामुळें त्याला स्वतःचाहि घात करून घेतां आला नाहीं. अनंताला पुढें पोलीसनें पकडलें; आणि तूं कोण, कुठला राहणारा असें विचारतां त्यानें आपलें खरें नांव, आणि औरंगाबादचा राहणारा अशी माहिती दिली. आणि अिंग्रजांच्या जुलुमांचा सूड अुगवण्यासाठीं मीं हें कृत्य लोकशिक्षणासाठीं केलें, यांत दुसरा कोणी साथीदार नाहीं, असें त्या रात्रीं १२ वाजतां मॅजिस्ट्रेटसमोर जबानींत सांगूनहि टाकलें. पिस्तुलेंहि मी औरंगाबादेस अेका अरबाकडून घेतलीं, त्याचा पत्ता माहीत नाहीं, असें सांगून कोणालाहि न गुंतवतां तो मोकळा झाला होता. पण त्यानें "औरंगाबाद" हें गांवाचें सांगितलेलें नांवच पुढें भोंवलें. आणि तें त्यानें सांगूं नये म्हणून त्याला अगाअू सूचना दिली असतांहि त्यानें तें सांगितलें, ही त्याची बेशिस्त वागणूकच भयंकर घातकी ठरली. आपण जें देशभक्तीचें, पराक्रमाचें, निर्वाणीचें सत्कृत्य केलें आहे त्याबद्दल आपलें खरें नांव, गांव, धिंग्राप्रमाणें प्रसिद्ध व्हावें, या तारुण्यसुलभ आणि म्हणून कांहींशा क्षम्य अशा कीर्तिलालसेनें त्याला मोह पडला. या कीर्तिलालसेनेंच आपले फोटो प्रसिद्ध व्हावे या हेतूसाठीं, त्यानें आपले १०–१२ फोटोहि अगाअू, तो पूर्वी नाशकास आला होता तेव्हांच, काढून घेतले होते. पण आपण सहज सांगितलेल्या आपल्या खऱ्या नांवगांवामुळें, व पुढें गणूच्या भेकड आणि धांद्रटपणामुळें, काय भीषण प्रसंग ओढवणार आहे, याची १६ वर्षांच्या या साध्याभोळया निर्लेप मनाला कल्पना व दूरदृष्टि नव्हती. कर्व्यांना मात्र ती होती. आणि म्हणूनच त्यांनीं खरें नांवगांव सांगूं नको, युक्त प्रांतांतलें नांव व गांव सांग, अशी त्याला योग्य ताकीद दिली होती. पण तो चुकला.

### औरंगाबाद नांव भोंवलें

वध झाल्यावर पोलिसांची व कर्वे गटांतल्या लोकांची धांदल सुरू झाली. कर्वे व देशपांडे हे नाटकगृहांतून परत आल्यावर कर्व्यांनीं स्वतःजवळचें पिस्तुल देशपांड्यांच्याजवळ दिलें; आणि आपल्या सर्व गटांतील लोकांना, पोलिसांच्या झडत्यांत कांहीं सांपडूं नये म्हणून, हत्यारें बांबचें

सामान वगैरे सर्व गोष्टींची निरवानिरव करण्यास कळवलें. याच वेळेस विनायकराव देशपांड्यांनीं अनंताबरोबर आलेल्या दोन मुलांचें काय करावयाचें याबद्दल त्यांना विचारलें. त्यांना माणूस देअून मुंबअीस प्रथम पाठवून द्या आणि तेथून, औरंगाबादेचें सरळ तिकिट न काढतां, जवळच्या तारूर स्टेशनचें तिकिट काढून देण्याची व्यवस्था करण्यास गणूस कळवा, असें कर्व्यांनीं देशपांड्यास सांगितलें. त्याप्रमाणें देशपांडे गणूस कळविण्यास रात्रींच गेले. आणि ज्याक्सनचा वध झाला आहे, तूं औरंगाबादेहून आलेल्या मुलांना, मुंबअीची त्यांना माहिती नाहीं म्हणून, माणूस बरोबर देअून, मुंबअीस प्रथम रवाना कर व तेथून त्यांना तारूरला पोंचविण्याची व्यवस्था कर, आणि हत्यारें कागदपत्र वगैरे सर्व सामानाची निरवानिरव कर, असें गणूस त्यांनीं सांगितलें. गणूनें हें सर्व करण्यास पैसे नांहींत असें देशपांड्यांना कळविलें, आणि बाकीची व्यवस्था करतों असें सांगितल्यावर देशपांडे परत गेले. गणूची पैशाची वाण त्यांनीं कर्व्यांना कळविली. हें होअीपर्यंत रात्रहि फार झाली होती.

ज्याक्सनच्या वधाची बातमी केशवराव परांजपे यांच्याकडूनच प्रथम गणूस कळली होती. त्यानंतर तो 'कांपत कांपतच' वर आला असें त्यांचे पहुणे सेही अंकुशकर व जोशी आपल्या जबाबांत म्हणतात ! तो अितका घाबरला कीं, घरांतल्या हत्यारांचें व या पाहुण्या मुलांचें काय करावयाचें हें त्यास अुमजेना. या तिघांनीं गणूच्या वडील भावास कळवण्याचें ठरवलें. वडील भावाला या कटाची कसलीच माहिती नव्हती. त्यामुळें गणूनें हें कळवितांच "तूं माझ्या गळयाला फांस लावलास" असें शंकरराव वैद्य चिडून रागावून म्हणाले. पण त्यांच्या चिडण्या-रागावण्यानें काय होणार होतें ? देशपांडे अितक्यांत येअून त्यांनीं कर्व्यांचा निरोप गणूस कळविला. त्याप्रमाणें शेवटीं पिस्तुलें वगैरेचें गांठोडें करून शेजारच्या कौलारांत त्यांनीं दडवून ठेवलें, कागदपत्रें जाळलीं, आणि पहाटेच्या सुमाराला गणूनें पिस्तुलें आपल्या सेह्याकडे ( नारायण कृष्ण जोशी ) नेअून ठेवलीं, आणि कर्व्यांकडून १० रुपये आणण्यास शंकरराव वैद्य स्वतः गेले. वास्तविक अशा आणीबाणीच्या वेळीं, शंकररावांनीं 'कंजूषपणा' न करतां, १०।१२ रुपये स्वतः देअून गणूस मुलांची ठरल्याप्रमाणें व्यवस्था करण्यास सांगावयास हवें होतें. पण शंकररावांचा अुपजत कंजूषपणा राष्ट्रघातकी ठरला व ते पैसे आणावयास कर्व्यां-

कडे गेले. कर्व्यांनीं तरी लौकर अुठून पैसे पोंचवावयास हवे होते. तेंहि त्यांना जमलें नाहीं. कर्व्यांनींच नंतर पण फारच अुशिरा गणूस १० रु. दिले. या सर्व धांदलींत मुंबअीस या मुलांबरोबर पाठवण्यास कोणी खात्रीचा माणूसहि मिळाला नाहीं. यामुळें गणूचीहि त्रेधाच अुडाली. बरें अशा वेळीं, अितका अुशीर झाला होता तर, बरोबर जाणता माणूस न देतां, या परकी अनोळखी कच्च्या बुद्धीच्या मुलांना पाठवावयाचें तरी नव्हतें. पण तीहि बुद्धि भेदरलेल्या शंकररावास व गणूस सुचली नाहीं. मुलांस ठेवून घेतलें तर शंकरराव व कदाचित् कर्वे रागावतील अशीहि त्याला भीति वाटली असावी. म्हणून कसेंहि करून या मुलांस, प्लेगच्या अुंदराप्रमाणें, दूरदूर टाकण्याचें त्यानें ठरवलें. आणि येथेंच या घाबरट, भेकड, धांद्रट गणूनें सर्वांचा खड्डा खणला. खरें म्हटलें म्हणजे हीं अगदींच कच्चीं अनोळखी मुलें अितक्या घाअीनें परत पाठवणें हेंच धोक्याचें होतें. आणि त्यांतहि गणूसारख्या भित्र्या माणसावर अेवढी जबाबदारी कर्व्यांनीं टाकणेंहि योग्य नव्हतें. पण त्यांनाहि तें काम दुसऱ्या माणसावर सोपवण्याचें त्यावेळीं सुचलें नाहीं. त्यांत कांहीं विशेष कठीण नव्हतें हेंहि खरें. पण तें गणूस जमलें नाहीं. आणि त्यानें या अनोळखी परक्या मुलांना, कर्व्यांकडून अुशिरा पैसे आले होते व गाडी चुकणार हें नक्की होतें तरी, ते पैसे देअून, मुंबअीस जाण्यासाठीं तांग्यांत बसवून स्टेशनवर पाठवलें.

### अनंताच्या औरंगाबादी स्नेह्यांची कुतरओढ

पोलिसांनीं सर्वत्र नाकेबंदी केली होती. अनंतानें औरंगाबादचें नांव सांगितल्यामुळें औरंगाबादचा कोणीहि माणूस सांपडल्यास त्यांस अटक करा, असा अधिकाऱ्यांनीं स्टेशन-पोलिसांस हुकुम दिला होता. त्यामुळें स्टेशनवर ते पाळत ठेवूनच होते. सकाळच्या अेक्सप्रेसला हीं मुलें मुंबअीला जावयाचीं होतीं. पण शंकररावांचा कंजूषपणा आणि गणूचा कमालीचा भेदरटपणा व धांद्रटपणा यामुळें या मुलांना गांवांतून निघण्यासच अुशीर झाला होता. म्हणून त्यांची ती गाडी चुकली. आणि ते तसेच स्टेशनवर घोंटाळत १ तासानंतर येणाऱ्या दुसऱ्या गाडीची वाट पाहात तिष्ठत बसले. नाटकें पाहाण्यास आलेलीं मुलें. त्यांनीं आपल्याबरोबर कांहीं विशेष सामानहि आणलें नव्हतें. बरें कांहीं अचानक प्रसंग आल्यास कसें वागावें, कशी बतावणी करावी, हेंहि त्यांना

कोणीं सांगितलें नव्हतें. दोन्हीहि १६–१७ वर्षांचे अल्लड तरुण. त्यामुळें त्यांना स्टेशनवरील पोलिसांनीं सहज हटकतांच ते बावरले. पोलिसांना संशय आला; आणि त्यांनीं त्यांना कोण, कोठून आला, कोठें रात्रीं अुतरला होता याची चौकशी चालवली. अेकानें काशीहून आलों असें सांगितलें. दुसऱ्यानें हैदराबादेहून आल्याची बतावणी केली. अेकमेकांची ओळख आहे काय विचारतां अेकानें होय, तर दुसऱ्यानें नाहीं, म्हणून सांगितलें. अुत्तरांत असा फरक आल्यावर पोलिसांचा संशय दुणावला. जवळ सामान नाहीं तर रात्र कोठें काढली, म्हणून विचारल्यावर दोघांनीं गंगेवर धर्म-शाळेंत होतों असें सांगितलें असतें तरी चाललें असतें. पण तेंहि त्यांना सुचलें नाहीं. गणू वैद्याच्या घरीं खाणावळ आहे तेथें रात्रीं अुतरलों होतों असें सांगितलें. अचानक पोलिसांच्या तडाक्यांत सांपडल्यामुळें हीं मुलें अगोदरच भयभीत झालीं होतीं. संशयामुळें त्यांना पोलिसांनीं नाशकास आणलें, आणि गणू वैद्याचें घर दाखवा म्हणून त्यांच्यामागें लकडा लावला. पोलिसांचा ससेमिरा मागें लागतांच आम्ही औरंगाबादेहून आलों असें या दोन्ही मुलांनीं कबूल केलें. त्यामुळें तर नक्कीच शिकार सांपडली असें पोलीस अधिकाऱ्यांस वाटलें. मुलांनीं गणूचें घर दाखवतांच, संध्याकाळ होत आली होती म्हणून, सर्व माणसें बाहेर काढून देअून, गणूच्या घराला मोहोर करून, दुसऱ्या दिवशीं झडती घेण्याचें पोलिसांनीं ठरवलें व गणूस अटक केली. दुसरी मुंबअीची गाडी पकडण्याच्या आंत, १च तासांत, ही भावी प्रचंड अनर्थावह घटना घडली! आणि पोलिसांनीं सहज टाकलेल्या फाशानें, पांडवांप्रमाणें, आम्हांस देशोधडीस लावलें.

### योजनेच्या अभावीं घात

स्टेशनवर व पोलीस कचेरींत हें २२–१२–१९०९ ला प्रकरण शिजत होतें, याची कोणासच कल्पना नव्हती. त्या दिवसभर कर्वे गटांतलीं सर्व मंडळी आपापलीं पिस्तुलें, बॉम्बचें सामान, कागदपत्र यांची निरवानिरव करीत होती. पण यावेळीं या निरवानिरवींत कांहीं सूत्रबद्ध व्यवस्था, योजना, मुळींच नव्हती. अेकानें आपलें सामान दुसऱ्याजवळ द्यावें, ही निरवानिरव म्हणतां येत नाहीं. असें जोखमीचें अेक सामान नष्ट तरी करून टाकावयाचें, किंवा जेथें कोणी अितर माणूस गुंत-

णार नाही, अशा निर्जन ठिकाणी तरी ते गुप्त ठेवावयाचे, याला निरवानिरव म्हणणे शोभते. तसें या गणूच्या गटांतल्या सभासदांनी कोणी फारसें केलें नाही. त्यांना तसे कोणी, कधी, अगाऊ शिकविले, पढविलेंच नव्हते. त्यामुळें गणूने जसें सकाळी पिस्तुल जोशांस दिलें तसेंच सदाशिव दांडेकराने, घाबरून त्याच्याजवळचें ब्राऊनिंग पिस्तुल व ॲसिडांच्या बाटल्या, गणूच्या घरी दुपारी आणल्या; आणि तो घरी नव्हता म्हणून, त्याच्या बिछान्याखालीं पिस्तूल छपवून ठेवले व बाटल्या कोनाड्यांत ठेवल्या. गणूस त्याची कल्पनाहि नव्हती. तो घरींहि नव्हता. त्यामुळें तो निश्चित होता. पण त्यानेंच बोलावलेले त्याचे पाहुणे हे त्याच्या दुर्दैवाचा घडा पोलीस कचेरीत भरीत होते. आणि त्यांनी जेव्हां गणूचें घर दाखवलें, आणि पोलिसांनी गणूस अटक करून घरावर मोहोर केली, तेव्हां गणूहि सचिंत झाला. रात्र कशी तरी या तिघांनीं पोलीस पहाऱ्यांत काढली. आपल्या घरांत कांहींच सांपडणार नाही याची गणूला खात्री होती. पण सकाळीं घराची झडती पोलीस घेतांना खुद्द गणूच्या बिछान्याखालीच ब्राऊनिंग पिस्तुल निघालें! कान्हेऱ्यांनीं ज्याक्सनला ज्या पिस्तुलाने मारलें तसेंच ब्राऊनिंग पिस्तुल तें होते. कोनाड्यांत ॲसिडाच्या बाटल्याहि सांपडल्या!!! हा अकल्पित आघात पाहतांच अगोदरच भेकड असलेला गणू पुराच भांबावून गेला! सुन्न होऊन काळा ठिक्कर पडला, आणि त्याला दरदरून घामच फुटला. निश्चित योजनेच्या आणि प्रसंगावधानतेच्या अभावी, आणि आमच्या दुर्दैवानें, त्याच्यासारख्या अगदींच कच्च्या माणसांवर भयंकर कहरच गुदरला.

याप्रमाणें अिंग्रज सरकारच्या सुदैवाने त्यांना, अगदी त्यांच्या जबड्यांत, गणूच्या भेकडपणामुळें ढकललेली औरंगाबादच्या २ तरुणांची शिकार आयती, वधाच्या दुसऱ्याच दिवशीं, मिळाली. मुद्देमाल कसा बेमालूम लपवावा याच्या निश्चित योजनेच्या अभावी, त्याला नकळत, सदू दांडेकराने त्याच्याच घरांत ठेवलेलें पिस्तुल आणि बॉंबचें सामानहि पोलिसांना मिळाले. या दोन मुलांना "मी खून करणार आहें" असें अनंतानें मागें सांगितलेंच होतें. गणूची व अनंताची भेट पूर्वी झालीच होती. खुनाचे बेतहि चाललेले गणूला माहीत होते. त्या कटांत कोणकोण होते याचीहि त्याला माहिती होती. त्याची शरीरप्रकृतीहि क्षयी माणसासारखी जेमतेमच होती. त्यामुळें पोलि-

सांनीं त्याला व त्या दोन मुलांना चौदावें रत्न दाखवितांच त्यांची गाळण उडाली. बरें अशा संकटांत कसें वागावें, याची, मानसिक व बौद्धिक, पूर्वतयारी कांहींच नव्हती. पिस्तुलें आणि बॉंबचें सामान नेहमी हाताळल्याचें गणूनें या दोन मुलांना मोठ्या दिमाखानें पूर्वी सांगितलें होतें. अितकेंच नव्हे तर अंकुश-करला पेणला बॉंब कारखान्यांत शिकण्यास पाठवण्याचे त्यानें आभिवचनहि दिलें होतें. म्हणूनच अंकुशकर नाशकास आला होता. कर्वेगटाचा गणू हा कारभारीच होता. आणि या कच्च्या दिलाचा हा गड्डा, अेकदम, अचानक अनपेक्षित मुद्देमालासह पोलिसांस सांपडला. आणि, मागें त्याने म्हटल्याप्रमाणें, पोलिसांचा हिसका बसतांच तो भराभर सांगूं लागला. सांपडलेली पिस्तुलें व बॉंबचें सामान व विद्या त्याला कर्व्यांनीं दिली होती. म्हणून त्याबद्दल त्यानें कर्व्यांचें नांव प्रथम सांगितलें. त्यावरून कर्व्यांना अटक झाली. जी स्थिति गणूची तीच कर्व्यांचीहि पोलिसांच्या भयंकर छळामुळें झाली असावी. त्यांनींहि नाअिलाजानें पाटणकरांकडून पिस्तुले घेतल्याचें सांगितले. म्हणून पाटणकरांना मुंबअीस अटक झाली. पाटणकरांची बॉंबचा वसअीचा कारखाना वांचव-ण्याची धडपड होती. त्या कारखान्यांतून नुकतेच ते वसअीहून आले होते म्हणून त्यांच्या अंगाकपड्यांवर पिक्रिक ॲसिडचे डाग होते. छळ करतांना पोलिसांस ते दिसूं नयेत म्हणून, त्यांनी चतुर्भुजकडून पिस्तुलें आणल्याचें अेकदम कबूल करून, ती वेळ कशी निभावली, या त्यांच्या अडचणीचें वर्णन मागें आलेच आहे. चतुर्भुजवर पोलिसांची जून १९०९ पासूनच नजर होती, असें मुंबअीचे पोलीस कमिशनर व्हिन्सेंट, व सी. आय्. डी. खात्याचे प्रमुख गायडर, यांनीं आपल्या साक्षींतच सांगितलें आहे. तोंवर त्यांना चतुर्भुजनें दाद दिली नव्हती. पण पाटणकरांनी त्याचें नांव सांगितल्यामुळें त्याला जेव्हां पकडलें तेव्हांच तो बिथरला. आपला विश्वासघात पाटणकरानें केला, अशी त्याची समजूत झाली. त्यामुळें त्यानेंहि, पोलिसांच्या छळास भिअून, सावरकरांकडून पिस्तुलें आणली, व सावरकरांनीं सांगितल्याप्रमाणें भट व थत्ते यांजकडे जाअून, व भटांनीं सांगितल्यावरून, पाटणकरांस दिलीं, असें सांगून तो माफीचा साक्षीदार होण्यास कबूल झाला! यामुळें ज्याक्सन-वधाचा धागा अनंता कान्हेऱ्यांपासून थेट विलायतेस सावरकरांपर्यंत पोंचला. सावरकर त्या वेळीं पारिसला होते. आणि ते तेथें, त्यांच्या मित्रांच्या आणि आमच्या सूचना-

सल्ल्याप्रमाणें, राहते तर त्यांना अटकहि झाली नसती. ते तेथें सुरक्षित निर्वासितांप्रमाणें आजपर्यंतहि राहूं शकते. पण त्यांना दुर्बुद्धि होअून ते विलायतेत आले, आणि अचानक अिंग्रज सरकारच्या हातांत सांपडले. अिकडचें वॉरंट तेथें तयार होतेंच. पाटणकर व चतुर्भुजनें माझें व थत्त्यांचें नांव सांगितल्यावरून मला व रा. थत्ते यांनाहि पकडण्यांत आलें.

कर्व्यांनीं घेतलेली पिस्तुलें व बॉंबचें सामान आणि अुपकरणें नाशकास, गणूच्या मार्फत, निरनिराळ्या सभासदांच्या हातांत जातच होती. त्यामुळें त्यांचा छडा लावतां लावतां अनेक माणसें अडकली गेली. कर्व्यांच्या मार्फत कांहीं पिस्तुलें पुण्यास रा. कृष्णाजी गोपाळ खरे (आमचे बॉंबचे गुरु) यांच्याकडून त्यांचे मित्र ब्रह्मगिरीबुवा यांच्या हातांत गेली. तींहि अशींच निरनिराळ्या माणसांच्या हातांत गेल्यामुळें तेवढीं माणसें अडकवलीं गेलीं. अेवंच, पिस्तुलांचा व बॉंबच्या सामानाचा मागोवा काढतां काढतां अनेक माणसें, पूर्वनियोजनाच्या व समयसूचकतेच्या अभावामुळें, पोलिसांस सांपडलीं.

पिस्तुलें, शस्त्रें व बॉंब कशासाठीं गोळा करीत होतां या पोलिसांच्या प्रश्नास अुत्तर देणें अवश्यच होतें. तो हेतु अर्थातच सरकारी अधिकारी व त्यांचे बगल-बच्चे यांच्या वधाचा होता, हेंहि सांगणें आलें. अशा हेतूसाठीं जे जे या राज्य-क्रांतीच्या कटांत आले होते, व ज्यांचा थोडासा तरी संबंध पिस्तुलें, बॉंब, शस्त्रें यांच्याशीं आला, त्यांनाहि पोलिसांनी आपल्या जाळ्यांत खेंचले. पोलिसांच्या भयंकर छळामुळें, अगदीं अवश्य तेवढीच जरी माहिती आरोपितांनी सांगि-तली तरी, खुनाच्या खटल्यांत ७, राज्यक्रांतीच्या खटल्यांत ३५, आणि किरकोळ हत्यारांच्या कायद्याखालच्या आरोपांवरून ५–६ असें सुमारें ५० जण आम्ही या चक्रांत सांपडलों; व फांशी, जन्मठेप, व १५ वर्षे सक्तमजुरी-पासून तो कांहीं महिन्यांच्या शिक्षा आम्हांस मिळाल्या.

### दोषचक्र मध्येंच कां तुटलें नाहीं ?

हें दोषचक्र तांतडीनें मधेंच कुठें कां तोडलें गेलें नाहीं अशी वाचकांस शंका येणें साहजिकच आहे. त्याचें अुत्तर आमच्या घटनेच्या नियमांत आहे. त्या नियमांप्रमाणें आमच्या गटांचे पुढारीच काय ते अेकमेकांस परिचित असत, सभासद नसत. त्यामुळें औरंगाबादच्या अनंताचा व आमचा कुठें संबंध येअू

शकेल अशी आम्हां कोणास कल्पनाहि नव्हती. शिवाय पकडलेल्या लोकांची नांवेंहि वृत्तपत्रांत अुशिराच पोलीसकडून मिळत. या अुशिरामुळेंहि आम्ही हें प्रकरण आम्हांस भिडेपर्यंत निष्काळजी होतों. आणि सर्वांत मोठें कारण म्हणजे अेकमेकांवरचा पूर्ण विश्वास. आपला साथीदार पूर्ण विश्वासपात्र आहे आणि पोलीस-छळामुळें, आपल्याला तो गुंतवील, अशी कल्पनाहि आम्हांला शिवली नव्हती. याचें अुत्तम अुदाहरण म्हणजे कर्व्यांनी खऱ्यांचें नांव सांगितल्यावर, खऱ्यांचा मुंबअीस पोलीस शोध करीत होते, व त्यांच्या पश्चात् त्यांच्या खोलीची पोलिसांनीं झडती घेतली होती, हें खऱ्यांना खरेंच वाटलें नाहीं. आणि म्हणून ते नेहमीप्रमाणें, पुण्याहून मुंबअीस परत आले, आणि पोलीस कमिशनरच्या कचेरींत या झडतीच्या निषेधार्थ आपण होअून हजर झाले! कर्वे आपलें नांव सांगतील व आपण यांत गुंतू ही, कर्व्यांच्यावरील दृढ विश्वासामुळें, खऱ्यांना कल्पनाहि नव्हती. माझें स्वतःचेंहि असेंच झालें. १-१-१९१० पर्यंत वृत्तपत्रांत पाटणकर व चतुर्भुज यांना पकडल्याची बातमी आलीच नव्हती. मीं सकाळीच ती वाचली, आणि १ तासाच्या आंतच पकडलों गेलों. बातम्या कदाचित् अगाअू मिळत्या तर, आमच्यापैकीं कांही जण तरी, सावध होअून अज्ञातवासांत जाअू शकलों असतों. पण या २० पिस्तुलांनी निदान २० खून तरी होतील ही धास्ती अिंग्रज पोलीस अधिकाऱ्यांस असल्यानें, त्यांनीं अुशिरा बातम्या देण्यांत पराकाष्ठेची दिरंगाअी, आणि संशयितांना पकडून ठेवण्यांत कमालीची घाअी, चालवली होती. म्हणून बातम्या मिळण्यापूर्वी अटकेनेंच पहिली खबर आम्हांस मिळे. तसाच कर्व्यांच्यावर पाटणकरांचा अेवढा विश्वास होता की, खुनाची बातमी कळतांच, पेणहून मराठे मुंबअीस पाटणकरांच्या भेटीसाठी आले असतां, पाटणकरांनीं आपला या खुनाशीं कांही संबंध नाही, असें त्यांना सांगून परत कसें पाठवलें, हें मागें बॉंब-प्रकरणांत दिलेंच आहे (मराठे यांची लेखी माहिती). शिवाय अण्णा कर्व्यांनीं पाटणकरांना व मला "आमच्या दोघांच्या सल्ल्याशिवाय कांहीं असें अपघाती कृत्य करणार नाहीं", अशी, त्यांच्या परमपूज्य गुरूची शपथ घेअून, आश्वासन दिलें होतें. त्यामुळें आम्ही कर्व्यांच्यावर पूर्ण विश्वासून होतों. त्यांतहि वधापूर्वीच १-२ दिवस मी, आमच्या अभिनव भारतापैकीं

रा. विश्वनाथराव गोरे यांना नाशकास पाठवून, सर्व पिस्तुलें मुंबअीस परत मागवलीं होतीं. "१—२ दिवसांत मीच मुंबअीस येत आहे, येतांना तीं घेअून येअीन", असें कर्व्यांनीं गोऱ्यांना अुत्तर देअून मुंबअीस परत पाठवले होतें. त्यामुळें तर अण्णा कर्वे या प्रकरणांत, आम्हांस कांही न कळवितां, भाग घेतील, हें आमच्या स्वप्नांतहि येणें शक्य नव्हतें. म्हणून आम्ही अगदींच निर्धास्त होतों. अण्णा कर्व्यांकडून आम्हांला व अितरांना दिलेल्या अभिवचनांचें, शपथपूर्वक आश्वासनांचें, पालन पुरेपूर होअील अशी आम्हांस पुरी खात्री होती. कारण अशा राज्यक्रांतीच्या गुप्त कटांच्या कामांत सर्व मदार केवळ अेकमेकांवरील दृढ विश्वासावरच असते. ती नसेल तर कोणतेंहि संघटित गुप्त कार्य होणेंच अशक्य. म्हणून आम्ही कर्व्यांसारख्या धुरंधर कार्यकर्त्यांवर संपूर्ण विश्वास टाकून होतो. कर्व्यांनाहि अज्ञातवासांत जाणें शक्य होतें. २२ व २३ डिसेंबर हे २ दिवस ते मोकळे होते. पण कदाचित् गणू वैद्य आपला विश्वासघात करणार नाही, अशी त्यांनाहि खात्री असावी. पण सर्वत्र विश्वास-विपरीतच गोष्टी घडत होत्या! पण आम्हां कोणाला न कळवतां, खुनांत सामील होण्याचा कर्व्यांना अेकदम आकस्मिक कां मोह पडला, व त्यांत सामील झाल्यावरहि, त्यांनीं आम्हांस ती गोष्ट कळवून सावध कां केलें नाहीं, हें गूढ आम्हां कोणासहि त्यांनीं अुकलून सांगितलें नाहीं. अुलट, आपल्या हातून अनपेक्षित गोष्टी घडल्या, व त्यामुळें सर्वच ऑफस् होअून अितकी माणसें अडकली गेली, याबद्दल त्यांना मागून अितका पश्चात्ताप झाला की, आपण यापुढे जिवंत राहणें अिष्ट नाही. म्हणूनच केवळ त्यांनी फांशीची शिक्षा आपणा स्वतःवर ओढून घेतली. त्यांच्या पहिल्या जबानीप्रमाणें ती त्यांना मिळाली नसती. म्हणून अगदीं शेवटच्या जबाबांत त्यांनीं म्याजिस्ट्रेट-पुढें सांगितलें आहे कीं, पूर्वी सांगितलेल्या "हकीकतीवरून ज्याक्सनच्या वधाबद्दलची जबाबदारी जितक्या तऱ्हेनें माझ्याकडे आहे तितक्या तऱ्हेनें ती त्या जबाबावरून पूर्णपणें दिसून येत नाहीं. कारण जुलूम व अन्यायाचा प्रतिकार करण्याची कल्पना मी देशपांडे, सोमण व अितर मंडळीस सांगितली होती व त्यांस शक्य तर ज्याक्सनचा वध करण्यास सांगितलें होतें."
"मी लहान भरलेलें पिस्तुल घेअून थिअेटरमध्यें गेलों होतों. अुद्देश हा कीं,

जरूर लागल्यास अनंतास मदत करण्याची!" या शेवटच्या कर्व्यांच्या जबाबामुळेंच त्यांना फांशीची शिक्षा झाली.

## वधाचा अचानक बेत

अुपर्युक्त गूढाचा खुलासा अेकाच गोष्टीनें होअू शकतो. आणि ती ही कीं, ता. १९ पर्यंत वधाची कर्व्यांनाहि कल्पनां नव्हती. १९ तारखेला विनायकराव देशपांडे यांना "औरंगाबादेस हत्यारांचा तपास करून ये, ज्याक्सनचा वध करण्याचा प्रयत्न अितक्या लौकर होणार नाही" असें त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें होतें ( कर्वे, १ ला जबाब ). पण देशपांडे यांनी सर्व हकीकत अनंतास औरंगाबादेस सांगितल्यावर, अनंता दुसऱ्याच दिवशीं, पण वध करण्याच्या अुद्देशानेंच, आला. आणि तो येणार ही बातमी कर्व्यांना कळल्यावर, २१ तारखेस सकाळी, वधाचा बेत नक्की झाला. त्यांच्या गुरूंच्या आज्ञेनुसार, ३ जानेवारी १९१०ला ज्याक्सनचा वध करण्याचा कर्व्यांचा बेत होता. अनंता आल्यानें, व ज्याक्सनसाहेब २३–१२–०९ ला नाटकगृहांत सांपडणार असल्यानें, तो बेत २१ डिसेंबरला संध्याकाळीं निश्चित ठरला. आणि म्हणून त्यांना आम्हांला अगाअू कळवतां आलें नसावें. आणि वध झाल्यावर "आम्हांस मधल्या दोन दिवसांत, मी वधांत सामील आहे, सावध राहा" अशी सूचना त्यांनीं दिली नाही, कारण ते गणूवर विश्वासून होते. असो. आम्ही गाफील कां राहिलों, परागंदा कां झालों नाहीं, आणि हें दोषचक्र मधेंच कां तुटलें नाही, याचें स्पष्टीकरण हें येणेप्रमाणे आहे. ही सावधतेची सूचना कर्व्यांनीं आम्हांस दूर मुंबअी-पुण्यास दिली नाही अितकेंच नव्हे, तर खुद्द नाशिक शहरांत विष्णुशास्त्री केळकर यांनाहि ती मिळाली नाहीं! त्यामुळें तेहि निश्चिंतच होते ( केळकरांचा लेख ). सूचनेच्या अभाव, विश्वासपात्र व धुरंधर नेत्यावरील दृढ विश्वास, आणि गुप्ततेकरितां केलेला आमचाच नियम, आमच्या बोकांडीं कसा बसला याची ही शोकांतिका अशी आहे.

आमच्या अिकडेच हा असा गोंधळ झाला असें नाहीं. खुदिराम बसूनें टाकलेल्या बॉंबमुळें किंग्जफर्डच्या अैवजीं दोन केनेडी बायाच मेल्या. यामुळें जी 'अलिपूर बॉंब-केस' कलकत्त्यास झाली तीहि अशीच वध झाल्यावर दोनच दिवसांत पोलिसांस अुलगडली. त्या खटल्यांत व आमच्या खटल्यांत हेच दोष झाल्यानें त्यांच्याकडेहि कैक माणसें फांशी व तुरुंगांत गेलीं.

## प्रकरण दहावें

# इंग्रज सरकारविरुद्ध सशस्त्र बंडाचा अभियोग

ज्या क्सन-वधाच्या सबबीवर आम्ही सर्व पकडले गेल्यावर रीतसर आमच्यावर खटले करण्याची तयारी होऊं लागली. अपराधांचें भीषण स्वरूप पाहून सरकारनें नवा जुलमी कायदा ( न्यू क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट १९०८ ) आमच्या खटल्यासाठी लागू केला. या कायद्याप्रमाणें म्याजिस्ट्रेटसमोर चौकशी, नंतर सेशन कमिट केल्यावर सेशन्स कोर्टांत खटला, नंतर हायकोर्टांत अपील, या मामुली नेहमीच्या लांबलचक प्रकाराला गचांडी देऊन, म्याजिस्ट्रेटनें अेकदम हायकोर्टातल्या न्यायाधिशांपैकी ३ न्यायाधिशांच्या ( खास कोर्ट ) स्पेशल ट्रायब्यूनलकडेच खटला चालवण्यासाठीं धाडावयाचा, व या ट्रायब्यूनलच्या निकालावर अपील नसावयाचें, अशी तडकाफडकी न्यायाची झटपट रंगारी पद्धति होती. या कायद्यानें म्याजिस्ट्रेटच्या चौकशींत वकिली सल्ल्याचीहि परवानगी नव्हती. त्यामुळें आमचा कायदेशीर बचाव करण्याचा हक्कच नाहींसा झाला होता. कारण वकिलांना आम्हांला भेटण्याची परवानगी असती तर आमच्या जबान्या पुष्कळच निराळ्या झाल्या असत्या. पण वकिलांना भेटण्याची परवानगीच नसल्यानें पोलिसांच्या कारवायांना मुक्तद्वारच

होतें. खटल्याची पूर्व चौकशी करण्यासाठीं अे. मॉंटगॉमेरी या फर्स्ट क्लास म्याजिस्ट्रेटला नियुक्त केलें होतें. आरोपी पकडल्यावर त्याला पोलिसांच्या ताब्यांत ठेवणें ( पोलीस कस्टडी ), किंवा आपल्या ताब्यांत ठेवणें ( म्याजिस्ट्रेटची कस्टडी ), हा अधिकार या म्याजिस्ट्रेटकडे असे. पण या दोन्ही प्रकारांत फारसा भेदच नव्हता. आरोपी पुष्कळ होते म्हणून त्यांना अडकून ठेवण्यास पोलीसहि पुष्कळ आणले होते; आणि आम्हांला ठेवण्यास तुरुंगांत पुरेशी जागाहि नव्हती. म्हणून या दोन कस्टड्यां (अटके) मधला भेद निवळ नांवापुरतांच खरोखर होता. आणि आम्ही सदासर्वदा पोलिसांच्याच ताब्यांत होतों. त्यामुळे पोलिसांच्या छळाला हवा तितका वाव मिळाला. कबुलीजबाब घेणारे म्याजिस्ट्रेट जे होते – पळशीकर व खोपकर – तेहि सरकारचे मिंधे. त्यांची बढती पोलिसांच्या या खटल्याच्या रिपोर्टांवर. म्हणून पोलीस सांगतील त्याप्रमाणें ते जवळ जवळ वागत. शिवाय आम्हां आरोपींना जर यत्किंचितहि सवलत दिली तर वरिष्ठ अधिकाऱ्यांची मर्जी जाणार, या धाकानें ते तरी आम्हांस कशाला कायदेशीर सवलती देतील ? आम्ही सर्व सरकारच्या नरडीचा घोट घेण्यास निघालेले कट्टे राजद्रोष्टे, आणि ते खुद्द अेकनिष्ठ राजसेवक. तेव्हां आम्ही कायदेशीर त्यांचेहि शत्रूच. मग ते आम्हांस कां दया-माया दाखवतील ? ती दाखवलीच तर कदाचित् आमच्याच रांगेंत त्यांनाहि पोलीस गुंतवावयाचे, किंवा बदलून सरकारच्या गैरमर्जींत रहावयाचे, हीहि भीति त्यांना होतीच. त्यामुळें आम्ही केवळ पोलिसांच्याच हातांत ७–८ महिने खितपत होतों. पळशीकरांपेक्षां खोपकर कांहींसे अुजवे. पण हे पाहून पोलिसांनी त्यांच्याकडे थोडेच आरोपी कबुलीजबाबासाठीं पाठवले.

### छळाला मुक्तद्वार

म्याजिस्ट्रेटांची जेथें ही मनोवृत्ति तेथें पोलिस अधिकाऱ्यांची मनोवृत्ति काय असेल, याची वाचकांना कल्पना येअीलच. सरकारचें क्रांतिकारकाविरुद्ध पराकाष्ठेचें कडक धोरण १९०८ पासूनच जाहीर झालें होतें. त्या धोरणाची तळी अुचलून धरणे हेंच अथपासून अितीपर्यंत राजसेवकांचें काम ठरलें होतें. तेव्हां आमच्यासारखे सरकारचे परम शत्रु हातांत सांपडले असतांना, आमच्या चितेवर पोळ्या भाजून घेण्याची ही आलेली संधि

राजनिष्ठ पोलीस अधिकारी कशाला घालवतील?· त्यांतहि ज्या पोलीस अधिकाऱ्याची या खटल्याकरितां खास नेमणूक झाली होती त्या गायडरनें " आरोपी मेला तरी हरकत नाहीं, पण पिस्तुलें व अितर मुद्देमाल मिळा-लाचं पाहिजे " अशी सक्त ताकीद, व सदर परवानगी, हाताखालच्या अधि-काऱ्यांना दिलेली. मग ते तरी आमच्या जिवाची कशाला पर्वा ठेवणार? आणि या गुन्ह्याचें स्वरूप राजकीय व भयंकर असल्यानें, व त्याच्या शाबिती-वरच या अधिकाऱ्यांची बहाली बढती असल्याने, या वाहत्या गंगेत अनेक पोलीस अधिकाऱ्यांना आपले हात धुवून घेण्याची अमोल संधि मिळाली होती. अडी-अडचणीला त्यांना गणू वैद्य होताच. बॅ. बॅप्टिस्टांनीं तर त्याला पुराव्यांतला missing link ' जुळता दुवा ' हेच नांव ठेवलें होतें. कुठेहि पुराव्याची साखळी तुटली कीं, तेथें गणूला पोलीस दडपीत, त्यामुळें त्यांनीं, कोणतीहि अडचण न जुमानतां, आमच्यावरील आरोपांची नाना प्रकार करून तळी भरली. पुराव्यासाठीं आमचाच काय, पण साक्षीदारांचाहि छळ होअी. शिवाय, या नवीन कायद्याप्रमाणें, कोठेंहि वकिलाला भेटण्याची संधि नसल्यानें, बाहेरच्या लोकांना आमच्या छळाची माहितीहि क्वचितच मिळे. आणि मिळाली तरी आमचा वाली कोण होणार होतें? कायद्याप्रमाणेंच ते अशक्य होतें. बरें अेखादे वेळेस जर घरच्या माणसांची, पोलिसांच्या पर-वानगीनेंच, आणि त्यांच्या पहाऱ्यांतच, गांठभेट झाली तरी: त्यांना या छळाची हकीकत सांगण्याचीहि दुप्पट चोरी होती. कारण पोलिसांच्या छळाविरुद्ध कागाळी केली तर पुन्हा भेटण्याची परवानगी मिळावयाची नाहीं ही भीति, आणि आमचा छळ होत आहे हें सांगितलें तर आमच्या जिवल-गांना अधिक काळजी, दुःख, वाटावयाचे ही दुसरी भीति. यामुळें आमचा तोंड दाबून पक्का दुप्पट बुक्क्यांचा मार होत होता. आमच्या छळाविरुद्ध कोठूनहि ओरड होणेंच शक्य नव्हतें. वर्तमानपत्रांनाहि कोणीं कळवलें तर तो मजकूर छापण्यासहि पत्रकर्ते भीत असत. असा सरकारी जुलमाचा वरं-वंटा आम्हांला सगळीकडून रगडीत होता. परमेश्वरच आमचा पाठीराखा काय तो अुरला होता.

## कांहीं देशभक्त पोलीस

सर्व सामान्य पोलिसांबद्दल हे वर्णन जरी लागू असलें तरी या भांगेंत

कांहीं तुळशीहि चुकून अुगवल्या होत्या. सदावर्त्यांचें अुदाहरण बॉब-प्रकरणीं आलेंच आहे. तशींच कांहीं तुरळक अुदाहरणें होतीं. बाबा सावरकरांच्या घरीं अिस्टेट जप्त करण्यास जेव्हां दोन फौजदार यावयाचे होते, तेव्हां अेकानें आम्हांस अगाअूच निरोप पाठवला कीं, "आम्ही येण्यापूर्वी तुम्हांला काय लांबवावयाचें असेल ते लांबवा, घरांत कांहीं फाटकी वस्त्रें व फुटकीं भांडीं ठेवा, व बाकीचें सर्व सामान दुसरीकडे हलवा." आम्ही अगोदरच सावध होतों. पण, ही सूचना मिळतांच आणखीहि सामान आम्ही दुसरीकडे हलवूं शकलों. तसेंच, मला व रा. नागपूरकरांना पकडून जेव्हां मुंबअीस पोलीस कमिशनरच्या कचेरींत आणलें, तेव्हां त्यानें त्याच्या अेका हाताखालच्या अधिकाऱ्यांस आमच्याकडून कांहीं कबुलीजबाब निघतो कां, हें पाहण्यास सांगितलें; आणि 'सीधा' करण्याचीहि परवानगी दिली. पण तो अधिकारी खरा देशभक्त होता. त्यानें आम्हांस अेकेका कोठडीत नेअून सांगितलें कीं, "तुम्ही नुसतें ओरडा. मी तुमच्या अंगाला हातहि लावणार नाहीं. पण तुमच्या आरोळ्यांनी त्या हरामखोरास (पोलीस कमिशनरला) कळेल कीं, मी तुमची कणिक तिंबतो आहे." त्याप्रमाणें आम्हीं बतावणी केली. कांहीं तासांनंतर त्याने कमिशनरला कळविलें कीं, "बेरड आहेत लेकाचे. कबूल होत नाहींत." तेव्हां त्यानें आमचा नाद सोडला. आम्हीं बहुतेक आरोपी ब्राह्मण असल्यानें आम्हांला जेवूं खाअूं घालावयाला सरकारनें अेक सरकारी स्वतंत्र भोजनालय अुघडून त्यांवर सर्व ब्राह्मण पोलीसच ठेवले होते. तेच आमचे आचारी व वाढपी. त्यांतल्या अेकाने वाढतांना माझ्याजवळ, हळूंच वेळ सांपडेल तेव्हां, कुजबुजून कांहीं मसलती कराव्या. या मसलतीमुळें मी आमच्या पिंपळगांवच्या गद्रे या अभिनव भारताच्या सभासदास वांचवूं शकलों होतों. १९०५ पासून सरकारनें हिंदुस्थानांत देशभक्तांच्याविरुद्ध जी जुलुमाची मोहीम सुरू केली होती, व शेंकडों देशभक्तांस राजद्रोहासाठीं तुरुंगांत टाकून छळलें होतें, त्याचा परिणाम या अशा देशभक्त पोलीस अधिकाऱ्यांवरहि होअूं लागला होता. १९०८ मध्यें लो. टिळकांना जेव्हां अघोर शिक्षा झाली तेव्हां तर पुष्कळच देशी पोलीस अधिकाऱ्यांना वाअीट वाटल्याचें मला माहीत आहे. पण असे देशभक्त अधिकारी त्या काळांत

थोडेच होते. १९४२ पर्यंत त्यांची संख्या खूपच वाढत गेली; आणि म्हणूनच अच्युतराव पटवर्धन, जयप्रकाश नारायण, यांना कित्येक महिने गुप्त राहून देशभर संचार करणें शक्य झालें. बाहेरच्या प्रकट कार्याचा, वृत्तपत्रांच्या सरकारी जुलमाविरुद्ध लेखांचा, सभा व्याख्यानादिकांचा, परिणाम पोलिसांवरहि होअी. कांहीं पोलीस तर म्हणत कीं, सरकार आम्हांस जो पगार देतें त्याच्या निम्मे जरी तुम्ही आम्हांस दिलांत तरी आम्ही या टोपड्यांची नौकरी सोडून देअूं. अशी त्यांच्यापैकीं कांहींची वृत्ति होअूं लागली होती. शिवाय आम्हीहि आमचे कांही कट्टे देशभक्त पोलीस, तुरुंग, वगैरे सरकारी खात्यांत भरती करीत होतोंच. त्यामुळेंहि कांहीं पोलीस अधिकारी आम्हांस मदत करूं शकत.

### टिळकांना गोवण्याची कारवाअी

येथेंच पळशीकरांचें अेक पुण्यकृत्य सांगून टाकतों. कोल्हापूर-प्रकरणाप्रमाणें अिंग्रज सरकारचा, या आमच्या राज्यक्रांतीच्या गुप्त चळवळींत टिळकांना गुंतवावयाचा हेतु अुघड होता. ऱ्यांडचा वध करणाऱ्या चाफेकरांना टिळकांची मदत असावी, असा सरकाराला संशय होताच. आणि चाफेकरांच्या मुलांना द्रव्यसाहाय्य टिळक करीतहि असत. त्यामुळें तेव्हांपासून सरकार टिळकांना राज्यक्रांतिकारक समजत होतेंच. पण त्यांना अशा क्रांतिकारकांच्या जाळ्यांत अडकवण्याची संधि कधीं मिळाली नव्हती. 'राज्यक्रांतीचा' महाराष्ट्रांतला हा पहिलाच खटला. त्याच्या अगोदर १९०८ मध्यें त्यांना केसरींतल्या लेखांबद्दल ६ वर्षांची शिक्षा सरकारनें दावर जज्ज मार्फत दिलीच होती. पण त्यानें फक्त लेखांतला 'राजद्रोह' ठरला; टिळकांचा क्रांतिकारकांशी संबंध जुळला नाहीं. म्हणून या खटल्यांत त्यांचें नांव कुठें तरी गोवावयाचें ही पोलिसांची खटपट होती. १९०६ मध्यें टिळकांची व आमची गुप्त बैठक झाली होती. या खटल्यांत गणूनें तें पोलिसांस सांगितलें होते. अनंतराव कान्हेऱ्यांनीं 'केसरी', 'काळ' वाचून अिंग्रजी अधिकाऱ्यांविरुद्ध आपलें मत झाल्याचें, व ज्याक्सनचा वध नंतर केल्याचें, कबूल केलें होतें. तेव्हां या खटल्यांत जर टिळकांचें नांव गुंतवतां आलें तर सरकारला हवें होतें. गणू हा हुकमी पत्ता सरकारजवळ होताच. त्याच्या जबाबांत त्यांनीं टिळकांचें नांव आणलें. हा जबाब जेव्हां पळशीकरांसमोर गेला तेव्हां,

टिळकांचे नांव त्यांत पाहतांच, गणूवर ते खेकसले; व "गाढवा. त्या महात्म्याचे कां नांव घेतोस, शरम वाटत नाही तुला" असें म्हणून, टिळकांचे नांव खोटेंच गुंतवलें होतें हें त्याच्याकडून कबूल करून घेऊन,तें त्याला खोडावयास लावलें. आणि अशा प्रकारें टिळकांचा संबंध या खटल्यांत आला नाहीं. पण सरकारचा हा डाव हुकला तरी पुन्हा चिरोलवर जो टिळकांनी खटला केला होता त्यांतहि पुन्हा सरकारनें चिरोलतर्फे गणूची साक्ष या मुद्दयाबद्दल काढलीच होती. पण यावेळीं गणूनें तें सांगण्याचे स्पष्ट नाकारले. 'टिळकांच्या आठवणी 'त ती हकीकत मी दिलीच आहे. असो. आमच्यापैकीं 'जुलुमानें' घेतलेले कबुलीजबाब पळशीकरांनीं 'आरोपींनीं 'स्वखुषीनें' दिले' असें म्हणून शेरे मारले; पण त्याच पळशीकरांनीं टिळकांबद्दलचा जिव्हाळा मात्र दाखवला! आमच्यावरील खटल्यांत त्यांनी काय पुण्याई केली असली तर ती एवढीच. असो.

### ज्याक्सन-वधाबद्दल शिक्षा

धाकदपटशा, छळ, आणि भुलथापा यांनी सर्व साक्षीपुरावा गोळा केल्यानंतर पोलिसांना कळून आलें की, ज्याक्सन-वधाशी संबंध सर्वांचा जोडतां येत नाहीं. म्हणून अनंतराव कान्हेरे, कर्वे,देशपांडे,सोमण, वामनराव जोशी, गणू, आणि द. पां. जोशी या सातांवरच खुनाचा आरोप ठेवून तो खटला निराळाच केला. आणि तो अगोदरच अुरकून तिघांना फांशी, ३ जणांना काळे पाणी, व जोशींना २ वर्षे, अशा शिक्षा या स्पेशल ट्रायब्यूनलने दिल्या. झाल्या अेवढ्या शिक्षा या आरोपींना पुरे, असें समजून सरकारनें त्यांच्यावर, ते कटांत होते तरी, पुन्हा अिंग्रज सरकारविरुद्ध सशस्त्र बंड करण्याचा कटाचा खटला भरला नाही. पण त्याच खुनशीं व अधम अिंग्रज सरकारनें सावरकरांच्या बाबतींत तोहि विवेक दाखवला नाहीं. आमच्या कटाच्या खटल्यांत त्यांना जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा अेकतर्फी दिल्यावर — अेकतर्फी म्हणण्याचे कारण सावरकरांना, हेगच्या आंतरराष्ट्रीय न्यायासनासमोर त्यांचा खटला चालू असल्यानें, अिंग्रजांच्या कोर्टातल्या कामांत भाग घेणें शक्यच नव्हतें — पुन्हा सूडबुद्धीनें, त्यांच्यावर अिंग्रजांविरुद्ध 'युद्धास अुत्तेजन' दिल्याचा आरोप ठेवून, त्यांना पुन्हा अेकतर्फी निकालावर जन्मठेप व सर्वस्वापहरणाची (अिस्टेट जप्तीची) शिक्षा ठोठावलीच!! अिंग्रज सरकार

किती दुष्ट आणि अधम वृत्तीचें झालें होतें याची या सावरकरांच्या दुसऱ्या खटल्यावरूनच साक्ष पटते. असो. खुनाच्या खटल्यांत अंकुशकरला, व आमच्या खटल्यांत तो व जोशी यांना, माफीचे साक्षीदार केले होते. गणूला जन्मठेपीची शिक्षा दिली होती; पण, आमच्यावरील कटाच्या खटल्यांत त्याचा राजसाक्षी म्हणून अुपयोग करावयाचा असल्यानें, ती रद्द करून ३ वर्षें साधी शिक्षा त्याची केली. आणि त्याला आमच्या खटल्यांतला 'अडला दुवा' करून ठिकठिकाणी जरूर पडेल तसा त्याचा अुपयोग करून घेतला.

### सशस्त्र क्रांतीचा कट

खुनाचा खटला संपल्यावर आमच्यावर "अिंग्रज सरकारविरुद्ध सशस्त्र युद्ध करण्यासाठी कट केल्याचा" १२१ ते १२३ या कलमांतले मुख्य आरोप ठेवून, शस्त्रास्त्रांचा कायदा, आणि स्फोटकास्त्रांचा कायदा हेहि लादून, सरकारी कारवाअी सुरू झाली. अिंग्रज सरकारविरुद्ध 'युद्ध' केल्याचा आरोप आमच्यावर लादण्याचा पहिला हेतु होता. पण मागाहून अक्कल सुचल्यामुळें तो बेत रद्द केला. खास कोर्टानेंहि १२१ (अ) शिवाय बाकीचीं कलमे लागू पडत नाहीत, असें ठरविलें. त्यामुळें कटाचा पुरावा सुरू झाला. मित्रमेळा व अभिनव भारत यांचा मुख्य प्रारंभीचा कट. पण सरकारला मिळालेले साक्षीदारच असे होते की, त्यांना आमच्या संस्थेचें आरंभवर्षहि माहीत नव्हतें! वास्तविक मित्रमेळा १९०० मध्यें स्थापन झाला. १९०१ सालीं त्यानें जाहीर गणेशोत्सवहि केले होते. वृत्तपत्रांतहि ते गाजले होते. पण सरकारच्या 'गुप्त' पोलिसांना हे 'जाहीर' अुत्सवहि माहीत नव्हते! त्यांनीं मारून-मुटकून बनवलेला मित्रमेळ्याचा सभासद गोसावी यालाहि तें माहीत नव्हतें. गोसावड्यानें मित्रमेळा १९०३ मध्यें स्थापन झाला, आणि त्याचा तो मूळ सभासद होता, असें साक्षींत सांगितलें! आणि सरकारनेंहि तेंच खरे धरलें! दुसरा खोटा साक्षीदार अमरसिंग. हा मुळीं पोलीसच होता. त्यानेहि ठोकून दिलें की, तो मित्रमेळ्याचा सभासद होता; आणि (बाळ) नारायणराव सावरकर हे मित्रमेळ्याचे मूळ सभासदहि होते! वास्तविक बाळ तेव्हां १२–१३ वर्षांचा मुलगा होता. तेव्हां तो मूळ सभासद असणें हे अशक्य होतें. हें कोर्टालाहि पटलें. बाळ सावरकराशीं आपली जानी दोस्ती होती असें म्हणणाऱ्या या साक्षीदाराला बाळला ओळखतांहि

आलें नाही ! तेव्हां सरकारतर्फेची त्याची साक्ष रद्दच ठरली. तिसरा साक्षीदार धानाप्पा वाळवे. पण त्यानें अगदीच त्रोटक हकीकत सांगितली. अेवंच, पुष्कळसा आमच्याविरूद्ध असलेला पुरावा असा बनावटच होता. पण आम्हांला तो खोडून काढणें अशक्य होतें.

आमचें अगतिकत्व

कारण आमचा गुप्त कट राजाविरुद्ध बंड करण्यासाठीं होता, हें स्पष्टच सरकार म्हणत होतें. आम्ही तें खोडून काढणे म्हणजे सरकारी साक्षीदार खोटें आहेत हे ठरवण्यासाठी आमचे साक्षीदार बोलावणें. आणि त्यांना बोलावयाचें म्हणजे त्यांनी आपण गुप्त कटांत होतों हें प्रथम कबूल करून मग, सरकारी साक्षीदार खोटें बोलतात, खरी वस्तुस्थिति अशी अशी आहे, हें शपथेवर सांगणें. गुप्त कटांची ती कबुली त्यांच्याच विरुद्ध प्रथम जाअून तेच आमच्या बरोबर, किंवा नंतर, आरोपी म्हणून यावयाचे, अशी तेव्हां धास्ती होती. मग हें दिव्य कोण करणार ? आणि करून तरी अुपयोग काय होणार तें दिसतच होतें. म्हणून आम्हांला सरकारी साक्षीदार खोटे आहेत, हें सिद्ध करणें अशक्यच होतें. सरकारतर्फे आलेल्या गुप्त कटांच्या या २ मानीव सभासदांना सरकारनें माफी देणें, हें त्यांच्या हातचें होतें. पण आमच्यातर्फे आलेल्या सभासदांना आम्ही थोडेच माफी देअू शकत होतों ? अुलट त्यांना सरकारच्या जबड्यांत लोटण्यासारखें आमचें काम झालें असतें. म्हणून आम्हांला सरकारी साक्षीदारांचे वाभाडे काढणे अशक्यच होतें.

आमच्याप्रमाणेंच सावरकरांचीहि गत झाली होती. "मी मार्सेल्सला अुडी टाकून पोहून किनाऱ्यावर लागल्यावर फ्रान्सच्या हद्दीत होतों. तेथें पकडण्याचा इंग्रज सरकारला अधिकारच नाहीं", असें त्याचें म्हणणें होतें. आणि आंतरराष्ट्रीय कायद्याचा हा प्रश्न असल्यामुळें तो हेगच्या आंतरराष्ट्रीय न्यायालयापुढें अिंग्लंड व फ्रान्स यांनी मांडला होता. या प्रश्नाचा जर सावरकरांना अनुकूल निकाल लागता तर अिंग्रज सरकारला त्यांना मुक्त करून फ्रान्सच्या हवाली करणें प्राप्त होतें. आणि म्हणून सावरकरांनीं ब्रिटिश सरकारचा, व म्हणून ब्रिटिश कोर्टाचा, अधिकार न मानणें, हेंच कायदेशीर होतें. कारण तो मानला तर हा हेगचा सर्वच खटाटोप व्यर्थ जात होता. म्हणून कोर्टातल्या कामांत, या परिस्थितीमुळें, "मला हेगचा

निकाल लागेपर्यंत, भाग घेणें शक्य नाही ", असें त्यांनी कोर्टाला स्पष्टच सांगितलें. पण त्यांना चिरडण्यासाठीं सरकार टपलेंच होतें. तें आपल्या हातांत सांपडलेली शिकार कशी जाअूं देणार? अगदीं कांटेकोर न्यायाप्रमाणें म्हटले तर त्यांच्यावरचा खटला हेगच्या निर्णयापर्यंत स्थगित करणें हेंच या खास 'न्याय'-कोर्टाला शोभलें असतें. पण न्यायाधीश झाले तरी ती माणसेंच. कोर्टातले दोन न्यायाधीश कट्टे अिंग्रज व त्यांचें तोंडीं लावणें तिसरे चंदावरकर. ते अिरसाल मवाळ व सरकारजमा झालेले. ते कसे अितका न्याय सावरकरांसारख्या अिंग्रजांच्या कडव्या शत्रूला दाखवतील? त्यांनीं पळवाट काढून सावरकरांचा मुद्दा मान्य केला नाहीं, आणि सावरकरांवरील काम पुढे चालविलें! त्यामुळें सावरकरांना दोन्हीहि खटल्यांत अगदी मुग्ध बसावें लागलें. आणि निर्लज्ज-पणें या खास 'न्याय'कोर्टानें त्यांच्याविरुद्ध अेकतर्फी निकाल व 'न्याय' दिला!

शिवाय कायद्यांतल्या अेका कलमाप्रमाणें, जेव्हां अनेकांविरुद्ध खटला चालू असतो तेव्हां, त्यांच्यापैकीं अेकानें पुरावा दिला, आणि बाकीच्यांनीं न दिला, तरी सर्वांच्या विरुद्ध आरोपीतर्फेच्या वकिलांच्या भाषणाला सरकारी वकिलाला पुन्हा अुत्तर देण्याचा हक्क असतो. कोणाहि आरोपींनीं पुरावा दिलाच नाहीं तर हा हक्क सरकारी वकिलाला नसतो. आमच्यातर्फे पुरावा देण्याच्या अडचणी वर सांगितल्याच आहेत. पण मला माझ्यावरचा चतुर्भुजच आरोप चांगला खोडतां आला असता. कारण ज्यावेळीं त्यानें माझी गांठ घेतली, व पिस्तुलांबद्दल त्याचें माझें बोलणें झालें, असें तो म्हणत होता, त्या नेमक्या तासाला व तारखेला, मी मुळी ग्रांट मेडिकल कॉलेजमध्यें हजर होतों. आणि हजरीपटावर माझी हजरी नोंदलेलीहि होती. मी तो हजरी-पटाचा पुरावा दाखवूं अिच्छित होतों. पण त्या अेका गोष्टीसाठीं, बाकी-च्यांनीं कोणीहि पुरावा दिलेला नसल्यानें, आमच्या बचावातर्फे जीं मुद्देसूद भाषणें आमचे बॅरिस्टर करणार होते, त्यांना अुत्तरें देअून, तीं खोडण्याचा हक्क सरकारी वकिलाला मिळाला असता. आणि त्यामुळे कोर्टाच्या मनावर आमच्या बॅरिस्टरांच्या मुद्देसूद भाषणाचा जो कांही अिष्ट परिणाम होण्याचा संभव होता त्याला खो बसता. म्हणून मला माझ्या मित्रांनीं व वकील-बॅरिस्टरांनीं गळ घातली कीं, तो पुरावा देअूं नये. आणि मला त्यांचें म्हणण्याला, नाअिलाजानें, मान तुकवावी लागली.

माझ्याविरुद्ध निकाल देतांना, या पिस्तुलाच्या मुद्द्यावर, भटांतर्फे पुरावा आला नाही, असें निकाल-पत्रकांतहि कोर्टानें म्हटलें आहे. आणि चतुर्भुजचें म्हणणें खरें धरून त्या मुद्द्यावर माझ्याविरुद्ध निकाल दिला आहे. मला अद्यापहि वाटतें की, हा मुख्य मुद्दाच जर माझ्या म्हणण्याप्रमाणें मला अनुकूल ठरता, आणि चतुर्भुज खोटा ठरता, तर कदाचित् मला हरिभाऊ थत्ते यांच्याप्रमाणें संशयाचा फायदा मिळून मी दोषमुक्त झालों असतों, किंवा निदान शिक्षा तरी कमी झाली असती. पण मला बहुमताचें अैकावें लागलें. आणि त्याचा भूर्दंड ५ वर्षे शिक्षा भोगावी लागली! 'कायदा गाढव असतो' अशी जी अिंग्रजीत म्हण आहे, तिचा पुरा अनुभव सावरकरांना व मला असा आला. असो.

## बॅ. बॅप्टिस्टांचे अुपकार

आमच्यासाठी बॅ. बॅप्टिस्टा यांनी जें आपुलकीने, निःस्वार्थाने, कळकळीने आणि अतिशय हुषारीनें कोर्टात काम केलें त्याबद्दल त्यांना आमच्या कृतज्ञतेची पुष्पांजलि वाहणे माझें कर्तव्य आहे. आमच्यापैकी पुष्कळसे अगदीं गरीब, निष्कांचन, होते. पण अेक पैहि न घेतां, अशा दरिद्रयांचें काम त्यांनीं मनोभावानें केले. "वकीलपत्रावर फक्त सही, आणि असेल ती माहिती, द्या आणि माझ्यावर विश्वास टाकून निर्धास्त असा", असें त्यांनी आमच्यापैकी पुष्कळांना आश्वासन दिलें, आणि त्यांचे कामहि केलें. या त्यांच्या निरपेक्ष सेवेबद्दल आम्हां सर्वांच्याच मनांत अत्यंत आदर वसत होता. बॅ. सावरकरांचें सर्व काम त्यांनी असेंच पूर्ण निरपेक्षतेनें केलें. त्यावेळी आमच्यातर्फे कोर्टात अुभें राहण्यासहि वकील-बॅरिस्टर भीत होते. अशा वेळीं या वृद्ध त्यागी देशभक्तानें पुढे येअून आमचा व अितर वकील-बॅरिस्टरांचा मार्ग सुकर केला, याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावे तितके थोडेच. अितरहि बॅरिस्टर-वकिलांनी त्यांचें धाडस पाहून आमचीं वकिलपत्रे घेतलीं. पण टक्के मोजून घेतल्यावर! बॅप्टिस्टाकाका व अितरेजन यांमध्यें हा फरक होता.

## न्यायाची विचित्रता व घाअी

आमच्या खटल्याच्या निकाल-पत्रकांत पुष्कळसा भर आरोपींच्या कबुलीजबाबांवरच दिलेला आहे. अितर स्वतंत्र पुराव्यानें आरोपींच्या कबुली-

जबाबाची शाबिती झाली तरच कबुलीजबाब विश्वासार्ह मानावे, असा पुराव्याच्या कायद्यांत सर्वमान्य संकेत आहे. आणि तोहि हिंदुस्थानांतले पोलीस आरोपींस छळून कबुलीजबाब घेतात, हें निदर्शनाला आल्यावरून रूढ झालेला आहे. पण आमच्या खटल्यांत परस्परांच्या कबुलीजबाबांनीं कबुलीजबाब सिद्ध मानून आरोप सिद्ध झाले, असा कोर्टानें निष्कर्ष काढला होता. पुढें कित्येक वर्षांनी, मी १९१५ त सुटून आल्यावर, हायकोर्टांत अेका खटल्यांत कबुलीजबाबांच्या शाबितीचा प्रश्न निघाला होता. आणि वकिलांनीं, आमच्या खास कोर्टानें दिलेल्या निकालाचा आधार घेअून, स्वतंत्र पुराव्यानें कबुलीजबाब सिद्ध न झाले तरी ते विश्वासार्ह मानावे, असा मुद्दा त्यावेळचे न्यायमूर्ति शहा यांच्यापुढे मांडला. न्यायमूर्ति शहांनी त्यावेळी अुद्गार काढलेले प्रसिद्ध आहेत कीं, "१९१० चा खास कोर्टाचा निकाल विशिष्ट परिस्थितीत दिला असल्यानें मी तो मुळींच मानीत नाहीं!" या स्वतंत्र बाण्याच्या न्यायमूर्ति शहांच्या शालजोडींतल्या अहेरावरून आमच्या खास कोर्टाच्या निर्णयाची किंमत पुढच्या कालांतल्या स्वतंत्र वृत्तीच्या न्यायमूर्तींनीं किती मानली होती, याची वाचकांना कल्पना येअील. त्यांतहि आरोपींचा छळ झाल्यामुळेच हे कबुलीजबाब दिले आहेत, असें याच आमच्या कोर्टाला, कांहीं कांही बाबतीत तरी, वाटले होतें, हें त्यांच्याच अेका निर्णयावरून दिसतें ( करंदीकरकृत सावरकर-चरित्र, पान ४३२ ). आणि या कोर्टानेंच पळशीकर-खोपकर या म्याजिस्ट्रेटांना या कबुलीजबाब घेण्याच्या पद्धतीबद्दल कसें तासलें होतें, हेंहि त्या ग्रंथांतच ( पृ. ४३३–३४ ) दिलें आहे. असें असूनहि या कबुलीजबाबांवर कोर्टानें विश्वास ठेवला तरी कसा, याचेंच आश्चर्य वाटतें. याबद्दल पुढें परिशिष्टांत अधिक वर्णन दिलें आहे.

या खास 'न्याय'कोर्टाची निकाल जाहीर करण्याची घाअीहि अशीच विलक्षण होती. २१–१२–१९०९ ला ज्याक्सनचा वध होअून पकडापकडीला सुरुवात झाली. आणि तेव्हांपासून आम्हांला पकडून तब्बल १ वर्ष पुरें होअीतों या खटल्याचें काम चाललें होतें. १५–९–१९१० ला या खास कोर्टांत आमच्या कामाला प्रारंभ झाला, आणि आमच्यातर्फेच्या बॅरिस्टरांचीं भाषणें २२–१२–१९१० ला संपलीं. १२ महिने चाललेल्या, व ३५ आरोपी असलेल्या, या अभियोगाबद्दल पूर्ण विचार करून निर्णय देण्याला कोण-

त्याहि कोर्टाला निदान ८–१५ दिवस तरी सहज लागले असते. पण २२–१२–१९१० ला, आमच्या बॅरिस्टरांचीं भाषणें संपलीं न संपलीं तोंच, २४–१२–१९१० ला, आमच्यावरील सर्व प्रचंड पुराव्याचें मंथन करून, या कोर्टानें आपला निकालहि जाहीर केला! अेका चोवीस तासांच्या प्रचंड व प्रदीर्घ कालावधींत या न्यायमूर्तींनीं, आमच्याविरुद्ध असलेल्या पुराव्याच्या सागराचें मंथन करून, चुटकीसरशी आपला निर्णय कसा दिला, ही गोष्ट लोकांना विस्मयास्पद तर वाटलीच, पण कोर्टाच्या 'न्याया'बद्दल शंकास्पदहि झाली. आणि त्यामुळें या खटल्याचा निर्णय अगाअूच ठरला होता, असे लोकप्रवादहि अैकूं येअूं लागले. या तडकाफडकी दिलेल्या निर्णयानें लोकांचें अिंग्रजी न्यायपद्धतीबद्दल वाअीट मत झालें असलें तर त्यांत लोकांचा दोष काय?

### अिंग्रज व हिंदी पोलीस

असो; या आमच्यावरील चाललेल्या खटल्याबद्दल लिहावें तितकें थोडेंच. सरकारी जुलमाचा कोळसा कितीहि अुगाळला तरी तो काळाच ठरणार. म्हणून हे प्रकरण येथेंच आटपतें घेतों. पण अेका गोष्टीबद्दल मात्र अुल्लेख केल्याशिवाय राहवत नाहीं. ती म्हणजे अिंग्लंडमधील पोलिसांची आरोपींशीं वागणूक आणि आमच्या पोलिसांची वागणूक यांतला फरक. जेव्हां हुतात्मा धिंग्राला कर्झन वायलीचा खुनी म्हणून पकडलें तेव्हां त्याचा अिंग्रज पोलिसांनीं कोणताहि छळ केला नाहीं. अितकेंच नाही, तर अुलट तेथल्या पोलिसांनीं त्यांना बजावलें कीं, – "जी जी गोष्ट तुम्ही, खुषीनें का होअीना पण, आमच्याजवळ सांगाल ती आम्ही तुमच्याविरुद्ध अुपयोगांत आणूं. काय सांगावयाचें किंवा न सांगावयाचें याबद्दल तुमच्यावर सक्ति नाहीं!" कोठें ही अिंग्रज पोलिसांची भलाअी व सुजनता आणि कोठें आमचा अनन्वित छळ करून पुरावा गोळा करूं पाहणाऱ्या आमच्या पोलिसांची क्रूरता व अधमपणा! तसेंच स्कॉटलंडयार्डचा सावरकरांविरुद्ध आणलेला साक्षीदार पार्कर यानेंहि, सावरकरांना अधिक गुंतवण्यासाठीं, खोटें बोलण्याचें साफ नाकारलें, आणि स्पष्ट सांगितलें कीं, चतुर्भुजनें आणलेलीं पिस्तुलें सावरकरांनीं विकत घेतलीं नव्हतीं! त्याच्या सर्वस्वीं अुलट आमच्या पोलीस अधिकाऱ्यांचें वर्तन होतें. त्यांच्या साक्षींत खऱ्याखोट्याचा विधिनिषेधच

नव्हता ! हल्लींचे पोलीस अधिकारी पूर्वीपेक्षां सुधारले आहेत, पण ते अधिक सत्य व न्यायनिष्ठ झाले तर स्वतंत्र हिंदुस्थानला ते भूषणच होतील.

### बंड केल्याबद्दल झालेल्या शिक्षा

या खटल्यांत सरकारविरुद्ध उठलेल्या बंडखोरांना 'न्याय'मूर्तींनीं दिलेल्या शिक्षा व आरोपींचीं नांवें येणेंप्रमाणें :–

१ बॅ. विनायक दामोदर सावरकर (५० वर्षें काळे पाणी), २ केशव श्रीपत चांदवडकर (१५ वर्षें), ३ त्र्यंबक गंगाधर मराठे (१० वर्षें), ४ कृष्णाजी गोपाळ खरे (१० वर्षें), ५ गोपाळ कृष्ण पाटणकर (१० वर्षें), ६ व्यंकटेश परशराम नागपूरकर (७ वर्षें), ७ विष्णु महादेव भट (५ वर्षें), ८ सखाराम दादाजी गोऱ्हे (५ वर्षें), ९ दामोदर महादेव चंद्रात्रे (५ वर्षें), १० पुरुषोत्तम लक्ष्मण दांडेकर (५ वर्षें), ११ गोपाळ गोविंद धारप (५ वर्षें), १२ श्रीधर वासुदेव शिधये (४ वर्षें), १३ वामन काशिनाथ पाळंदे (४ वर्षें), १४ दामोदर चिंतामण परांजपे (४ वर्षें), १५ रघुनाथ विद्याधर भावे (४ वर्षें), १६ विष्णु गणेश केळकर (३ वर्षें), १७ काशिनाथ दाजी टोणपे (३ वर्षें), १८ अनंत विष्णु कोनकर (३ वर्षें), १९ विश्वास बळवंत डावरे (३ वर्षें), २० पुरुषोत्तम वामन गोखले (३ वर्षें), २१ विनायक गोविंद तिखे (२ वर्षें), २२ बळवंत रामचंद्र बर्वे (२ वर्षें), २३ सखाराम रघुनाथ काशीकर (२ वर्षें), २४ विनायक वासुदेव मनोहर (६ महिने), २५ गंगाराम रूपचंद (६ महिने), २६ रघुनाथ चिंतामण अंबडेकर (६ महिने), २७ नारायण दामोदर सावरकर (६ महिने). अेकूण ३८ आरोपींपैकीं ११ दोषमुक्त म्हणून सोडून दिले.

### साध्या चुकीचे घनघोर परिणाम

ब्रिटिश सरकारविरुद्ध आम्हीं बंड अुभारलें होतें, तेव्हां केव्हां तरी हा प्रसंग आमच्यावर कोसळणारच होता. मला हें स्वप्न पडत होतें म्हणून मीं डॉक्टरीचा अभ्यास पत्करला होता, हें मागें सांगितलेंच आहे. पण तो प्रसंग, आमच्या योजनेप्रमाणें सर्व होअून, सरकारला चांगलाच हात दाखवल्यावर झाला असता तर आम्हांला त्याचें बाअीटहि वाटलें नसतें. आम्ही आपल्या प्राणांची अंजली घेअून स्वातंत्र्यलक्ष्मीला अर्पायला सिद्ध होतों.

पण आमच्या प्राणांची, आमच्या सर्वस्वाची, होळी होत असतां शत्रूचाहि पुरा वचपा घेतल्याचें श्रेय आम्हांस हवें होतें. आणि आम्हांला सर्व देशभर, निदान देशांत पुष्कळ ठिकाणीं, अेकदम अुठावणी करून, अिंग्रज सरकारला हादरून भेदरून टाकण्याची योजना, बंगाली क्रांतिकारकांशीं हातमिळवणी करून, अमलांत आणावयाची होती. तिच्यासाठीं आम्हीं बरेंचसें साहित्य – शस्त्रास्त्रें – जमवलें होतें व जमवीतहि होतों. त्याचा व्याप किती होता हें मागें आलेंच आहे. तो आणखी वाढवण्याची, ठिकठिकाणीं त्याचे सांठे करण्याची, आमची तयारी वाढत चालली होती. आणि पुरेसा सांठा होअीपर्यंत, आणि बंगाली क्रांतिकारकांचें सहकार्य मिळून सर्व सिद्धता पुरी होअीपर्यंत, आम्ही दबा धरून बसलों होतों. पण आमचें भवितव्य निराळें होतें. आमच्या धुरंधर कर्व्यांच्या आश्वासनांवर आम्हीं विसंबून असतां, त्यांना असा अेकदम अपघाती मोह होअील, अशी आम्हांस कल्पना नव्हती. अकालिक आणि वैयक्तिक अुठावणी ही आम्हांला, आमच्या योजनेला, त्यावेळीं तरी, घातक होती. पण कर्व्यांना ती करण्याचा मोह झाला आणि त्यांनीं ज्याक्सनचा वध घडविला. हा अचानक झाला हें खरेंच. पण त्यांना तरी काय कल्पना कीं, पूर्ण दूरदृष्टीनें त्यांनीं जी या वधाची योजना, शक्य तितक्या कसोशीनें, ठरविली ती अनंतराव कान्हेऱ्यांनीं, सहज कीर्तिलोलुपतेमुळें, सांगितलेल्या नांवगांवावरून अितकी घातकी ठरेल! अनंताला तरी काय कल्पना कीं, कर्व्यांच्या अिशाऱ्याविरुद्ध घडलेल्या थोड्याशा चुकीनें, अेवढा कल्लोळ अुठेल? अनंताबरोबर आलेलीं दोन मुलें जर स्टेशनवर न जातां गांवांतच ७–८ दिवस राहतीं तर कांहींच घडलें नसतें. बरें त्या दिवशीं सकाळच्या गाडीनें शेंकडों लोक मुंबअीस गेले होते. कोणाहिबद्दल पोलिसांना शंका आली नव्हती. पोलिसांना तरी ही शिकार अगदीं अकल्पित सहजासहजीं सांपडली. पोलिसांचा कावळा बसावयाला आणि आमच्या दैवाची फांदी मोडावयाला अेक गांठ पडली. आमच्या सर्वांच्या दुर्दैवाचा तो अेक भयानक सहज अेका तासांतला खेळ होता. साध्या चुकीचें, पण अत्यंत भयंकर परिणामकारी, असें प्रायश्चित्त आम्हांस मिळेल अशी कल्पनाच कोणाची नव्हती. यामुळें पुष्कळसा आमच्या दुर्दैवानेंच हा आमचा छळ आरंभला होता असेच म्हणावें

लागतें. त्या दुर्दैवाचे खेळ पुढच्या प्रकरणांत विस्तारानें येतील. पण किरकोळ शिस्तभंगाच्या मामुली चुकीचे अितके घनघोर परिणाम होतील हें कोणाच्याच स्वप्नांतहि नव्हतें. ते परिणाम दृष्टीस पडल्यावरच कर्व्यांनीं आपणांवर फांशीची शिक्षा ओढवून घेतली. अेका घुंगरुटाला मारण्यामुळें आमच्या सर्वस्वाचा नाश झाला, हें त्यांना सारखें बोचत होतें.

## अभिनव भारताची योजना

अभिनव भारताचें राजकीय धोरण, योजना, काय होती याचें खुद्द सावरकरांनींच आपल्या आत्मवृत्तांत वर्णन केलें आहे. ते म्हणतात, "त्या सशस्त्र क्रांतीची योजना तरी कोणती ? ... ... जी माझिनी, आयर्लंड, आणि रशियांतील क्रांतिकारक ... ... आचरीत होते, आणि १८५७ च्या क्रांतियुद्धांत भारतानें आचरून दाखविली. त्या योजनांच्या आधारें तेंच गनिमीकाव्याचें धोरण ... ... सैन्यांत :आणि पोलिसांत क्रांतीचा प्रसार आणि गुप्त क्रांतिकारकांची भरती करणें, ... परराष्ट्रांशीं संधान बांधणें, अिंग्रजी सत्तेच्या केंद्रावर आणि प्रतिनिधींवर वैयक्तिक छापे येतां जातां घालणें, संस्थानांतून आणि सरसीमेपलीकडे शस्त्रास्त्रांचे सांठे करून, मधून मधून शक्य होतांच, लहानमोठ्या अुठवण्या आणि बंडें करीत राहणें, त्यायोगें देशांत क्रांतीचे शिक्षण, मरणाचें बाळकडू, मरणाची क्षम्यता प्रदीप्तवीत शत्रूस राज्यशकट हाकणें अधिकाधिक धोक्याचें आणि दुर्घट करीत जाणें, आणि शेवटीं अेखाद्या महायुद्धांत अिंग्लंडचें बळ ... क्षीण होत असतां भारतांतहि निकराचें क्रांतियुद्ध पुकारून मुक्त होणें, ... पुन्हा फसल्यास पुन्हा तशीच अुठावणी घेणें, ही त्यावेळच्या आमच्या सशस्त्र अुठावणीची रूपरेखा होती. अिंग्रजांचें १०–५ लोक मारले कीं ते पळतील अशी दुधखुळी समजूत आम्हीं केव्हांहि करून घेतली नव्हती. पण आमची निष्ठा अशी कीं, तीस कोटि लोकांचें हें राष्ट्र. यांतील ... २ लक्ष वीर जरी अशा छाप्यानें ... वृकयुद्ध लढूं निघतील तर आपलें स्वातंत्र्य संपादन करूं शकतीलच शकतील" (पृ. २३० ).

वरील अुताऱ्यावरून "वैयक्तिक छापे", "लहानमोठ्या अुठावण्या आणि बंडें" मधून मधून करीत राहणें हें या योजनेंत समाविष्ट होतेंच. क्रांतीचें शिक्षण, मरणाचें बाळकडू, शत्रूस राज्यशकट हाकणें धोक्याचें

आणि दुर्घट करीत राहणे, आणि शेवटीं, अेखाद्या महायुद्धांत अिंग्लंडचें बळ क्षीण झालें असतां, भारतांत क्रांतियुद्ध पुकारून मुक्त होणें याच गोष्टी अनुक्रमें आम्ही करूं अिच्छित होतों. आणि बंगाली क्रांतिकारकहि त्याच रीतीनें कार्य करीत होते. त्यांत फसण्याचा संभव होताच. पण योजनाबद्धता असून तें फसणें निराळें, आणि योजना न करतां अेकदम अचानकपणे शत्रूच्या प्रतिनिधीवर वैयक्तिक छापा घालणें निराळे. योजनाबद्धतेंत आपले साथीदार सावध असतात आणि म्हणून शत्रूच्या हातांत सांपडत नाहींत. योजना नसल्यास ते सांपडतात. आणि हुतात्मा कर्व्यांनीं अचानकपणें योजलेल्या या छाप्यांत आम्ही कोणीच, नाशिकचे केळकरशास्त्रीसुद्धां, सावध नसल्यानें सांपडलों आणि सर्व खटाटोप वाया गेला. आमच्या स्वार्थत्यागाबद्दल पुरी किंमत आम्हांस मिळाली असती, शत्रूची आमच्या अितकीच नुकसानी झाली असती, तर आम्हांस कृतार्थता वाटली असती. पण युद्धांत, आणि राज्यक्रांतीसारख्या दीर्घकालीन युद्धांत, अशी केव्हां केव्हां फसगत होतेच. आणि त्या फसगतीमुळें भलतेंच नुकसानहि सोसावें लागतें. आमचें दुर्भाग्य होतें तें. पण आमची सेवा वाया गेली नाहीं. अंशतः तरी ती मातृचरणी रुजू झालीच आहे. कारण बायरन कवीनें म्हटल्याप्रमाणे

Freedom's battle once begun,
Bequeathed by bleeding sire to son
Though baffled off is ever won.

" स्वातंत्र्याचें युद्ध अेकदां सुरू झालें कीं, तें रक्तबंबाळ पित्यानें पुत्रांस शेवटची ठेव म्हणून दिलें जातें, आणि त्यांत कितीहि पराजय झाले तरी शेवटीं त्या युद्धांत विजय मिळतोच मिळतो. "

### तिचें अंतिम साफल्य

आमच्या रक्तबंबाळ पिढीनें पुढच्या पिढ्यांस तो स्वातंत्र्ययुद्धाचा ठेवा दिला; आणि, महात्माजींच्या आणि सुभाषचंद्रांच्या धुरिणतेखालीं, १९२० पासून १९४७ पर्यंत तो पुढच्या पिढ्यांनीं, पण आमच्या योजनेप्रमाणेंच वर्तून, त्यांत जय मिळवला आहे. आम्हांला त्यांतच समाधान आहे. कांहींसें निःशस्त्र प्रतिकारानें, सत्याग्रहानें, आणि कांहींसें अुठावणी, बंडें, करून, सैन्य फितवून, सुभाषचंद्र बोस यांनीं, अिंग्रजांस राज्यशकट

हांकणें दुरापास्त केलें. आणि दुसऱ्या महायुद्धांत अिंग्लंडचें बळ क्षीण होत असतां, १९४२ त 'चलेजावची' म्हणजे महात्माजींनीं Do or Die ची क्रांतीची, चळवळ अुठवून अिंग्रजांस जेरीस आणलें, आणि सुभाषबाबूंनीं सशस्त्र सैन्यच आसामच्या सरहद्दीवर आणून अिंग्रजांस त्राहि भगवन् करून सोडलें. आमचा बेत न फसता, आणि आम्हांला ४।५ वर्षे दबा धरून चढाअीची तयारी करतां आली असती, तर अशीच १९१४ ते १९१८ ची पहिल्या महायुद्धाची संधि अनायासें प्राप्त झाली असतां, आम्हीहि सशस्त्र क्रांतीच्या युद्धाची अुठावणी करूं शकलों असतों. पण ते भाग्य आमचें नव्हतें. अीश्वराची अिच्छाच तेव्हां भारत स्वतंत्र व्हावा अशी नव्हती. पण जरी तेव्हां आमच्या हातून भारत स्वतंत्र न झाला तरी आज तो झाला आहे, हेच आमच्या अल्पशा प्रयत्नाचें बक्षीस आहे. आणि त्यांतच आमचा संतोष आहे. अिंग्रज सरकारनेंहि आमच्या-विरुद्ध बंडाचाच आरोप करून आमचें अुद्दिष्ट काय होतें याची ग्वाही दिली आहे. आणि हे अुद्दिष्ट त्याच योजनेने, थोडीशीं कालमानाप्रमाणें निराळीं साधनें वापरून, महात्माजी व नेताजी यांनी साध्य केलें आहे.

## प्रकरण अकरावें

# अपयशाची कारणमीमांसा

असो. झाल्या त्या अनिष्ट गोष्टी होऊन गेल्या. त्यांचे भयंकर परिणामहि भोगले. कित्येकांच्या संसाराची राखरांगोळीहि झाली. कित्येक धारातीर्थी पतनहि झाले. पण आमच्या डॉक्टरी वैद्यशास्त्रांत रोगी मेल्यावरहि, शक्य असेल तर, त्याचें प्रेत फाडून आपलें रोगनिदान बरोबर होतें की नाहीं, हे पाहण्याचा प्रघात आमच्या शिक्षणक्रमांतच समाविष्ट असतो. त्याप्रमाणें पाहिलें तर आमच्या सभासदांची बौद्धिक तयारी, गुप्त मंडळ्यांच्या अस्तित्वाला व सातत्याला जितकी अवश्य असते त्यापेक्षां, पुष्कळच कमी ठरली असें म्हणणें भाग येते. त्याचें कारण अितकेंच कीं त्यांनीं, दर आठवड्यास किंवा अितर वेळींहि, गुप्त संस्थांच्या कारवायांचें शिक्षणच घेतलें नव्हतें. अभिनव भारताच्या कांहीं गुप्त बैठकींतून हें शिक्षण कटाक्षानें देण्यांत येत असें. 'बुद्धिर्यस्य बलं तस्य' हा आमचा विश्वास होता. युद्धशाळेमध्ये ज्याप्रमाणें हल्ल्याचें ( offensive ) आणि बचावाचें ( Defensive ) शिक्षण घोळून घोटून देण्यांत येतें, व अितर देशांच्या लढायांतील अुदाहरणें देअून सैनिकांचें प्रसंगावधान व

समयसूचकता वाढवण्याची शिकवण दिली जाते, तसेंच गुप्त संस्थांमधल्या सैनिकांनाहि दिलें पाहिजे. म्हणजेच संभाव्य अडचणींच्या वेळीं कसें वागावें, संकटांत कोणत्या युक्त्या-प्रयुक्त्या योजाव्या, हें सैनिकांस, विशेषतः सेनाग्रणींस, चटकन समजतें. प्रचलित सत्तेविरुद्ध अुठावणी करून क्रांति करणाऱ्या गुप्त संस्था म्हणजे गनिमीकाव्याच्या सैन्यांतले लहान लहान गटच होत. त्यांना या असल्या शिक्षणाची तर अतिशय आवश्यकता असते. आम्ही हें आमच्या कांहीं सभासदांना शिकवीत होतों. बाबा सावरकरांच्या झडतीत पाश्चात्य गुप्त संस्था व युद्धशास्त्रावरील जीं पुस्तकें सांपडलीं तीं या अुद्देशाकरितांच संग्रहांत ठेविलीं होतीं. आमचे सरकारी निवृत्तवेतनी मित्र रा. हरिभाअु रिसबूड म्हणतात कीं,' कै. अण्णासाहेब परांजपेच हीं पुस्तकें बाबांना देत असत. माझिनी, ग्यारिबाल्डी, यांच्या 'कारबोनारी', 'तरुण अिटली ' या गुप्त संस्थांची माहिती व फ्रेंच राज्यक्रांति, आयरिश गुप्त संस्था, डचांची स्वराज्यस्थापना, अमेरिकेंतल्या स्वातंत्र्यपूर्व गुप्त संघटना यांबद्दलचीं पारायणें आमच्या कांहीं साप्ताहिक सभांतून होत. समर्थ रामदासस्वामींनीं मठस्थापना कशी केली, व गुप्त संघ कसे प्रस्थापित केले, याचें दासबोधपठनहि वारंवार आम्ही करीत होतों. त्यामुळें अभिनव भारताचे बरेचसे सदस्य समयज्ञ व हजरजबाबी ( Resourceful ) होत असत. पण या कटांत समाविष्ट केलेल्या अितर गुप्त शाखांत हें शिक्षण देण्याचा फारसा प्रघात नव्हता. अुलट, व्याख्यानबाजी म्हणून त्यांची हेटाळणी होत असे. त्यामुळें दुर्दैवानें, भयंकर प्रसंग अचानक येअून ठेपल्यावर, हे सभासद गांगरून जाअून किंकर्तव्यतामूढ झाल्यास नवल नव्हतें. अगदीं पूर्वनियोजना करून दिली असली तरीहि कित्येकजण प्रसंगीं भांबावून जातात. मग ज्यांना नियोजन फारसें माहीत नव्हतें, आणि गुप्त कटांतल्या व्यवहाराचा अनुभव नव्हता, असे विशीच्या आंतले तरुण, अशा शिक्षणाभावीं, गांगरून गेले नसते तरच नवल. ज्यावेळेस पिस्तुलें विलायतेहून आलीं, व ज्यांस मीं तीं आणावयास सांगितलीं, त्या गोपाळराव पाटणकरांना मीं त्यावेळींच बजावलें होतें कीं, केव्हांहि, केवळ अपघातानें, वा दुर्दैवानें, तुमच्या हातीं शस्त्र सांपडेल, त्यावेळीं तें शस्त्र कोणाकडून आणलें असा पोलिसांनीं प्रश्न विचारल्यास कोणी तरी

नुकत्याच मेलेल्या आपल्या अेका मित्राचें नांव सांगून, त्यानें तीं दिलीं असें म्हणून, मोकळें व्हावें, म्हणजे तेथेंच सांखळी तुटते, आणि बाकीचीं शस्त्रें व माणसें बचावतात. पण हें सांगूनसवरून झालें असतांहि पाटणकरांनी त्यांचे मृत मित्र विठ्ठलराव मराठ्यांचे नांव भलत्याच ठिकाणीं सांगितलें ! आणि त्यामुळें त्या युक्तीचा कांहींच अुपयोग झाला नाही. बॉंबचा कारखाना कसा वांचवावा या विचारानें ते अगदीं भांबावून गेले होते. म्हणून ते ही युक्ति विसरले. त्यांच्यापेक्षां मग आमच्या माधवराव गाडगीळांनीं आपली समयज्ञता चांगलीच गाजवली. ग्वाल्हेरहून आणलेलें पिस्तुल गोदावरीच्या डोहांत फेकून दिलें, अशी थाप मारून त्यांनीं पोलिसांना तर चकवलेंच, पण पिस्तूलहि सुरक्षित ठेवलें. कै. शंकर पांडुरंग महाजनांनी असेंच समयज्ञतेचें अुत्कृष्ट दर्शन पोलिसांस चकवून घडवलें होतें. त्याचें वर्णन मागें आलेंच आहे. अनंतराव कान्हेऱ्यांनींहि औरंगाबादेस आपण अरबाकडून पिस्तुलें घेतली, अशी थाप देअून चांगलेंच प्रसंगावधान दाखवलें होतें. अशी समयसूचकता अितरांनीं दाखवली नाहीं. त्याबद्दलची त्यांनीं बौद्धिक तयारीच केली नव्हती. आणि अंतःस्फूर्तीहि कांहींची दिसून आली नाहीं. या बौद्धिक तयारीच्या आणि समयसूचकतेच्या अभावीं बरेच जण गांगरून गेले. आणि पोलिसांच्या युक्त्या-प्रयुक्त्या व छळांनीं बळी पडून कबुलीजबाब देअून, पोलिसांच्या जाळ्यांत पडले.

## पोलिसांचा अमानुष छळ

याप्रमाणें बऱ्याच सभासदांची बौद्धिक तयारी नसल्यानें ब्रह्मगिरी व बर्वे यांच्यासारख्या कांहीं भोळ्या सभासदांनीं, राजसाक्षींच्या थापांना बळी पडून कबुलीजबाबहि दिले ! पोलिसांच्या अमानुष छळाला बळी पडून, केवळ नाअीलाजानें, कबुलीजबाब त्यांच्यापुढें कित्येक वेळीं द्यावा लागतो. ते अेकपक्षीं क्षम्य म्हणतां येअील. आणि आमच्यापैकीं पुष्कळांचा असा भयंकर छळ पोलिसांनीं केलाहि (बाबा सावरकरांना तर विजेचे प्राणांतिक धक्केहि दिले असें त्यांच्या चरित्रांतच वर्णन आहे). तसेंच आमच्यापैकीं आज नाशकास प्रसिद्ध असलेले वैद्यरत्न विष्णुशास्त्री केळकर यांचाहि अमानुष छळ केला. त्यांची स्वतःची हकीकत त्यांच्याच शब्दांत येथें देतों.

ता. २५–१२–१९०९ रोजीं रात्रीं पकडलें. सरकारवाड्यामध्ये चणे-मुरमुरे भत्ता देऊन बसविलें. अंग-झडती अुघडें करून घेतली. हातांत बेड्या कायम ठेवून अैनं थंडींत बसवून ठेवलें होतें. मध्यरात्रीनंतर अल्लीखान, झारापकर, सदावर्ते, देशपांडे, निरनिराळे येअून हरतऱ्हेचे साधक-बाधक प्रश्न, शिवीगाळ, लाथा-बुक्या, वगैरे तऱ्हेचे त्यांचे चौकशीचे प्रकार होते.

झोंप तर घेअूं द्यावयाची नाहीं. हातांतल्या बेड्यांना दोरी बांधून वरती खुंटीला अडकवून ठेवायची. पाणीसुद्धां मिळायचें नाहीं.

ता. २६ ला दिवसा गायडर, कर्णिक, आठवले यांची चौकशी निराळ्याच प्रकारची, पण मारहाण नाहीं.

ता. २६ ला रात्री पुन्हा आधल्या दिवशींचाच प्रकार. विशेष म्हणजे बसवून डोकें जमिनीला टेकायचें व पाठीवर कॉन्स्टेबलला बसवावयाचें. मानेला कळ लागली म्हणजे रडायला यायचें. वरती पुन्हा थपडा, लाथा, असा प्रकार चालूच.

ता. २७ ला पुन्हा तसाच प्रकार. घरीं झडती वारंवार चालूच.

ता. २७ ला रात्री आणखी नवीन प्रकार.

दोन्ही पाय दोन्ही बाजूला फाकून ठेवायचे व त्यावर मनुष्य बसवून कबुली काढायची. जी काय थोडी माहिती मिळेल त्यावर पुन्हा दिवसभर चौकशी व्हायची. रात्रीं पुन्हा झोंप नाहींच. खुंटीला टांगून ठेवायचें. बसल्या बसल्या विश्रांति घ्यायची. लघ्वीलासुद्धां त्यांच्या मेहेरबानगीनें जायला मिळालें म्हणजे आनंद मानायचा. त्या चार दिवसांत परसाकडेसुद्धां व्हायची नाही.

ता. २८ ला मजजवळील पिस्तुल त्यांना मिळालें. नंतर मारहाणीचा प्रकार कमी झाला, पण त्यानंतर म्याजिस्ट्रेटपुढें कबुलीजबाब देण्याचा त्रास सुरू झाला. आपण न केलेली गोष्टसुद्धां कबूल करण्यास लावून पळशीकरांपुढे वारंवार न्यायचे. अमका मनुष्य तुमचें नांव सांगतो तेव्हां तुम्ही कां नाकबूल करतां वगैरे धाकधपटशा. या त्रासांतून मुक्त होण्याकरितां पळशीकर यांच्याकडे कबुलीजबाब झाला व त्रास कमी झाला ( केळकरांचा लेख ).

हातपाय पसरून त्यावर काठ्या ठेवून त्यांच्या दोन टोकांवर २ पोलीस बसवून मांड्यावर असंह्य भार टाकण्याच्या छळाला रा. केळकरांसारखे मोठमोठे तालीमबाजहि शेवटीं नमले. ( विष्णुशास्त्री हे अट्टल तालीमबाज होते ). पण या छळापुढें ते अगदीं गाय झाले. त्यांतहि ८–८ दिवस सक्तीनें जाग्रण पाडावयाचें. त्या जाग्रणानें माणसास मरण पत्करलें पण हा छळ नको, असें होआी. याशिवाय अेका मारवाडी गृहस्थाच्या मलद्वारांत मिरच्याची पूड घालण्याचा अमानुष प्रकारहि झालाच. गुह्य भागावरच्या केसांना काडी लावून पेटवून तेथें भाजण्याचा छळहि झाला. फांशी गेलेले देशपांडे हायकोर्टांत म्हणाले, "अलीखानानें हातरुमालाचा फांस लावून माझें वृषण दाबलें. खुर्चीप्रमाणें पण निराधार स्थितींत मला बसवण्यांत आलें. पाय पसरून, मागें हात बांधून दोन अिसम दोन पायांवर अुभे राहात." रा. धारप व चंद्रात्रे यांनींहि ज्याक्सन-वधाच्या खटल्यांतल्या साक्षींत हायकोर्टांत आपल्या छळांच्या हकीकती सांगितल्या. पण अितकें सांगूनहि पुन्हा त्यावेळच्या 'न्याय'कोर्टांतल्या स्पेशल जज्जांनीं या सर्वांचे कबुलीजबाब आपखुषीचे आहेत, पोलीस-छळामुळे दिलेले नाहींत, असें गृहीत धरलेंच! तत्कालीन न्यायमूर्ति – बेसिल स्कॉट, चंदावरकर व हीटन – किती न्यायी होते हें यावरून दिसेलच. असो.

आमच्या चौकशीसाठीं नेमलेल्या कांहीं पोलिस अधिकाऱ्यांचीं तर आरोपींस अुलटें विहिरींत टांगून ठेवल्याबद्दलहि ख्याति होती. हा छळाचा प्रकार मात्र आमच्या वेळीं झाला नाही. याशिवाय अंगावर कोणत्याहि खुणा न दिसतील अशाहि छळाच्या युक्त्या पोलिसांनीं शोधून काढल्या होत्या. त्यांपैकीं असह्य प्रकार म्हणजे ८–८ दिवस बिलकूल क्षणभरहि झोंप येअू न देणें हा होय. आमचे सॉलिसीटर थत्ते या छळानें गोगलगाय झाले. या अशा भयंकर असह्य छळामुळें पुष्कळांना कबुलीजबाब देणें भागच पडलें.

## कायद्याचें थोतांड

कायदेशास्त्राप्रमाणें पोलिसांपुढें दिलेला कबुलीजबाब, मारहाण करून घेतला असल्यास, म्याजिस्ट्रेटसमोर परत घेतां येतो. पण कायद्याच्या पुस्तकांतच हा कायदा राहतो. शिवाय आरोपीलाहि हें तत्त्व माहीत हवें. तेंहि आमच्यांपैकीं पुष्कळांना माहीत नव्हतें. आमच्या वेळचे देश-

द्रोही पळशीकरांसारखे, बढतीसाठीं सरकारची हांजी हांजी करणारे, म्याजिस्ट्रेट असले म्हणजे ते मुळीं या पोलीसापुढच्या कबुलीजबाबावरच सही घेत. आणि आरोपीनें हा 'स्वखुषीनें' दिलेला कबुलीजबाब आहे, त्याच्या अंगावर मारहाणीच्या खुणा नाहींत, असा सपशेल खोटा शेरा त्याखालीं ठोकून देत. (खुद्द म्याजिस्ट्रेटांच्या तोंडून हायकोर्टात हा सगळा प्रकार बाहेर आला होता. तरीहि हायकोर्टानें ते जबाब गृहीत धरलेच! करंदीकरकृत सावरकरचरित्र). पुढच्या कोर्टांत हे कबुलीजबाब मागें घेतां येतात. पण, त्यावेळीं त्यांचा फारसा उपयोग होत नाहीं. कारण, मूळच्या जबाबाप्रमाणें कांहीं खोटे साक्षीदार, कांहीं खराखोटा मुद्देमाल, अितर आरोपींचे पुष्कळसे सारखे दिसणारे कबुलीजबाब, हें सर्व पुराव्याचें बस्तान तोंपर्यंत पोलीस बेमालूम बसवून ठेवतात. त्यामुळें आरोपींना त्यांतून सुटणें अशक्यप्राय होतें.

जी गोष्ट म्याजिस्ट्रेटांची तीच सरकारी डॉक्टरांची. नोकरी टिकवणें, बढती मिळवणें, या स्वार्थासाठीं तेहि पोलिस अधिकाऱ्यांना वश असत. त्यांतून त्यांच्या कानापर्यंत आरोपीच्या मारहाणीची तक्रार पोंचेल व त्याच्या अंगावर खुणा दिसतील तर ते त्यांची नोंद करून ठेवणार. पोलिसांच्या अटकेंत आरोपी असतांना पोलीस आपण होऊन कशाला त्याला डॉक्टरकडे नेतील? आणि यदाकदाचित् नेलाच तरी अिंग्रज सरकारचा मिंधा डॉक्टर त्याच्यावर थोडीच दया दाखवणार आहे? आणि त्यांतहि अिंग्रज सरकार-विरोधी राज्यक्रांतीच्या आरोपींना दया दाखवली तर अिंग्रज सरकारनें डॉक्टरलाच आरोपी म्हणूनहि खेंचलें असतें, अशी तेव्हां भीति होती! मग डॉक्टरच्या तपासणीची आशाच कशाला? या आपत्तीमुळें डॉक्टरी तपासणीची कल्पना व्यर्थच होती. पण, आरोपी भयंकरच आजारी झाला तरच त्याला सरकारी दवाखान्यांत, पण कैदी म्हणून, पाठवीत. मला असेंच पाठवलें होतें.

पोलीस-छळानें जबरदस्तीनें दिलेल्या कबुलीजबाबांबद्दल हें झालें. पण सरकारनें गुन्ह्यांची माफी दिलेल्या राजसाक्षींच्या (Approvers) जबाबाबद्दल काय म्हणणार? आणि पोलिसांच्या थापांना भुलून दिलेल्या कबुलीजबाबाचें समर्थन कसें करणार? बौद्धिक तयारींत अशा कोणत्याहि

आमिषाला बळी पडूं नये, असें शिक्षण ठाकून ठोकून दिलें जातें. ज्यांना तें मिळालें होतें त्यांना या आमिषानें अेकदांहि मोह पाडला नांही !

आमच्या भोळ्याभाबड्या ब्रह्मगिरीबुवा चांदवडकरांना तर पोलिसांनी भुलथापांनी बरेंच फसवलें ! आणि त्यांतहि त्यांच्याविरुद्ध माफीचे साक्षीदार झालेले (आतां कै.) वासुदेव रामचंद्र कुळकर्णी ( हे बी. अे. अेल्‌अेल्‌. बी. गृहस्थ ८।१५ दिवस कुरुंदवाडचे म्याजिस्ट्रेट झालेले. ) यांनीं केवळ स्वार्थासाठीं, बुवांना, व बुवांची आज्ञा शिरसावंद्य मानणाऱ्या व मुलांप्रमाणे वाढवलेल्या रा. पाळंदे, परांजपे, शिधये या गृहस्थांनाहि, बुवांमार्फत हातोहात फसवलें ! या त्यांच्या गर्ह्य वर्तनाबद्दल त्यांना गुप्त कटांतली कोणतीहि शिक्षा कमीच ठरती. असो. सांगण्याचा मुद्दा अितकाच कीं, आमच्यापैकीं बऱ्याच जणांत बौद्धिक तयारीचा बराच अभाव होता आणि त्याचा परिणामहि अत्यंत भयंकर झाला.

## कळकळ म्हणजे कर्तबगारी नव्हे

पुष्कळशा संस्थांत सभासदांची ध्येयनिष्ठा, कळकळ, हीच बौद्धिक सामर्थ्याचें गमक समजली जाते. पण या गोष्टी अगदीं परस्परभिन्न आहेत. अेक असली म्हणजे दुसरी असतेच असें नाही. अेकावांचूनहि दुसरी असूं शकते. त्यांतहि शौर्य, धैर्य, मनुष्यस्वभावाचें ज्ञान, प्रसंगावधान, हजरजबाबीपणा या अवश्य गुणांचा समुच्चयहि संस्था-चालकांना अवश्य असतो. सैन्यांत हे नेतृत्वाचे गुण अंगीं बाणण्यासाठीं फारच खबरदारी घेण्यांत येते. सैनिकांना, व विशेषतः अधिकाऱ्यांना, या गुणांचा परिपोष होअील असें शिक्षण सतत चालू असतें. राज्यक्रांति म्हणजे प्रतिराज्याची तयारी. म्हणून क्रांतिकारकांनाहि असेंच शिक्षण देणें अवश्य असतें. आम्ही तें देत होतों. पण अितर कांहीं संस्थांत त्याचा पत्ता नव्हता. यामुळें गणू वैद्यासारख्या अत्यंत भेकड व नादान माणसास, केवळ देशस्वातंत्र्याच्या कळकळीच्या अेका मुख्य गुणावर, त्याच्या संस्थेंत जबाबदारीचीं कामें म्हणजे सभासद मिळवणें, हत्यारें जमवणें, ठेवणें, बॉंब तयार करणें वगैरे देण्यांत आलीं होतीं. औरंगाबादेस गणूनेंहि आपल्यासारखेच दुसरे नालायक सभासद करून घेतले होते. अनंतराव कान्हेरे यानें आपल्या अखेरच्या जबाबांत नेमकें यावरच बोट ठेवून सांगितलें आहे कीं, गणू वैद्यानें औरंगाबादेहून बोलावलेलीं व म्हणून त्यांच्या

( अनंताच्या ) बरोबर आलेलीं अंकुशकर व जोशी हीं, गणूअितकींच कच्चीं भित्रीं व नादान, " मुलें मजबरोबर आलीं नसतीं, व गणू वैद्य आमच्या कटांत नसता, तर प्राण गेला असता तरी मी कांही सांगितलें नसतें. " " मला जर कोणी पोलिसांनीं मारलें तर मी सर्व सांगून देअीन, " असे गणूच मजजवळ म्हणाल्याचें अनंतरावाने आपल्या जबानींत सांगितलें आहे ! आणि ज्याक्सनच्या वधाची बातमी जेव्हां रात्रींच गणूला कळली तेव्हां हे तिघेहि शेंदाड शिपाअी " फार घाबरले " आणि गणू तर " कांपत कांपतच वर आला " असे अंकुशकर व जोशीच आपल्या जबानींत म्हणतात ! आणि त्यांतहि सर्वांत मोठा त्यांच्या नालायकीचा पुरावा म्हणजे नेमके हेच तिघे माफीचे साक्षीदार झाले ! सांखळीचें सामर्थ्य तिच्यांतल्या कच्च्या दुव्यावर अवलंबून असतें ", अशी अिंग्रजी म्हण आहे तिचें बरोबर प्रत्यंतर या त्यांच्या गुप्त संघटनेंत आलें ! त्यांनी बुद्धिमत्ता व शूरत्वाखेरीज अितर गुणांच्या बाबतींत चांगली काळजी घेतली होती. निरनिराळ्या गटांच्या सभासदांना अेकमेकांची नांवेंहि कळूं नयेत, अशी गुप्त व्यवस्था त्यांनीं केली होती. पण नेतृत्वाच्या गुणांकडे पूर्ण दुर्लक्ष झाले होतें; आणि त्यामुळेंच गणूसारख्या भेकडालाहि :गुप्त संस्थेंत राहतां आलें; आणि, त्याच्या भीरुत्वाची हळूंहळूं प्रचीति येत असतांनाहि, त्याच्यावर महत्त्वाची कामें सोंपवलीं. ' अपात्री विश्वास ' हा आम्हांला असा सर्वतोपरी नडला.

## दुर्दैवाचा कहर

पण हें सर्व दोषाविष्करण केल्यावरहि आमच्या रहस्यस्फोटाचें बरेंचसें माप केवळ दुर्दैवावर टाकावेंच लागते. " विनाशकाले विपरीत बुद्धि " म्हणतात तेंहि, कांहीं अंशीं तरी, खरें मानणें भाग पडतें. त्याशिवाय माननीय व धुरंधर कर्व्यांच्या हातून अशा चुका घडल्या नसत्या. कर्व्यांना त्यांच्या परमपूज्य व दिव्यदृष्टि गुरुजींनीं ( कै. बिडकरमहाराज ) सांगितलें, बजावलें होतें कीं, १९०९ सालीं त्यानें कोणतेंहि असे साहसाचें काम करूं नये. ही त्यांची आज्ञा त्यांनीं कां मानली नाहीं, याला विनाशकाल आला होता म्हणून विपरीत बुद्धि झाली याशिवाय दुसरें अुत्तर नाहीं. कदाचित् त्यांनीं या आज्ञापालनासाठींच ३–१–१९१० ही १९०९ साल अुलटून गेल्याची तारीख ठरवली होती, अशी शंका येते. पण २१ डिसेंबरला अनंतरावच येअून ठेपल्यावर, आणि वधाई

ज्याक्सन हा २३ तारखेनंतर जाणार म्हणून, देशपांडे, सोमण प्रभृतींनीं घाओी करून तोच दिवस वधाचा मुक्रर केला. त्या प्रसंगीं त्यांनीं अनंताला दिलेली ताकीद व तयारी हीं कर्व्यांच्या दूरदृष्टीचें अुत्तम द्योतक आहे. पण कीर्तिलोभामुळें अनंतरावनें ती शिस्त मोडली, याबद्दल कर्व्यांना दोष देतां येत नाहीं. पण नंतर नाशकाहून अन्यत्र अज्ञातवास कर्व्यांनीं केला असता तरी भागलें असतें. पण तीहि बुद्धि त्यांना झाली नाही. अनंतरावांबरोबर औरंगाबादेहून आलेलीं २ मुलें घाओीघाओीनें परत न पाठवतां, कांहीं दिवस नाशकासच आपल्याकडे किंवा अितरत्र ठेवून घेअून, मग अितर लहान स्टेशनवरून त्यांची रवानगी करण्याचें ठरवलें असतें, तर हा सर्व घोटाळाच टळता. पण तीहि बुद्धि त्यांच्यासारख्या चतुरस्र माणसाला सुचली नाहीं. पण त्यांनीं गणू वैद्याला त्यांची रवानगी करून देण्याची जी योजना कळवली होती ती अुत्तम व निर्दोष होती. गणूच्या हातून, व त्याच्या भावाच्या कंजूषपणामुळें, ती लौकर पार पडली नाहीं हा दोष कर्व्यांचा नव्हे. आणि १ तासानंतर येणाऱ्या गाडींत हीं मुलें बसण्यापूर्वींच पोलिसांच्या तावडींत तीं सांपडतील ही गणूलाहि कल्पनां नसावी. असो. वध होण्यापूर्वी कर्व्यांनीं अगाअू आमचा सल्ला घेणें, वधाचा बेत कांहीं तासांत ठरल्यानें, शक्य नव्हतें हें खरें. पण वध झाल्यावर आम्हांस सावधगिरीची सूचना देणें शक्य होतें, ती त्यांनीं दिली नाहीं. अगदीं साध्या गोष्टींतहि बारकाव्याला जपणाऱ्या या विद्वान, चतुर, धाडसी गृहस्थाला यांपैकीं या प्रसंगीं, अेकहि सद्‌बुद्धि सुचूं नये, याचें राहून राहून सखेदाश्चर्य वाटतें. आणि "दैवेनोपहतस्य बुद्धिरथवा सर्वा विपर्यस्यति" या संस्कृत सुभाषिताच्या सत्याचा प्रत्यय येतो.

गणूच्याहि बाबतींत दुर्दैवाचा आघात चांगलाच प्रचीतीस येतो. अंकुशकर व जोशी या सोबत्यांना पाठवण्याच्या वेळी योग्य माणूस व १० रु. त्याच्याजवळ असते तर हें सर्व बिनबोभाट काम होण्याचा संभव होता. शेंकडों लोक सकाळच्या अेक्सप्रेसनें गेलेहि होते. पण शेंकडों रुपये कधीं कधीं जवळ असणाऱ्या गणूपाशीं त्याच दिवशीं १० रुपयेहि नव्हते! बरें, रात्रीं या पाहुण्यांसह आपल्या घराची सर्व झडती आपण घेअून, आपल्या घरीं संशयास्पद अेकहि वस्तु नाहीं अशी खात्री त्यानें करून घेतली होती; आणि तो दुपारीं रा. केशवराव परांजपे या मित्राच्या घरीं

जाऊन निजला होता. त्याच वेळीं सदाशिव दांडेकराला 'त्याच्याच' घरीं जाऊन, तो तेथें नसतां, त्याच्या बिछान्याखालीं ब्राउनिंग पिस्तुल व कोनाड्यांत ॲसिडें ठेवण्याची दुर्बुद्धि कां व्हावी? यांत, याला नियोजनाचा अभाव अंशतः जरी जबाबदार धरला तरी, कांहीं अंशीं तरी याला गणूच्या दुर्दैवाशिवाय काय अुत्तर आहे? हा मुद्देमाल कदाचित् घरीं झडतींत न सांपडतां तर गणू अितका भेदरलाहि नसता. निदान त्या बेकायदा वस्तूंचें स्पष्टीकरण करण्याचें तरी टळलें असतें; व तो कांहीं तरी धीर धरू शकला असता. पण भयंकर मुद्देमाल अचानक घरांत सापडल्यावर त्याची बोबडी वळली तर त्यांत नवल नाहीं. दुर्दैवाचा प्रभाव, कांहीं अंशीं तरी, यांत स्पष्ट दिसतो, हें म्हणणें भाग आहे.

आमच्या गोपाळराव पाटणकरांच्याहि बाबतींत दुर्दैवाचा पुष्कळांशीं फांसा पडला होता असें म्हणणें भाग पडतें. अंगावर पिक्रिकचे डाग असतांच ते कां पकडले जावें, याला कारण त्यांच्या दुर्दैवाशिवाय सांगतां येत नाहीं. बरें, त्यांना मीं अगाअू कळवलेली युक्ति — कोणी तरी मेलेला मित्र मध्यें घालून सांखळी तोडण्याची युक्ति — त्यांना त्यावेळीं आठवली नाहीं, हेंहि त्यांच्या दुर्भाग्याचेंच चिन्ह नव्हे तर काय? त्यांतहि त्याच वेळीं दैव कसें अुलटसुलट खेळ खेळत होतें याचें प्रत्यंतर आमचे गणपतराव काळे यांच्या अुदाहरणांत आहे. ते हातांत बॉंबचें सामान असतां, सद्बुद्धि होअून, त्याच केशवजी नायकांच्या चाळीच्या दुसऱ्या जिन्यानें अुतरत असतां, पहिल्या जिन्यानें पाटणकरांस पकडण्यास पोलीस वर आले! केवढी दैवाची अेकावर खैर तर दुसऱ्यावर भयंकर फेर! अेकाच क्षणीं, अेकाच स्थानीं, अेक सहज दैवाच्या लीलेनें तरतो तर दुसरा त्याच्या खाअींत पडतो! याला दैवाशिवाय काय अुत्तर देणार? तसेंच ८ वर्षें शिक्षा भोगून सुटण्याच्या आधीं १० महिनेच ते येरवड्यास अिन्फ्ल्यूअेंझानें वारले, आणि मला त्यांचें प्रेतच ओंकारेश्वरावर न्यावें लागलें! याला तरी दुर्दैव नाहीं तर काय म्हणावयाचें?

अुलट सर्वांत दैवाची मेहेरनजर झाली असेल तर आमच्या वसअीच्या बॉंब-कारखान्यांतील रामभाअू भाटे व त्यांचे सर्व साथीदार यांच्यावर. ते कसे आमच्या व सदावर्त्यांच्या कारवाअीनें निसटले तें मागें आलेंच आहे.

ते जर आमच्यांत सांपडले असते तर जन्मठेपीची शिक्षा त्यांना निश्चितच मिळती. ती तर टळलीच; पण उलट त्यांच्या सुदैवाने त्यांना जन्मभर सरकारी नोकरी व आज पेन्शनहि लाभलें ! ज्या सरकारावर तिलांजलि घेअून ते अुठले होते, ज्या सरकारचा बारावा ते घालणार होते, त्याच सरकारनें त्यांचें सरकारी नोकर म्हणून बारसें केलें ! हा विलक्षण दैवयोगच नव्हे काय ?

तात्या सावरकरांच्या बाबतीतहि दुर्दैवानें त्यांना फ्रान्सहून अिंग्लंडला येण्याची अशीच दुर्बुद्धि दिली. नंतर मार्सेलिसला दैवाचा असाच अुलटा डाव पडला. अगोदर ठरल्याप्रमाणें त्यांना सोडवण्यास आलेले त्यांचे स्नेही जरा अुशिरा येअून पोंचले! भर समुद्रांत अेवढ्या साहसानें अुडी टाकून, पोलिसांचा डोळा चुकवून, मैलभर पोहून, तीराला पोंचलेले सावरकर, थोड्या मिनिटांच्या अवधीसाठीं, २ जन्मठेपींच्या शिक्षेस पात्र व्हावें-हा केवढा भयंकर दुर्दैवाचा कहर म्हटला पाहिजे! कोठे तीं कांहीं मिनिटें, आणि कोठें हा १४ वर्षे हालअपेष्टांचा अखंड भडिमार! बाबांच्या दुर्दैवाला तर सीमाच नव्हती. दैवाचा आणि त्यांचा जन्मभर अुभा दावाच होता. त्यांच्या चरित्रांतलें त्याचें वर्णन कोणाहि सहृदय माणसाला पाझर फोडील. अंदमानांतल्या खोलीच्या बंद लोखंडी दाराला हात, कडी घालून त्यांना अुभें लटकवलें आहे, अंगांत ताप फणफणत आहे, आणि आमांशामुळें अुभ्या अुभ्याच खालीं रेच होत आहेत, हा त्यांचा देखावा मनश्चक्षूपुढें अुभा राहिला की जिवंत नरकवास काय असतो, याचें चित्र कल्पनेंत येअू शकतें. काय हा अघोर छळ ? केवढे भीषण दुर्दैव ? तसेंच त्यांचे धाकटे बंधु डॉ. नारायणराव सावरकरहि लहानपणीं दुर्दैवानें थबथबून निघाले होते. भगूरला या लहान मुलाला प्लेग झालेला; गांवाबाहेर देवळांत हे सर्व बंधु वनवासांत राहिलेले; हा मुलगा बेशुद्ध होअून झाडाखालीं टाकलेला आणि त्याला मुंगळे लागलेले ! हें भीषण दृश्य मनासमोर आलें कीं, पोटांत अद्यापहि कालवाकालव होते.

दुर्दैवाच्या खेळाच्या आणखी माझ्याविषयीच्या कांही गमती सांगून हा आमचा दैवाचा फासा पुरा करूं. मी ज्या दिवशीं मुंबअीस पकडलों गेलों.त्याच दिवशीं नाशकास आमच्या दाराशी अेक कुत्रें, आपण होअून चालत येअून, अचानक मेलें अशी गोष्ट आमची मंडळी सांगतात ! त्यांच्या

व आओच्या मनांत चर्र झालें, आणि दुसऱ्याच दिवशीं माझ्या अटकेची बातमी त्यांना कळली. अितरांच्या बरोबर दैव मलाहि फरफरा ओढीत होतेंच. पण मीं त्याची फारशी क्षिति बाळगली नाही. परंतु आमच्या विरुद्ध सर्व पापें करून आम्हांला कोणाला फांशी, जन्मठेप, व अितर शिक्षा देण्यास मदत करून, गणू वैद्य, मेल्यावर, त्याचें प्रेत न्यावयास कोणी नव्हतें म्हणून, तो माझ्या खांद्यावर गेला त्याचें मला अद्यापहि राहून राहून आश्चर्य वाटतें. अगदीं त्याच कोटींतली गोष्ट म्हणजे आम्हांला कठोर अघोर शिक्षा फर्माविणाऱ्या न्यायमूर्ति चंदावरकरांच्याबद्दलची. त्यांच्याबद्दल आम्हांला कोणताहि आदर असण्याचें कारण नव्हतें. अुलट पूर्ण सळसळणारा तिरस्कारच होता. पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, माझें नाशकास वसंत-व्याख्यानमालेत ज्या दिवशीं व्याख्यान होतें त्याच दिवशीं ते वारले; आणि आमचे अध्यक्ष, भाअूसाहेब पाटणकर वकील, यांनीं मला अगदी आयत्या वेळी गळच घातली, नव्हे अेकदम जाहीरहि केलें कीं, ठरलेल्या विषयावर भट न बोलतां आज 'चंदावरकरांच्या चारित्र्यावरच' बोलतील! मी अगदी अचानक त्यांच्या तावडींत सांपडलों. न बोलावें तरी पंचाअीत, बोलावें तरी पंचाअीत. बोलावें तर मनांत धुमसत असलेला अनादर व्यक्त व्हावयाची भीति, आणि न बोलावें तर सौजन्याची हानि. अशा आड-विहिरींत मी सांपडलों. पण शेवटीं सौजन्याचीच सरशी झाली. आणि आम्हांस भयंकर शिक्षा ठोठावणाऱ्या चंदावरकरांबद्दल मला सभ्यपणानें बोलणें भाग पडलें! मेल्यावर गणू खांद्यावर गेला. चंदावरकर गळीं अुतरले! दैवाची लीला काय वर्णावी!

असो. सांगण्याचा मुद्दा अेवढाच कीं, आमच्यांतल्या कांहीं जणांच्या चुकांच्या बरोबर दैवाची प्रतिकूलताहि आम्हांला भयंकर नडली. भगवद्गीतेत "दैवं चैवात्र पंचमम्" म्हणून कर्मसिद्धीचा दैव हा पांचवा घटक मानला आहे. म्हणजे निदान ½ तरी यशापयशाचा भाग त्याच्या आधीन आहे, असें म्हणावेंच लागतें. 'विधिरिह बलीयान्नतु नरः' हा अनुभव पूर्वापारचा आहे.

## अभिनव भारताची अखेर

धिंग्राच्या अभियोगानें विलायतेंतील अभिनव भारताचें अधिष्ठान जसें अुठवावें लागलें तसेंच आमच्यावरील बंडाच्या व अितर खटल्यांनीं महाराष्ट्रांतलेंहि अभिनव भारताचें अस्तित्व संपलें. आमच्यांतले बरेच कर्ते सभासद

तुरुंगांतल्या अंधारकोठडींत खितपत पडले. जे सुदैवानें अुरले होते त्यांनाहि सरकारच्या टेहळणीमुळें आपापले कार्यक्रम आवरते घ्यावे लागले. आणि अभिनव भारताचा असा शोकान्त शेवट झाला. त्यांतून कांहीं हालचाल करणारे जे होते त्यांनीं १९१३–१४मध्यें हातपाय हालविण्यास सुरुवात केली तों पहिलें महायुद्ध आलें; आणि १९१४ ते १९१८ पर्यंत सरकारच्या राजकीय चळवळीविरुद्ध असलेल्या धोरणाला तीक्ष्ण धारच चढली. आमच्यापैकीं जे सुटून आले त्यांच्यावर कित्येक वर्षें रोज २४ तास गुप्त पोलिसांची सक्त नजर होती. मी १९१५ मध्यें सुटल्यावर मजवरहि २४ तास खडा पहारा कांहीं महिने होता. अशा स्थितींत आम्ही पुनः गुप्त चळवळीचें राजकारण करूं लागणें देशहिताच्या दृष्टीनें अनिष्ट, होतें. पुढच्या पिढीनेंच तें अंगावर घेणें युक्त होतें. तसे कांहीं लोक आम्हांस भेटत. पण १९२० पासून महात्मा गांधींनीं नवीनच प्रयोग सुरूं केले; आणि त्या नवीन प्रयोगांकडे नव्या पिढीनें मोठ्या कुतूहलानें धांव घेतली. पण क्रांतिकारकांच्या चळवळी वायां गेल्या नाहींत. त्यामुळें १९०५ पासून अिंग्रज सरकार खडबडून जागें झालें. या चळवळीचा पहिला परिणाम म्हणजे १९०८–१९०९ च्या मोर्ले-मिंटो सुधारणा या होत. त्यानंतर या चळवळीच्या सातत्यानें मॉंटफर्ड सुधारणांचें १९१७ मध्यें आश्वासन मिळून १९१९ मध्यें त्या पदरांत पडल्या. महात्माजींच्या नवीन निःशस्त्र चळवळींचा परिणाम १९३५ च्या घटना कायद्यांत झाला. आणि शेवटीं १९४२ ची चलेजावची निकराची चळवळ, नेताजी सुभाषचंद्रांची प्रतिस्वराज्याची सैन्याधिष्ठित तयारी, आणि विलायतेंत त्यामुळें झालेली मजूर सरकारची मनःक्रांति, यामुळेंच आज हिंदुस्थान स्वतंत्र झाला आहे. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धापासून तों तहत १९४७ पर्यंत देशांतल्या क्रांतिवीरांनीं जीं बंडें केलीं तीं, तात्पुरतीं जरी दडपशाहीनें शमलीं, तरी त्यांच्यामुळें अुत्पन्न झालेला मनःक्षोभ धुमसतच राहिला. हिंदुस्थानच्या खवळलेल्या क्रांतिसागरांत ब्रिटिश साम्राज्याचें तारूं बुडणार हें ठरलेलेंच होतें. 'केव्हां' अेवढाच काय तो कालवाचक प्रश्न होता. या खवळलेल्या दर्यांत अभिनव भारतानें आपल्या प्रचंड लाटेचा अेकतरी प्रचंड धक्का या साम्राज्याच्या नौकेला दिला होता, अेवढें तरी अितिहास नमूद करील असें वाटतें. आणि अेवढ्यांतच आमचें समाधान आहे. गीतेंतल्या कर्मफलत्यागाच्या

शिकवणीप्रमाणें आम्ही, आमचें सर्वस्व पणाला लावून, ब्रिटिश साम्राज्याच्या विरुद्ध, अितर प्रांतीय क्रांतिकारकांसह, गनिमीकाव्याचे छुप्पे हल्ले करण्यास सज्ज होतों. कांहीं हल्ले साधले, कांहीं फसले. जयापजय हे दीर्घकालीन युद्धांत यावयाचेच. किंबहुना क्रांतियुद्धांत जय हा अखेरीसच मिळतो. त्यापूर्वी सर्व पराजयच सोसावे लागतात. जयापजयाच्या हेलकाव्यांत आमच्यापैकीं जे धारातीर्थी पडले त्यांचीं दृश्य स्मारकें होणार नाहीत. त्यांचीं नांवेंहि विसरलीं जातील. ९० वर्षांच्या या प्रदीर्घ युद्धांत ३ पिढ्या तरी कमींत कमी गारद झाल्या. कोणकोणाची स्मृति अितिहास ठेवणार? त्यांतहि गुप्त संस्थांनी माजविलेल्या या लढाया. त्यांत मुद्दामच गुप्तता ठेवावी लागते. नांवें कळूं नयेत, बेत कळूं नयेत, म्हणून चिठ्ठीचपाटी ठेवणेंहि वर्ज. मग या गुप्त वीरांना प्रसिद्धि, अितिहासांत स्थान, कसें मिळणार? तशी त्यांची, निदान पुष्कळांची, अपेक्षाहि नव्हती. गुप्ततेमुळें आम्ही कोण हें जसें आम्ही प्रसिद्ध करीत नव्हतों, अेकमेक आमचे आम्हांलाहि माहीत नव्हते, त्याप्रमाणें आमचीं क्रांतिकृत्यें जनतेस कळूं नयेत म्हणून अिंग्रज सरकारहि दक्ष होतें. लॉ-रिपोर्टस्‌मध्यें आमच्यावरील खटल्यांचे निवाडेहि हायकोर्टानें प्रसिद्ध होअूं दिले नाहींत! अशा प्रसिद्धिविन्मुख वीरांचीं, अज्ञात योद्धयांचीं, स्मारकें कशीं होणार? आणि कोण व किती करणार? भारताचें आजचें स्वातंत्र्य आणि त्याचा डौलानें फडकत असलेला तिरंगी विजयध्वज हेंच आमच्या अल्पस्वल्प प्रयत्नांचें चिरकालीन स्मारक आहे. त्यांत आम्ही सर्व समाविष्ट आहोंत. क्रांतिकारकांच्या प्राणांच्या, आणि स्वातंत्र्यप्रेमाच्या, आडव्या अुभ्या असंख्य तंतूंनीं विणलेला आजचा भारताचा हा विजयध्वज आहे. त्या तंतूंना नांवें नाहींत. त्या विजयध्वजाला फक्त 'भारतीय स्वातंत्र्य' हें भव्य दिव्य नांव आहे. त्यांतच आमच्यापैकीं जिवंत वा मृत आत्म्यांना समाधान आहे, आनंद आहे, कृतार्थतेची मनःशांति आहे. जय हिंद! जय भारत!! जय स्वातंत्र्यलक्ष्मी!!!

— समाप्त —

परिशिष्ट पहिलें

# तुरुंगांत आणि मुक्ततेनंतरचा छळ

२१ डिसेंबर १९०९ ला ज्याक्सनचा वध झाला आणि त्या वधाच्या निमित्तानें आम्हांला प्रथम पकडलें. पण आमच्यावर खुनाचा आरोप सिद्ध होणें शक्य नव्हतें. म्हणून आमच्यावर अिंग्रज सरकारविरुद्ध सशस्त्र क्रांति करण्याचा बंडखोरीचा आरोप ठेवला. आणि त्याचा निवाडा २४ डिसेंबर १९१० ला, म्हणजे पुऱ्या १ वर्षानंतर, झाला! या १ वर्षाच्या कच्च्या कैदेचा आम्हांला शिक्षा देतांना कोर्टानें फारसा विचारहि केला नाहीं! कारण त्याचा त्यांच्या निवाड्यांत क्वचितच अुल्लेख आहे! म्हणजे शिक्षेंत हें १ वर्ष अधिकच गेलें. मात्र खटल्याच्या वाफेच्या रुळाखालीं अिंग्रज सरकारनें, राज्याचा मार्ग निर्वेध करण्यासाठीं, आमच्यासारखे जे अुंच अडथळे होते ते साफ करून त्यांचा मार्ग निष्कंटक करून टाकला. कच्च्या कैदेंत याप्रमाणें १ वर्षभर आम्ही होतों. आगामी तुरुंगवासाची ती पूर्वतयारीच होती. सर्वच अेकध्येयानें प्रेरित झालेले होते. या संकटाचा वज्राघात केव्हां तरी आपल्यावर कोसळणार याची सर्वांनाच कल्पना होती, आणि सर्व त्याला तयारहि

होते. त्यामुळें, आणि खटल्याच्या दीर्घसूत्रीपणामुळें, ही कच्ची कैद अितकी आंगवळणीं पडली होती कीं, हंसण्या-खेळण्यांत, गप्पाटप्पांत, आमचे दिवस सहज निघून जात.

आमच्यापैकीं कांहीं जणांनी कायद्याचा अभ्यास केला असल्यामुळें, आणि आमच्याविरुद्ध गोळा केलेल्या पुराव्याच्या तारतम्यामुळें, आमच्यापैकीं कोणकोणाला किती शिक्षा होणार, याचाहि अंदाज आम्हीं बांधून ठेवला होता. मला ५ वर्षे शिक्षा होणार, हें मीं माझ्या मातुःश्रीला व पत्नीला ५।६ महिन्यांपूर्वींच सांगून टाकलें होतें. त्याप्रमाणें माझा अंदाज अगदीं तंतोतंत बरोबर ठरला. आणि या निश्चिततेमुळें मी शिक्षेच्या आदल्या रात्रींसुद्धां अितका निश्चिंत होतों कीं, मला अगदीं गाढ झोंप लागली होती.

खास कोर्टांत शिक्षांचें 'पुण्याहवाचन' झाल्यावर आम्हीं भर कोर्टांत "स्वातंत्र्यलक्ष्मी की जय" म्हणून जयजयकार करून आमच्या दुर्दम्यतेची साक्ष तेथेंच अिंग्रज सरकारास पटवली. हायकोर्टांतले सर्व न्यायाधीश, वकील, बॅरिस्टर, अितर पोलीस अधिकारी आमच्याकडे आश्चर्यचकित मुद्रेनें पाहूं लागले. पोलिस, विशेषतः अिंग्रज अधिकारी, चवताळले, पण करणार काय ? झालें यापेक्षां ते आमचें अधिक काय वांकडें करणार होते ? म्हणून ते पुष्कळ जरी गुरगुरले तरी आम्ही थोडेच त्यांना भिणार होतों ? आम्हीं प्रसन्नमुखानें अेकमेकांचा निरोप घेतला आणि तुरुंगांत प्रविष्ट झालों.

## माझा अपमृत्यूचा छळ

पक्क्या कैदेचें वर्णन करण्यापूर्वी कच्च्या कैदेंत माझ्या स्वतःबद्दल घडलेल्या कांहीं अुर्वरित गोष्टी, विश्वासराव सावरकरांच्या आग्रहामुळें, येथेंच सांगणें अिष्ट आहे. आमच्या चौकशीच्या वेळीं पोलिसांनीं आमच्यापैकीं पुष्कळांना भयंकर छळलें म्हणून मागें सांगितलेंच आहे. दुसऱ्या दीर्घ छळासाठींच जणुं काय, पण या पोलिस-छळांतून मी मात्र अजिबात निसटलों. त्याचें पहिलें कारण म्हणजे सदावर्त्यांची अनुकूलता आणि दुसरें म्हणजे मला तेथलें घाणेरडें कच्चें अन्न न मानवल्यामुळें झालेला आमांशाचा भयंकर विकार ! त्यामुळें मी अितका आसन्नमरण झालों कीं, मला सरकारी रुग्णालयांत (हॉस्पिटलमध्यें) पाठवणें कठोर पोलिसांससुद्धां भागच पडलें. हा कदाचित् खरोखर येथेंच मरेल अशी त्यांना भीति वाटं

लागली होती. म्हणून माझी ब्याद त्यांनीं रुग्णालयांत टाकली. आणि पोलिसांऐवजीं यमराज्याच्या वाटेवर मी लागलों. तेथें मात्र माझ्या सुदैवानें माझा वर्गबंधु डॉ. रामराव शिंदे, ( पण पोलिसांस माहीत नसलेला, ) दुय्यम डॉक्टर असल्यानें मी वांचलों. नाही तर माझा अपमृत्यूच मला दिसत होता. त्याचा छळ मात्र मला सोसावा लागला. असो. औषधोपचार चालू असतांच माझ्या भयंकर आजाराची माहिती त्याच्यामार्फतच बाहेर बऱ्याच लोकांस कळली. आणि म्हणून धाडस करून आमचे अभिनव भारताचे तेव्हांचे सदस्य रा. दादासाहेब गद्रे, वकील, हे मला भेटावयाला रुग्णालयांत आले. अितर कोणीहि आले नाहींत, किंवा त्यांना पोलिसांनीं परवानगीहि दिली नसेल. दादासाहेबांचे बंधु काकासाहेब गद्रे आणि मी अगदीं बरोबरीचे. अिंग्रजी शाळेंतहि वर्गबंधु. शाळेंतल्या व कॉलेजमधल्या माझ्या पहिल्या व दुसऱ्या नंबरामुळें दादांचें माझ्यावर काकांप्रमाणेंच प्रेम असे. आणि मी आसन्नमरण झालों असें कळतांच ते भेटावयास आले. मी तेव्हां सुधारूं लागलों होतों. रामरावांनीं मला तेथें रुग्णालयांत बरेच दिवस, माझ्या म्हणण्यास्तव, ठेवून घेतलें. आणि म्हणूनच मी पोलिसांच्या छळांतून सहिसलामत वांचलों. रामराव नसता तर कदाचित् यमसदनासहि तेव्हांच पोंचलों असतों. पोलिसांच्या छळाऐवजीं दारुण रोगाचा छळ सोसला हाच काय तो माझ्या बाबतींत बदल झाला होता. त्या महिन्या दीड महिन्याच्या आजारांत कित्येक दिवस, अंगाची व वस्त्रांची स्वच्छता नसल्यामुळें, सगळ्या कपड्यांत व अंगावर अुवा झाल्या होत्या. म्हणून दादासाहेब गद्रे यांच्यामार्फत घरांतून कपडे मागवले, व त्या छळांतून सुटलों. रुग्णालयांतून परत आलों तेव्हां पोलिसांच्या अटकेंतून ( कस्टडी ) म्याजिस्ट्रेटच्या अटकेंत ( कस्टडींत ) सर्वच गेले होते, आणि छळाचा काळहि संपला होता. कारण पोलिसांनीं पुराव्याची सर्व सांखळी जुळवून टाकली होती.

### चतुर्भुजला फोडण्याचा प्रयत्न

मी ग्रांट मेडिकल कॉलेजमध्यें तिसऱ्या अेम्. बी. बी. अेस्.च्या वर्गात असतांना मला "औषधिविज्ञान" ( मटीरियामेडिका ) शिकवणारा जो अध्यापक होता ( कॅप्टन बेटस्, आय. अेम्. अेस्. ) तोच त्यावेळीं नाशिकला सिव्हिल सर्जन म्हणून बदलून आला होता. त्या बेट्यानें

मला ओळखलें असलेंच पाहिजे. पण त्याने तसें कधींच दाखवलें नाहीं. त्याच्या हाताखालीं डॉ. रामराव शिंदे होते. नाशिक हायस्कूलमध्यें मी शिकत असतां रामराव माझा वर्गबंधु होता. बेटस्नें, व विशेषतः रामरावनें, मला योग्य ते औषधोपचार केले. माझ्या शेजारच्या खोलींतच सावरकर, पाटणकर, व माझ्याविरुद्ध अुभा केलेला राजसाक्षी चतुर्भुज हाहि आजारी म्हणून ठेवला होता. रामरावाकडून मला ही हकीकत कळली. त्यामुळें चतुर्भुजला जर फितवतां आलें तर पाहावें, म्हणून मीं रामरावामार्फत २—३ वेळां यत्न केले. पण तो पक्का बिलंदर होता. त्यानें माझ्या व रामरावाच्या प्रयत्नांना दाद दिली नाहीं. सुदैव अेवढेंच कीं, त्यानें चुगली करून रामरावाला खड्ड्यांत टाकलें नाहीं. रामरावहि हा धोका जाणूनच होता. पण त्यानें माझ्यासाठीं तेवढें धाडस केलें, ह्याबद्दल आतां त्याचें प्रसिद्धपणे आभार मानावयास हरकत नाहीं.

### तुरुंगांतल्या छळाची सुरुवात

आमची पक्की कैद भायखळ्याच्या तुरुंगांत सुरू झाली. घरच्या कपड्यांअैवजी तुरुंगाचा पोशाख व तेथलीं टिनची दोन भांडीं अेवढाच काय तो आमच्यांत फरक झाला. तेव्हां आतांप्रमाणें, राजबंद्यांचें किंवा प्रतिष्ठित कैद्यांचे अ व ब वर्ग नसल्यानें, आम्ही सर्व अितर कैद्याप्रमाणें ‘सब घोडे बारा टक्के’ या क वर्गांतच होतों. पण त्यांच्यापेक्षां कांहीं बाबतींत आमची अधिकच कुचंबणा होती. आम्ही अितर कैद्यांत राजद्रोह पसरवूं या भीतीनें त्यांनीं आम्हांस त्यांच्यापासून स्वतंत्र ठेवलें होते. आणि खुनशी सरकारचे हुकूम असे होते कीं, शक्य तर आम्हांस अेकेकटेच ठेवावें. अेकपक्षीं तें बरेंच होतें. कारण त्या घाणेरड्या व हलकट लोकांत राहणें संकटच झालें असतें. पण त्यामुळें आमच्यापैकीं पुष्कळांस, या बिनकायदेशीर अेकांतवासामुळें, फारच त्रास झाला. त्याचें वर्णन पुढें येअीलच; परंतु सरकारजवळ तुरुंगांत आम्हांस सतत अेकेकटे ठेवण्यास पुरेशा खोल्याच नव्हत्या. त्यामुळें आम्हांस कांहीं वेळां तरी अेकत्र ठेवणें त्यांना भाग होतें.

भायखळ्याहून कांहीं दिवसांनीं निरनिराळ्या तुरुंगांत आमची रवानगी होअूं लागली. पाटणकर व मी मात्र मार्च १९११ पर्यंत तेथेंच होतों. सावरकरांवर नंतर जो अेकतर्फी “राजाविरुद्ध लढाअीला

अुत्तेजन" दिल्याचा आरोप ठेवून नवा खटला चालू केला होता त्यांत पाटणकरांना, व मला, शक्य तर आरोपी म्हणून गोवावें, असा विचार घाटत होता. पण हायकोर्टानें तें मानलें नाहीं, म्हणून त्यांतून आम्ही निसटलों. पुढें सावरकरांविरुद्ध आम्हीं साक्ष द्यावी म्हणून आम्हांस शिक्षेंतून मुक्त करण्याची लालूच दाखवण्यांत आली. पण त्याला आम्हीं ठोस नकार दिला. अितकेंच नव्हे तर गायडरची त्याबद्दल निर्भत्सनाहि केली. परंतु, आमच्या विरोधाला न जुमानतां, जर साक्षीच्या पिंजऱ्यांत आम्हांस अुभें केलेंच तर शपथ नाकारावयाची, आणि त्यासाठीं ६ महिन्यांची शिक्षा अधिक ओढवून घेअून या संकटांतून मुक्त व्हावयाचें, असेंहि आम्हीं ठरवलें. अरविंद घोषांविरुद्ध बाबू बिपिनचंद्र पाल यांनीं साक्ष देण्याचें नाकारण्याअैवजीं हीच युक्ति स्वीकारली होती. पाटणकरांनीं त्याप्रमाणें, साक्षीच्या पिंजऱ्यांत अुभें केल्यावर, शपथ घेण्याचेंच नाकारलें. हें पाहून त्यांनीं मला साक्षीला बोलावलेंच नाहीं. सावरकरांना या आरोपावरून पुन्हा दुसरी जन्मठेपेची शिक्षा दिली; आणि १९६० सालीं, पुऱ्या ५० वर्षांनीं, त्यांच्या मुक्ततेचा काल न्यायप्रिय अिंग्रज सरकारनें ठरवला!

गायडरची तोंडावर निर्भत्सना केल्यामुळें कीं काय, मला मार्चमध्यें अेकदम सिंध-हैदराबादच्या तुरुंगांत पाठवण्यांत आलें. माझ्या अगोदर तेथें आमच्यापैकीं ५–६ जण जाअून पोहोंचलेच होते.

### ३ आठवड्यांत २१ पौंड वजन घटलें

तुरुंगांतल्या क वर्गाच्या कैद्यांच्या हालअपेष्टांचें विस्तृत वर्णन करण्यांत स्वारस्य तें काय असणार? सावरकरांनीं "माझी जन्मठेप" या ग्रंथांत, व बाबांच्या चरित्रांत, त्यांचें वर्णन आलेलेंच आहे. तुरुंगच तो. सर्व तऱ्हेचीं नियंत्रणें तेथें असणार आणि तशीं होतींच. त्यांपैकी कांहीं थोडींच येथें सांगतों. म्हणजे हल्लींच्या अ व ब वर्गांत राहून आलेल्या खुशालचंद राजबंदींना, आणि नवीन पिढीला, आमच्या छळाची कांहींशी कल्पना येअील.

कैदी तुरुंगांत प्रविष्ट झाला म्हणजे त्याच्या शरीरप्रकृतीची डॉक्टराकडून तपासणी करण्यांत येते. आणि त्याची प्रकृति व वयाप्रमाणें त्याला कठीण, मध्यम, व हलक्या श्रमांचीं कामें द्यावींत, अशी त्याला नोंद करावी लागते. तुरुंगांत आमची तपासणीहि भायखळ्याच्या तुरुंगांतल्या डॉक्टरनें

केली नाहीं. तो वास्तविक माझ्याबरोबरच मेडिकल कॉलेजमध्यें शिकणारा मिलिटरी शिष्य ( M. M. P. मिलिटरी मेडिकल प्यूपिल म्हणून तेव्हां अेक वर्ग असे ) होता. पण अँग्लो अिंडियन असल्यानें त्याला साहेबापेक्षां ताठा अधिक. त्याने कोणालाहि न तपासतांच सगळ्यांना कठीण ( Hard ) श्रमाचीं कामें द्यावींत, असें आमच्या तिकिटांवर लिहूनहि टाकलें! आम्हांला तरी तेव्हां काय माहीत कीं, असली तपासणी असते, आणि तिच्यावर श्रमविभाग असतो? त्यामुळें हैद्राबादला गेल्यावर मला कठीणतम श्रमाचें काम – चक्की पिसणें – अुभें राहून हातानें दळणें – हें देण्यांत आलें. त्यांतहि येरवडा, साबरमती, वगैरे तुरुंगांत ३०–३५ पौंडच धान्य अगदीं धडधाकट कैद्याला दळावयास देत. हैदराबाद तुरुंगांत पंजाबी मुसलमान व पठाण कैदी येत असल्यानें, तेथें ३५ च्या अैवजीं ४५ पौंड धान्याचा ठेका ठरला होता. आणि ते पहाडी लोक ४५ च काय पण, विडी तंबाकू दिल्यास, ९० पौंडहि धान्य सहज दळीत! आम्हांला मात्र तें अतिशय त्रासदायक होतें. माझ्या सुदैवानें त्यावेळीं हैदराबादला मला ( कै. ) वामन मल्हार जोशी, ( कै. ) पुरुषोत्तमपंत दांडेकर, श्रीधर वासुदेव शिधये यांच्याच कोठडींत ठेवलें होतें. त्यांची दळण्याच्या कामाची पाळी होअून गेली होती, म्हणून बरें झालें. ते बिचारे, मी थकलों म्हणजे, मला दळण्यास मदत करीत. पण माझें हृदयच अशक्त असल्यानें त्यांच्या मदतीनेंहि माझा ठेका कधींच पुरा होत नसे. आणि मी तरी काय करणार? मला हृदयाच्या धडधडीचा ( Tachycardia ) तेव्हां विकार होता. त्यामुळें मला निम्मेंहि काम करवत नव्हतें. या तिघांनीं आपापली कामें संभाळून मला मदत केली तरी २५–३० पौंडांपेक्षां माझी मजल जात नव्हती. सुदैवानें त्यावेळीं तुरुंगांतला मुख्य जमादार पास्कल म्हणून एक कोंकणांतला ख्रिस्ती मराठा होता. तो मराठी बोलत असे. आम्ही महाराष्ट्रीय म्हणून त्याला आमच्याबद्दल आदर होता. त्यामुळें तो माझें काम कमी झालें तर कागाळी करीत नसे. पहिले कांहीं दिवस हातांनीं दळतांना हाताला टरारून फोड आले. त्यामुळें काम पुरें झालें नाहीं. या सबबीवर ४–५ दिवस मीं वेळ मारून नेली. कांहीं दिवस अितर सबबी सांगितल्या. येणेंप्रमाणें काम कधींच पुरें झालें नाहीं. शिवाय दळण्याच्या या भयंकर श्रमानें भूक फार लागे. आणि वेळीं ३ भाकरी

खाल्ल्या तरी भूक भागत नसे. म्हणून मग दळलेलें कोरडें पीठच खावें लागे. अशा स्थितींत ३ आठवडे कसेबसे मीं काढले. पण अेवढ्या काळांत या श्रमानें माझें २१ पौंड वजन कमी झालें! आणि काम होअीच ना, तेव्हां मीं सुपरिंटेंडंटला ही हकीकत सांगितली. तो म्हणाला, 'तुला कठीण काम द्यावें हें कोणत्या शहाण्यानें लिहिलें?' तेव्हां मीं त्याला मला कोणी तपासलेंच नाहीं, हें सांगितलें. तो आश्चर्यचकित झाला, आणि त्यानें तत्काळ जेलरला मला दुसरें मध्यम श्रमाचें काम द्या म्हणून हुकूम फर्मावला, व मी त्या कठीण श्रमांतून कायमचा मुक्त झालों.

### तुरुंगांत माणुसकीलाहि मज्जाव

ह्या सुपरिंटेंडंटला (कॅ. फ्रेजर आय्. अेम्. अेस्.) थोडी माणुसकी होती म्हणून मी हृद्रोगांतून तेव्हां बचावलों. पुढें मीं त्याच्याजवळ आम्हांला वाचावयाला कांहीं पुस्तकें द्या म्हणून विनंती केली. तुरुंगांत आम्हांला योग्य अशीं वाचावयास पुस्तकें कोठून असणार? तेथले कैदी म्हणजे बहुतेक सगळेच अक्षरशत्रु. तेव्हां त्यांच्या योग्य असे मोठे ग्रंथ म्हणजे अंकलिपी, अक्षरओळखीचीं पुस्तकें, कांहीं ४–५ यत्तेपर्यंतचीं क्रमिक पुस्तकें, आणि फार फार म्हणजे गोष्टीवेल्हाळ ग्रंथ! त्यांत तेथली भाषा सिंधी किंवा अुर्दू. आम्हांला हे मोठमोठे अंकलिपीचे ग्रंथ काय होय! त्यांतहि भाषेची मोठीच अडचण. कॅ. फ्रेजरला आमच्या तक्रारी पटल्या; आणि, तुरुंगांतल्या नियमांना न जुमानतां, तो आपल्या घरच्या अिंग्रजी कादंबऱ्यांचीं पुस्तकें आम्हांला देअूं लागला. मी पाश्चात्य वैद्यकाचा विद्यार्थी म्हणून मला तो त्याच्याकडे येणारें British Medical Journal हें नियतकालिक देत असे. यामुळें बौद्धिक भूक कांहीं काल थोडीशीं शमली होती. पण सर्व तुरुंगांचे मुख्याधिकारी I. G. P. अेकदां आले. आणि या अुंटावरच्या शहाण्यानें कादंबऱ्यांची सवलत बंद केली! आणि आमच्या पुस्तकांची मागणी जी धुडकावली ती आम्हीं सुटावयाच्या वर्षी – ४ वर्षांनीं – पुरी केली!

### अेकांतवास आणि आत्महत्त्येचा संकल्प

पुढें कांहीं दिवसांनीं आमची पांगापांग झाली. आणि सरकारी हुकुमाप्रमाणें प्रत्येकाला निरनिराळ्या खोल्यांतून ठेवलें. आम्हांला कायदेशीर अेकांतवासाची शिक्षा नव्हती. पण ती अशी आमच्यावर लादली होती. त्यांत

माझ्या वांट्याला जी खोली आली होती ती अेका मोठ्या यार्डमध्यें होती. माझ्या-वर जो वॉर्डर नेमला होता तो अेक म्हातारा पठाण होता. त्याला फक्त पठाणी पुष्तु भाषा माहीत होती. अुर्दू व हिंदुस्थानी कांहीं शब्द तेवढे तो तेथेंच शिकला होता. त्यामुळें त्या मोठ्या भयाण जागेंत सारा दिवस तो आणि मी अशीं दोनच माणसें. जेवण घेअून येणारा फक्त २ वेळां येअी. भाषाभेदामुळें अेकमेकांच्या तोंडाला कुलूपच लागलें होतें. फक्त करपल्लवी चाले. ३–४ महिने याप्रमाणें मी अगदीं निर्जन अेकांतवासांत काढले. तुरुंगाधिकाऱ्यास "मला निदान माणूस "दिसेल" अशा ठिकाणीं तरी ठेवा, म्हणून विनंत्या केल्या. तो म्हणे मी सरकारी हुकुमाचा बंदा. तें मला करतां येत नाहीं." यामुळें अेकांतवास अगदीं असह्य झाला, आणि मीं आत्महत्या करण्याचें ठरवलें. माझ्या कामा-साठीं अेक मोठा सुवा रोज माझ्या कामाबरोबर येअी व जाअी. अेक दिवस मीं तो सुवा आत्महत्येसाठीं लपवून ठेवला. शारीरशास्त्राचें ज्ञान असल्यानें गळ्यांतल्या ( क्यारोटिड ) मोठया शुद्ध रक्तवाहिनींत नेमका तो खुपसून आत्महत्या करण्याचा माझा संकल्प होता. पण पुन्हा प्रयत्न करून पाहावा, म्हणून मीं रात्रीं तो रद्द केला. सुदैवानें नेमकें त्याच वेळीं त्या वैद्यकीय नियतकालिकांत Melancholia "नैराश्यजन्य मानसिक रोग" या विषयावर लेख आले होते. मीं सुपरिंटेंडंटला सांगितलें कीं, "अगदीं त्या वर्णनाप्रमाणें माझी मनःस्थिति झाली आहे – आणि तूं जर या अेकांतवासांतून मला न काढलेंस तर मी अेक वेडा तरी होअीन किंवा आत्महत्या तरी करीन." त्याला तें पटलें व त्यांतून माझी मुक्तता झाली! कारण कैद्याच्या आरोग्या-साठीं त्याला योग्य दिसेल ती चिकित्सा करण्याचा त्याला अधिकार होता. माझ्याप्रमाणेंच अगदीं वेडापर्यंत माझे सहकारी मित्र दामोदर महादेव चंद्रात्रे यांची अशा अेकांतवासामुळें पाळी आली होती. पण आम्ही, तुरुं-गाचे सर्व नियम झुगारण्याचें धाडस पत्करून, चंद्रात्र्यांना दिवसा सोबत करीत होतों, आणि म्हणूनच ते त्या संकटांतून निभावले.

### कदान्न व विषारी अन्नाचा कहर

तुरुंगांतला कायमचा मोठा छळ म्हणजे तेथलें कदान्न. आम्हांला कोणालाहि तें खाण्याची जन्मांत संवय नव्हती. त्यामुळें मी तर वजनांत ३५ पौंड कमी झालों होतों. अेखादे वेळेस तर भाकरी अितक्या कडू येत

कीं, आम्हीच काय पण आमच्या सोबतिणी चिमण्याहि त्या खात नसत ! त्यांनीं अन्न खाल्लें नाहीं म्हणजे तें वाअीट असलेंच पाहिजे, हा आमचा अडाखा होता. पण तें खाल्लें नाहीं तर दुसरें थोडेंच मिळणार होतें ! मग अुपासमार होअी.

तुरुंगांतल्या अधिकाऱ्यांच्या हलगर्जीपणामुळें अेक दिवस मोठाच हाहाःकार झाला. भाजी ज्या भांड्यांत भरून कैद्यांस पोंचवावयाची त्या मोठ्या भांड्यांत कसलें तरी विषारी तेल होतें. तें भांडें स्वच्छ न करतां त्यांतच भाजी ओतली आणि ती नेहमीप्रमाणें कैद्यांस वाटली. मी १–२ घासच खाल्ले असतील. अितरांनी थोडीफार खाल्ली असेल. कारण ती न खाल्ली तर भाकरी खावयाची कशाशीं ? शिवाय "कुठला तरी बेचव पाला 'भाजी'" म्हणून खाण्याची संवयच होती. म्हणून प्रत्येक कैद्याच्या पोटांत थोडी फार तरी ती गेलीच. संध्याकाळचें तें जेवण झाल्यावर सर्व कैदी बंद झाले. आणि रात्रीं त्या विषारी भाजीने आपला प्रभाव दाखवण्यास सुरुवात केली. कॉलऱ्या-प्रमाणें सर्व कैदी रेच आणि वांत्या यांनी अगदीं हैराण झाले. माझी तर फारच तिरपिट झाली. सगळ्या तुरुंगभर हा प्रकार घडला. सुपरिंटेंडंट, जेलर, सर्व धावून आले. पण करणार काय ? अतिशय आजारी होते त्यांना औषधपाणी दिलें. सुदैवानें त्या रात्री कोणी दगावले नाहीं. आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे या साऱ्या कल्लोळांत २७ वर्षे तुरुंगांतच काढलेल्या अेका कैद्यानें हें हलाहलहि पचवलें होतें ! त्याला कांहींच झालें नाही !

### दुःसह शीतोष्णता व त्यामुळें मृत्यु

सिंध प्रदेश म्हणजे भयंकर अुष्ण. त्यांत अेका वर्षी तर बाह्य हवेंतलें तप-मान (टॆंपरेचर) १२४ अंशापर्यंत गेलें होतें. सामान्यतः ११८ ते असे. अशा बाह्य अुष्णतेंत आम्ही होरपळून निघत होतों. रात्री १० वाजतांसुद्धां भिंतींना टेकवत नसे अितक्या त्या तापत. मग मनुष्याची कथाच काय ? अशा अुष्णतेंत झोंप कशी येणार ? कांही रात्री तर जाग्रणच पडे. त्यांतून गार पाणीहि मिळण्याची अशक्यता. त्यामुळें तेथला अुन्हाळा असह्य होअी. अेके दिवशीं तर अशा (Sun-heat stroke) भयंकर अुष्णतेने ९ माणसें तुरुंगांत मेलीं ! त्यांना सिंधूच्या वाळूंत काम करावें लागे. वर अुष्णतामान १२४, खालीं वाळूहि भयंकर चटके बसतील अशी तापलेली !

गार पाण्याचा स्पर्शहि नाही! अशा अुष्णतेनें ९ कैदी अुन्हाची 'झळ' लागून पटापट तरफडून मेले. पण लक्ष कोण देतो? आम्ही राजकीय कैदी म्हणून आम्हांस बाहेर नेणेंच शक्य नव्हतें. या नियमामुळें आम्ही जिवंत राहिलों. पण दरसाल होरपळत होतोंच.

अुन्हाळ्याप्रमाणें सिंधमधला हिवाळाहि कडक. तेथें वर्षाऋतूंत पाअूस नाहींच म्हणाना. वर्षांतून ५–६ अिंच सारा पाअूस. त्यामुळें दरसाल कडक प्रखर अुन्हाळा, आणि तितकाच कठीण हिंवाळा. हिवाळयाला अुबदार कपडे जाडेभरडे देत. पण तेच रुतत. पण तसेंच अंग आंखडून, अेका अवयवाची अूब दुसऱ्याला देत, त्या बोचणाऱ्या जाड्या-भरड्या तरटावर अंग टाकून, कोपऱ्याचा आसरा घेअून, रात्र काढणें भाग पडे. त्यांतहि अेखादे वर्षी भयंकर थंडीची लाट ( Cold wave ) आली म्हणजे दिवसा अूनहि गार वाटे, मग रात्रींचे हाल कशाला विचारावे?

### तुरुंगांतल्या कांहीं प्रतिष्ठित चोऱ्या

हालांबरोबर कांहीं गमतीहि होत. सिंध प्रांतांतले माजी कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष डॉ. चोअितराम गिडवानी हे त्या वेळी तुरुंगांत सरकारी नोकरीत दुय्यम डॉक्टर होते. आम्हांला बौद्धिक अुपासमार होत आहे हें त्यांना पाहावेना. म्हणून त्यांनी रवींद्रनाथांचें 'साधना' हें पुस्तक अेक दिवस आम्हांला आणून 'चोरून' दिलें. प्रथमच रवींद्रनाथांच्या ग्रंथाचें दर्शन आम्हांला तेव्हां झालें! आम्हीं तुरुंगाच्या सर्वाधिकाऱ्याला वारंवार विनवीत होतों कीं, सरकारी खर्चानें तरी आम्हांस ग्रंथ द्या, किंवा आमच्या खर्चानें, पण हवीं तर सरकारनें पसंत केलेलीं, पुस्तकें तरी आम्हांस आणूं द्या. पण २–३ वर्षे त्या कर्नल ज्याक्सन नांवाच्या ढनें नुसती टोलवाटोलवी चालविली. आम्हांला त्याची अुत्तरें येत कीं, "सरकारजवळ बजेटांत पैसा नाहीं म्हणून पुस्तकें सरकारी खर्चानें देतां येत नाहीत; आणि खासगी खर्चानें देतां येत नाहींत कारण तसा नियम नाहीं!" वास्तविक नियम करणारा हाच अधिकारी. पण तसा नियम करण्याची त्याची अिच्छाच नव्हती. कारण आमचे होतील तितके हाल पाहण्यांत त्याला गंमत वाटे! या अन्यायामुळें डॉ. चोअितराम चिडले आणि त्यांनीं अशा वाममार्गानें आम्हांला पुस्तकें दिलीं!

## मुंगी नाहीं पण हत्ती गेला !

पुढें अेकदाचे ३–४ वर्षांनीं हे तुरुंगाचे मुख्याधिकारी प्रसन्न झाले आणि आम्हांला शेक्सपिअर, ज्ञानेश्वरी, आणि काहीं अितर थोडीं अशीं ४।५ पुस्तकें दिलीं. त्यांत मौज ही होती कीं, या शहाण्यानें आम्हांला Motley's Rise of the Dutch Republic हा ग्रंथ दिला! आम्ही जाणूनबुजून राजद्रोही क्रांतिकारक. हा ग्रंथ म्हणजे डच लोकांनीं राज्यक्रांति करून स्वातंत्र्य कसें लढून मिळवलें त्याबद्दलचा. तो मागण्यास आम्हीच धजलों नसतों. पण खुद्द तुरुंगाधिकाऱ्यांकडूनच आमच्याकडे तो आला! या शहाण्याच्या अकलेंतून प्रथम मुंगी जात नव्हती तेथून हा सबंध हत्ती बाहेर आला! असो. ज्ञानेश्वरी आल्यानें मात्र मनाची तळमळ शांत झाली. मी तुरुंगांत तिचें ५ वेळां पारायण केलें. हीं ५ पुस्तकें मिळावयास सनदशीर पद्धतीनें ४–५ वर्षें लागलीं!

## अिंग्रजी भाषेचे आम्ही दोन अधिकारी

तुरुंगांतली आणखी मौज म्हणजे तेथल्या ढची. साऱ्या तुरुंगांत अिंग्रजी चांगलें जाणणारे व लिहूं शकणारे काय ते आम्ही दोन. अेक मुख्य अधिकारी आणि त्याखालीं अेकदम मीच. आमचे जेलर अिंग्रजी ५ वी यत्ता शिकलेले, आणि डेप्युटी जेलर तर तिसरींतच घुटमळलेले. त्यामुळें अिंग्रजी लिहिण्यासमजण्याची त्यांना पूर्ण अडचण. सुपरिंटेंडंट हा आय्. अेम्. अेस्. पैकीं कॅ. भाटेना म्हणून पार्शी गृहस्थ होता. जेलरांच्या अकटोविकट ज्ञाना-मुळें त्याला त्याच्या कचेरीचें काम करणें कठीण पडे. म्हणून त्यानें मला मग ऑफिसमध्येंच घेतलें. मला कामाची माहिती झाल्यावर त्याचीं कामें भराभर अुरकूं लागलीं. पण मला ऑफिसमध्यें घेण्याची ‘चोरीच’ होती. कोणी मोठा अधिकारी आला म्हणजे तो मला माझ्या कोठडींत पाठवी, आणि तो गेला म्हणजे पुन्हा बोलावून घेअी. जेलर, डेप्युटी जेलरना जीं कामें करतां येत नव्हतीं तीं मी करूं लागल्यानें तुरुंगांतल्या अितर कैद्यांना मी म्हणजे अेक मोठा अधिकारीच वाटूं लागलों. याचा फायदा असा झाला कीं, साऱ्या तुरुंगभर मला हवें तेथें जाण्याची मोकळीक मिळाली आणि तुरुंगाचा कारभार सर्व माहीत झाला.

## सरकारचा खुनशीपणा

पहिलें महायुद्ध (१९१४–१९१८) आम्ही तुरुंगांत असतांच सुरू झालें. त्यामुळें तुरुंगखात्यांतले सर्व आय्. अेम्. अेस्. अधिकारी लढाअीवर गेले. तुरुंगखात्यांत मग नव्या अधिकाऱ्यांची भरती झाली, आणि डॉक्टर म्हणून कांहीं लोकांना त्या जागा मिळाल्या. यामुळें हैदराबाद तुरुंगावर माझा अेक समव्यवसायीच सुपरिंटेंडंट म्हणून आला. वजन कमी झालेल्या कैद्यांना डॉक्टरनें हवें तें औषध व अन्न द्यावें, असा त्याला अधिकार आहे. या माझ्या समव्यवसायिकानें माझें वजन ३५ पौंड कमी झालेलें पाहून मला दूध, पोळी वगैरे अन्न देण्याचा हुकूम दिला. त्यामुळें शिक्षेच्या शेवटच्या वर्षांतच बौद्धिक व शारीरिक भुकेचें तुटपुंजें समाधान झालें. तोंपर्यंत आमचे हाल खुनशीपणानें चालूच होते.

आमच्याविरुद्ध अिंग्रज सरकारच्या खुनशीपणाचें आणखी अेक गमक म्हणजे १९११ ला जो राज्यारोहणाचा दिल्ली-दरबार झाला त्यावेळीं सर्व अितर कैद्यांच्या शिक्षा कमी झाल्या. पण आमच्या मात्र अेक दिवसानेंहि कमी केल्या नाहींत! अितर कैद्यांनाहि याबद्दल मोठें आश्चर्य वाटलें. आम्हांलाहि त्याबद्दल फारशी आशा नव्हतीच. त्यामुळें आम्हांला नित्य नियमाप्रमाणें ठराविक दिवसांची सूट मिळून आम्ही आमच्या शिक्षा भोगूनच बाहेर पडलों.

## सोडतांनाहि प्लेगांत ढकललें

अिंग्रज सरकारच्या अशा दुष्ट व मूर्खपणाचें प्रदर्शन माझ्या सुटकेच्या वेळींहि झालेंच. मी नाशिकचा राहणारा म्हणून तुरुंगाच्या नियमाप्रमाणें मला नाशकास आणून सोडावयाचा शिरस्ता खरा. पण त्यावेळीं नाशिकला प्लेगची सांथ होती. माझ्या घरांतच मालकाचीं २ माणसें प्लेगनें मेलीं होतीं. म्हणून मी मला पुण्यास माझ्या श्वशुरगृहीं नेअून सोडा, किंवा मला अगोदर प्लेगप्रतिबंधक लस टोंचून मग नाशकास न्या, असा योग्य व साधा आग्रह धरला. पण सरकारी हुकूम म्हणजे हुकूम. प्लेगप्रतिबंधक लस टोंचून सोडण्याचा नियमांत आधार नाहीं म्हणून ती टोंचली नाहीं! आणि कैदी जेथें राहणारा तेथेंच त्याला पोंचवावयाचा असा नियम म्हणून पुण्यास पाठवतां येत नाहीं, असा सुपरिंटेंडंटनें हुकूम दिला! मी त्याला विचारलें कीं,

सुटलेल्या कैद्याचें आयुष्य अधिक मोलाचें का तुमचा नियम ? तो निरुत्तर झाला पण हुकूम बदलूं शकला नाहीं ! अिंग्रजांच्या नोकरशाहीची अक्कल अशी तेव्हां वाहात होती.

असो. शेवटीं सरकारी नियमाप्रमाणे माझ्याबरोबर अेक जमादार देअून मला नाशकास थेट प्लेगच्या खाअींत आणून टाकलें ! जमादार बिचारा हिंदु होता. त्याला नाशिकची यात्रा करावयाची होती. म्हणून माझ्या सुटकेच्या वेळीं मुद्दाम त्याने आपलीच योजना मजबरोबर येण्याची करून घेतली होती. मी त्याला प्लेगची लस टोंचून घेण्यास अगोदर बजावलें होतें, व त्याप्रमाणें त्याने ती टोंचून घेतली होती. मी सुटल्यावर त्यानें मला आपल्या घरीं नेअून जेवण दिले व मग आम्ही निघालों. माझ्यामुळें त्याला नाशिक-पंचवटी यात्रा घडणार यामुळे तो आनंदांत व कृतज्ञ होता; आणि आम्ही दोघांनीं अेकमेकांची सोय पाहून प्रवास केला. नाशकास आल्यावर हुकुमाप्रमाणें त्याने पोलीसकडे वर्दी दिली व मी घरीं आलों.

## दारिद्र्याची सीमा

सुटकेचे अगोदरचे दिवस म्हणजे अितर कैद्यांना मोठे आशेचे व आनंदाचे. माझे मात्र तसे नव्हते. माझ्या दारिद्र्याला तेव्हां सीमा नव्हती. अक्षरशः निष्कांचन स्थितींत मी होतों. माझे मेहुणे ( आतां कै. ) अनंतराव लेले हे माझ्या शिक्षेच्या दिवसांत दरमहा १० रु. माझ्या पत्नीस, त्यांच्या बहिणीस, पाठवीत. त्यांतच माझी आअी व पत्नी यांनी दिवस कंठले. अितर स्नेह्यांनीं, विशेषतः ( आतां सर्व कै. ) वामनशास्त्री दातार, वामन श्रीधर बर्वे, विश्वनाथराव केळकर, गोविंद कवि यांनीं अडीअडचणीत थोडीफार मदत करावी. पण खरा आधार फक्त या १० रुपयांचा. आमचा खटला चालू असतां घरांत जी काय ४।५ शेंची पुंजी होती ही सर्व माझ्या आअीनें व पत्नीनें वकिलांच्या खिशांत, मी नको नको म्हणत असतां, घातली. त्यामुळें घरांत शिल्लक शून्यच होती. अशा भयंकर दारिद्र्यांत मी सुटणार होतों. त्यामुळें ‘ पुढें काय ’ हा प्रश्न सुटकेपूर्वी मला सारखा भंडावीत होता. अिंग्रज सरकार हात धुवून पाठीस लागलेलें. ते रोजगारधंदा थोडाच सुखासमाधानानें करूं देणार ? त्यामुळें मन खिन्नच होतें.

### लो. टिळकांचा अेकमेव आधार

पण पुढची माझी स्थिति ओळखून माझ्या कांहीं मित्रांनीं मला आपण होअून जी मदत केली ती बिनमोल होती. मुंबअीस येतांच ( आतां कै. ) प्रा. दत्तोपंत केतकर यांनीं अेकदम १०० रु.ची नोट माझ्या हातांत ठेवली. त्यामुळें मला बराच धीर आला. पुढे पुढें १० महिने मीं केवळ मित्रांच्या अुसनवारीवर व मदतीवर काढले. माझ्या कयासाप्रमाणे, अिंग्रज सरकारच्या हुकुमावरून, मजवर २४ तास सारखा पहारा होता. त्यामुळें कुठें नोकरी पहावयाला जावें तर मालक म्हणे तुमच्या मागचें हें शुक्लकाष्ठ आम्हांला जाचणार. मग आम्ही अुगाच ही ब्याद तुमच्याबरोबर आमच्या कां मागें लावून घ्या ? १९१५ साली लोकांची मनाची तयारीहि आमच्या-सारख्या राजद्रोही लोकांना जवळ करण्याची नव्हती. जो तो आम्हांला टाळी. त्यामुळें हे १० महिने फारच जाचांत काढले. श्वशुरांच्या घरी तरी किती महिने रहावयाचें ? शेवटीं मनाचा अखेरचा हिय्या करून मी लो. टिळकांना भेटावयाचें ठरवलें. अितर पुढाऱ्यांनी आम्हांला पाठच दाखवली होती. म्हणून शेवटचा आसरा टिळक हेच होते. १९१५ च्या डिसेंबरांत मी त्यांना भेटलों व सर्व कहाणी त्यांना सांगितली. “ लो. टिळकांच्या आठवणी ” या ग्रंथांत मी ती, व त्यानंतर त्या महात्म्यानें मला कसें जवळ केलें, आणि केसरी-मराठ्याचा दुय्यम संपादक म्हणून नोकरींत घेतलें, ती हकीकत आलीच आहे. म्हणून पुनरुक्ति येथें न करतां त्या ग्रंथाकडेच वाचकांचें लक्ष वेधतों. टिळकांच्या आधारावरच पुढचा माझा संसार मीं रेटला. अितकेंच नव्हे तर पुन्हा मेडिकल कॉलेजमध्येंहि, त्यांच्याच आश्रयामुळे, मी प्रविष्ट होअून डॉक्टर होअू शकलों. त्यांचे अुपकार मी जन्मोजन्म विसरणार नाहीं.

### सरकारचें टिळकांविरुद्ध कारस्थान मीं मोडलें

केसरींत त्यावेळी माझ्याप्रमाणेंच राजकारणांत पोळलेले असे दोन गृहस्थ टिळकांनी माझ्या अगोदरच घेतले होते. ते म्हणजे सेनापति बापट आणि कै. वामन मल्हार जोशी. अलिपूर बॉबकेसमध्यें सेनापतींचा संबंध आला होता. म्हणून ते कित्येक वर्षें अज्ञातवासांत होते. पुढें ते बाहेर आल्यावर अिंग्रजांनीं त्यांच्यावर खटला भरला नाहीं. कारण त्यांच्याविरुद्ध साक्ष देणाऱ्या राजसाक्षीदाराला, नरेंद्रनाथ गोस्वामी याला, तुरुंगांतच कन्हयालाल

दत्तानें गोळी घालून ठार केलें होतें! त्यामुळें त्यांच्याविरुद्ध पुरावाच नव्हता. पण वैरी म्हणून सरकार त्यांस समजेच. वामनराव जोशी तर राजद्रोही ठरून शिक्षा भोगून आले होते. पण राजकीय क्रांतीशीं या दोघांचा संबंध स्पष्ट सिद्ध नव्हता. टिळक हे १८९७ त चाफेकरांनीं केलेल्या ऱ्यांडच्या खुनाला अुत्तेजन देणारे, आणि क्रांतिकारक मताचे होते, आणि त्यांच्या केसरींतले लेख वाचून अनंतराव कान्हेऱ्यांनी नाशकास ज्याक्सनचा वध केला, असें अिंग्रज सरकारास ठरवावयाचें होतें. आमच्या "अभिनव भारता"शीं त्यांचा दाट संबंध होता, असें गणू वैद्याच्या तोंडून आमच्या खटल्यांत वदवण्याचा सरकारनें भगीरथ प्रयत्न केला. पण तोहि मागें सांगितल्याप्रमाणें, पळशीकरांच्या टिळकांबद्दलच्या आदरानें, फसला होता. म्हणून, ती चूक सावरण्याकरितां पुन्हा चिरोल-केसमध्यें, गणूला साक्षीला बोलावून, टिळकांचा 'अभिनव भारता'शीं, व ज्याक्सन-वधाशीं, संबंध जोडण्याचा सरकारचा डाव होता. गणूला चिरोलचें समन्स लागतांच त्याच्या वडील बंधूंना घेअून रात्रीं तो मजकडे आला. त्याचा वडील भाअू व तो, मी राहात होतों त्याच गल्लींत, पुण्यास राहात होते. आल्यावर त्यानें माझ्या पायावरच डोकें ठेवलें. ज्याक्सन-वधाच्या खटल्यांत त्याला झालेली २५ वर्षें जन्म ठेपेची शिक्षा, आमच्या खटल्यांत तो राजसाक्षी झाल्यामुळें, कमी करून ३ वर्षांची साधी कैद केली होती, व आमच्या कटाच्या खटल्यांत त्याला माफी दिली होती. पुढें तो सुटल्यावर पोलिसांनीं त्याला युरोपियन जिमखान्यांत भर २५ रु. पगाराची नोकरीहि दिली होती. गणूवर हे अुपकार सरकारनें केले असल्यानें तो आपला मिंधा आहे, असें सरकारास वाटत होतें. आणि म्हणून टिळक हे राजकीय कटांना व खुनांना अुत्तेजन देत असत, असें गणूच्या तोंडून वदवून घेण्यासाठीं, चिरोल-केसच्या निमित्तानें, चिरोलतर्फें साक्ष देण्यास गणूस समन्स लागलें होतें.

### गणूचा पश्चात्ताप व पापक्षालन

ते घेअून तो मजकडे आला. मी त्यावेळीं केसरींत दुय्यम संपादक होतों. गणू मला म्हणाला कीं, "आजवर माझ्या हातून झालीं ती पापे झालीं. त्यांच्याबद्दल मला पश्चात्ताप होतोच आहे. पण टिळकांसारख्या महात्म्याविरुद्ध साक्ष देण्यास चिरोलनें जी गळ घातली आहे तिच्यांतून मला वांचवा.

टिळकांच्या विरुद्ध प्राण गेला तरी मी साक्ष देणार नाही. मात्र यांतून सुटावयाचें कसें तें मला सांगा. ” गणूवर विश्वास ठेवणें कठीणच होतें. पण Saints have a past and sinners have a future – साधूंनीं पूर्वायुष्यांत कांहीं पापें केलेलीं असतात; आणि पापीहि अुत्तरायुष्यांत पुण्यवान् होअू शकतात – या अिंग्रजी म्हणीप्रमाणें गणूच्या पश्चात्तापयुक्त वचनांवर विश्वास ठेवा, अशी त्याच्या वडील भावानें मला ग्वाही दिली. पण त्यावर विश्वास ठेवा म्हणजे मारेकऱ्यावर विश्वास ठेवणेंच होतें. पण टिळकांसाठीं तेंहि धाडस मीं केलें.

मी ही गोष्ट दुसरे दिवशीं लोकमान्यांच्या कानावर घातली. त्यांनीं मला सांगितलें कीं, “ गणूनें मला ( टिळकांना ) अनुकूल साक्ष दिली तर त्याची नोकरी जाअील. पण ती गेली तर मी त्याला दुसरी ३५ रु. पर्यंतची नोकरी देअीन. शिवाय मी ‘ अभिनव भारता ’च्या सदस्यांना सबूर करा, अुतावीळपणानें भलतेंच करूं नका, ” म्हणून थोपवूनच धरलें होते ही खरी गोष्ट आहे. तीच त्यानें सांगावी म्हणजे झालें. हा निरोप गणूला कळवा, आणि तो कबूल असल्यास, व तुमची त्याबद्दल खात्री झाल्यास, त्याला माझ्याकडे भेटण्यास घेअून या. ” मीं गणूला हें कळवलें. तो आनंदित होअून मजबरोबर टिळकांकडे आला. त्यानें त्यांना साष्टांग नमस्कार घातला, आणि कृतापराधांची क्षमा करा म्हणून म्हटलें. टिळकांनीं त्याला आश्वासन देअून ठरल्याप्रमाणें वागणारना, म्हणून विचारलें. त्यानें होकार दिला, आणि आनंदानें तो घरीं गेला. ठरल्याप्रमाणें त्याने याहि प्रसंगी सरकारला चीत पाडलें, आणि सरकारचा टिळकांविरुद्ध रचलेला हाहि डाव मी हुकवला.

पण तो हुकला म्हणूनच चिरोलचा वकील कार्सन यानें टिळकांना “ तुम्ही राज्य-क्रांतिकारक म्हणून कोर्टानें शिक्षा दिलेल्या भटांना ( मला ) आपल्या नोकरींत ठेवलें आहेना ? ” हा प्रश्न विचारला ( केळकरकृत टिळकचरित्र, खंड ३, भाग ४ पहा ). आणि टिळकांनींहि त्याला बेडरपणानें होय, राजकारणांत शिक्षा झालेले लोक राष्ट्राचे प्रधानहि होतात, असें सणसणीत अुत्तर दिलें ! टिळकांच्या गोटांत माझ्याशिवाय ‘ कोर्टांत सिद्ध झालेला क्रांतिकारक ’ कोणीच नव्हता. म्हणून माझें नांव मुद्दाम घेअून टिळकांचा क्रांतिकारकांशीं संबंध होता, अितकेंच नव्हे तर तो त्यांनीं चिरोल-केसपर्य-

तहि चालू ठेवला आहे, हें ठरवण्याचा कार्सनचा मुद्दा होता. गणूला आम्ही फितवल्यावर तो संबंध सिद्ध करण्यास अेवढा अेकच पुराव्याचा आशातंतु चिरोलला होता. आणि त्याचा त्यानें अुपयोग करून घेतला. या अेका लहानशा मुद्यावरच टिळकांविरुद्ध निकाल दिला असे नव्हे. कारण गोरक्षण, हिंदु-मुसलमानांचे दंगे, वगैरे अनेक साधे मुद्दे त्यांत होते. पण सरकारचे टिळकांविरुद्ध प्रयत्न कोठवर चालत असत याचें हें अेक निदर्शक आहे.

## मुक्ततेनंतरहि छळ

शिक्षा भोगून सुटलेल्या आम्हां लोकांना सरकार कसें छळीत होतें याचें शिधयांच्या बाबतींत पुरे प्रत्यंतर आलें होते. शिधयांना आमच्या खटल्यांत ४ वर्षांची शिक्षा झाली होती. सुटून आल्यावर १८ विश्वे दारिद्र्यांत खितपतणाऱ्यांना कोठें तरी नोकरी करणें भागच होतें. त्यांनीं महत्प्रयासांनीं मुंबअीच्या स्मालकॉज कोर्टांत नोकरी मिळविली. सरकारला हें कळतांच त्यांनीं तेथल्या न्यायाधिशाला सांगून त्या बिचाऱ्याच्या मुलाबाळांच्या तोंडचा तेवढाहि घास काढून घेतला! पुढें शिधये थेट मद्रासपर्यंत नोकरीप्रीत्यर्थ गेले. पण तेथूनहि त्यांना पोलिसांनीं हुसकलें आणि त्यांची अन्नान्नगत करून सोडली. शेवटीं बिचाऱ्यानें भिक्षा मागून आपला चरितार्थ कसाबसा चालविला होता. अेक दिवस ते भटक्या भिक्षुकाप्रमाणें अकल्पित माझ्या घरीं येवल्यास आले, आणि अेक मंत्र म्हणून भिक्षां देही म्हणून म्हटले. त्यांना मी तत्काळ ओळखलें आणि सर्व हकीकत विचारली. त्यांनीं त्यांच्यामागें पोलीसांचा ससेमिरा कसा लागला होता हे सर्व सांगून, शेवटीं अक्षरशः त्यांना भिकेला कसें लावले, याची हृदयद्रावक हकीकत सांगितली. मी त्यांना स्वतः व हस्तेंपरहस्तें मदत मिळवून देअून त्यांची रवानगी केली ही गोष्ट निराळी. पण शिक्षा भोगून सुटल्यावरहि सरकारचा छळ कोठपर्यंत चाले याचें हें भडक अुदाहरण आहे.

## माझा विश्वविद्यालयांत छळ

क्रांतिकारकांना कोठेंहि शक्य तितकें छळावयाचें, त्यांचे संसार मोडावयाचे, हें धोरण सरकारी नोकरशाही अिमानानें चालवीत होती. अितकेंच नव्हे तर त्यांनीं पाळलेलीं कुत्रींहि आम्हांला कशी अडवीत याचीं २–३ अुदाहरणें सांगून हें छळपुराण आटपतें घेतों. तुरुंगांत जाण्यापूर्वी माझी

कायद्यापैकीं पहिली अेल्‌अेल्. बी.ची, व डॉक्टरीपैकीं दुसरी अेम्. बी. बी. अेस्.ची, अशा दोन शिक्षणक्रमांतल्या परीक्षा पास झाल्या होत्या. दोन्हीहि शाखांपैकीं शेवटच्याच परीक्षा राहिल्या होत्या. दुसऱ्या अेल्‌अेल्. बी.च्या टर्म्सहि भरून झाल्या होत्या. सुटल्यावर टिळकांच्या आश्रयानें संसाराची घडी थोडीफार बसल्यावर, या दोहोंपैकीं अेक, किंवा शक्यतर दोन्ही, पदव्यांच्या परीक्षा देअून कोणता तरी वकिलीचा किंवा डॉक्टरीचा धंदा चालवण्याची सोय करून ठेवावी, या अुद्देशानें मीं खटपट चालवली होती. वकिलीच्या धंद्याची अेल्‌अेल्. बी.ची परीक्षा घरीं अभ्यास करूनहि पास होणें शक्य होतें. पण त्याला बी. अे.ची पदवी तेव्हां अवश्य असे. आणि सरकारच्या लांगूलचालनी कुत्र्यांचें बहुमत असलेल्या मुंबअी विश्वविद्यालयाच्या तेव्हांच्या सेनेटनें सावरकर, मी व खरे या आम्हां तिघां क्रांतिकारकांच्या बी. अे.च्या पदव्या काढून घेतल्या होत्या. ती पदवी पुन्हा मिळवणें भाग होतें. म्हणून मी मुंबअी विश्वविद्यालयाकडे अर्ज केला होता. मुंबअी विश्वविद्यालयाचे लॉ-सिंडिक व अुपकुलगुरु, आणि आमच्या खटल्यांतले अेक न्यायाधीश, चंदावरकर यांना घरीं जाअून त्यासाठीं भेटलोंहि. पण पदवी देतांच येत नाहीं, असें या शहाण्याच्या कांद्यानें मला सांगितलें ! कारण काय तर म्हणें तशी कायद्यांत सोय नाही ! ही या सरकारी बगलबच्चांची आमच्याबद्दलची सहानुभूति ! पुढें सर चिमणलाल सेटलवाड अुपकुलगुरु झाल्यावर, त्यांनीं ज्या सेनेटच्या ठरावानें आमच्या पदव्या रद्द केल्या तो ठरावच रद्द करून आमच्या पदव्या परत पुनरुज्जीवित केल्या. या गोष्टीवरूनच चंदावरकरांची मनोवृत्ति आमच्याबद्दल कशी होती हें अुघडच झालें. तो ठराव रद्द करण्यांत डॉ. डगन व डॉ. सव्हेंअर या दोन पारशी गृहस्थांनीं निरपेक्ष मदत केली. या अुदारमनस्क पारशी गृहस्थांनीं, त्यावेळीं माझी व त्यांची ओळख नसतांहि, जी सहानुभूति दाखवली तिच्याशीं आमच्या चंदावरकरांचें वर्तन वाचकांनीं पाहावें; म्हणजे सरकारच्या छळाला हेहि 'मम' म्हणून कसे हात लावीत हें त्यांच्या ध्यानांत येअील. असो. अेल्‌अेल्. बी.ला यामुळें मला बसतां येअीना.

अेम्. बी. बी. अेस्.च्या परीक्षेसाठीं माझा २ वर्षांचा अभ्यासक्रमच पुरा व्हावयाचा होता. तेव्हां साऱ्या मुंबअी अिलाख्यांत ग्रांट मेडिकल हें अेकच मेडिकल कॉलेज. आणि तें सरकारचें. मग तेथल्या मुख्य अधिका-

त्यानें माझ्यासारख्या क्रांतिकारकाला शिष्य म्हणून पत्करणें म्हणजे मुसळाला अंकुर फुटण्याअितकेंच अशक्य होतें. कर्नल स्ट्रीट म्हणून अेक पक्क्या हाडाचा साम्राज्यवादी तेथला मुख्याध्यापक. त्यानें मला कॉलेजमध्यें घेण्याचेंच नाकारलें. आणि सरकारी छळवादाची पुरी प्रचीति १९२० पर्यंत, सुटून आल्यावर ५ वर्षांपर्यंत, आणून दिली. पुढें मॉंटफर्ड सुधारणानंतर बॅ. बॅप्टिस्टांच्या मदतीनें मी मेडिकल कॉलेजमध्यें जाअून डॉक्टरीची परीक्षा देअू शकलों.

अेवंच, तुरुंगांत आणि सुटून आल्यावरहि, सरकार आमचा छळ कसा करीत होते याची ही, नमुन्यासाठीं म्हणून. माझ्यापुरती थोडीशी माहिती दिली आहे. अितरांचीहि त्याची आवृत्तिच असणार. म्हणून पुनरुक्ति न करतां विस्तारभयास्तव ती येथेंच आंखडती घेतों. या छळांत माझे मित्र रा. सखाराम दादाजी गोऱ्हे हे मात्र क्षयी होअून आम्हांला टाकून यमसदनास गेले! आनंदाची व अभिमानाची गोष्ट अेवढीच की, या छळानें नामोहरम होअून सरकारास कोणीहि शरण जाअून माफी मागितली नाहीं. आमचें सत्त्व व स्वत्व आम्ही पूर्ण राखलें.

परिशिष्ट दुसरें

# खास कोर्टाचा खासा न्याय

ज्याक्सन-वधाच्या सबबीवर ५० जण पकडले, पण त्या वधाच्या खटल्यांत फक्त ७ च आरोपी कोर्टापुढें ठेवले – ( १ ) अनंत लक्ष्मण कान्हेरे, ( २ ) कृष्णाजी गोपाळ कर्वे, ( ३ ) विनायक नारायण देशपांडे, ( ४ ) शंकर रामचंद्र सोमण, ( ५ ) वामन नारायण जोशी, ( ६ ) गणेश बळवंत वैद्य, ( ७ ) दत्तात्रय पांडुरंग जोशी. यांपैकीं पहिल्या तिघांना फांशी, दुसऱ्या तिघांना जन्मठेप काळेपाणी, आणि जोशी यांना फक्त २ वर्षें, अशा शिक्षा खास कोर्टानें ठोठावल्या. बेसिल स्कॉट, हीटन व चंदावरकर या तीन हायकोर्टांतल्या न्यायाधिशांचें खास कोर्ट या वधाच्या, आमच्या, व सावकरांवरील आणखी अेका खटल्यासाठीं, १९०८ च्या कायद्याखाली 'झटपट' चौकशी करण्याकरितां, मुंबअी सरकारनें नेमलें होतें. या कोर्टानें वधाच्या खटल्यांत जो निकाल दिला तो आमच्या कटाच्या व सावरकरांवरच्या २ ऱ्या खटल्यांत दाखल झाला होता. खुनाच्या आणि आमच्यावरील सशस्त्र क्रांतीच्या खटल्यांतील निवाडेहि, माझ्या समजुतीप्रमाणें, कोणत्याहि कायद्याच्या

छापील मासिकांत या खास कोर्टानें प्रसिद्ध होअूं दिले नव्हते. मग पुराव्याचीं पुस्तकें प्रसिद्ध होणें अशक्यच होतें. पण मला या खटल्यांचे खास कोर्टापुढें दाखल केलेले कांहीं दस्तअैवज व अितर कागदपत्रें माझे मित्र रा. दत्तात्रय धोंडदेव पुराणीक, येथील मॉडर्न हायस्कुलांतले, व माजी टिळक विद्यालयाचे, शिक्षक, यांच्याकडून मिळाले. ते नाशकास असतांना, अेक दिवस म्युनिसिपालिटीच्या केराच्या कुंडीवर टाकलेलीं कांहीशीं ४ फाटकीं पुस्तकें त्यांना दिसली. अेवढीं मोठालीं पुस्तकें केरांत कशीं टाकली, आणि तीं आहेत तरी कशाचीं, म्हणून सहज पाहतां त्यांना कळून आलें कीं, तीं नाशिकच्या या दोन प्रसिद्ध खटल्यांतील पुराव्यांचीं आहेत. त्यांनीं तीं अुचलून आणून बांधून काढलीं, आणि जपून ठेवली. माझे मित्र रा. द. न. गोखले व शि. ल. करंदीकर, यांनीं "बाबा, आणि तात्या सावरकरांचीं चरित्रें" लिहितांना यांतील मजकुराची टिपणें करून नेलीं होती. पण, अिंग्रजी अंमल तेव्हां थोडा फार तरी होता म्हणून, त्यांनीं या पुराव्याचा जाहीर अुल्लेख केला नव्हता. मीहि या पुस्तकांचा या ग्रंथासाठी अुपयोग करून घेतला आहे. त्यांतहि बरींच पानें गहाळ झालीं आहेत. पण त्याला अिलाज नाहीं. रा. पुराणिक यांनीं हा पुरावा आस्थेवाअिकपणानें जो जतन करून घेतला त्याबद्दल त्यांचे आतां जाहीर आभार मानतों. खास कोर्टानें जेथें निवाडेहि प्रसिद्ध होअूं दिले नाहीत, तेथें पुरावा ते आमच्या हातीं कसा लागूं देणार? पण सत्याच्या खुनाला वाचा फुटते ती अशी. असो.

## खास न्यायाची खास पद्धति

या खास कोर्टानें ३ खटल्यांत जो खासा न्याय दिला, त्याच्या विलक्षण पद्धतींतल्या कांहीं ढोबळ चुका व गंमती येथें देतों.

ज्याक्सन-वधाच्या खटल्यांत पुराव्याची सर्व मदार आरोपींच्या कबुलीजबाबांवरच होती. खास कोर्टानेंहि हे स्पष्ट म्हटलें आहे. तें म्हणतें "It is from these statements 'mainly' that a knowledge of the facts, which preceded the murder, .is derived. If they are relevant, it is essential to take them into consideration, analyse and value them. It is argued that they are not relevant and they are not true." हे कबुलीजबाब काय-

देशीर लागू नाहीत आणि खरेहि नाहींत असें आरोपीच्या बॅरिस्टरांचें म्हणणें होतें. या कोर्टापुढे गणू वैद्य व दत्तात्रय पांडुरंग जोशी यांनी हे कबुलीजबाब मागें घेतले नाहींत, या गोष्टीचा कोर्टानें मोठ्या दिमाखानें अुल्लेख केला आहे. पण त्यांना, त्यानंतरच्या आमच्या खटल्यांत, राजसाक्षी – माफी देअून केलेले सरकारी साक्षीदार – करावयाचें होतें, हें कदाचित् त्या वेळीं या कोर्टाला माहीत नसेल; किंवा मुद्दाम ही गोष्ट कोर्टाच्या निदर्शनासः फिर्यादी पक्षानें – सरकारनें – आणली नसेल. पण वस्तुस्थिति तशी होती, हे पुढें सिद्धच झालें. आणि गणूची जन्मठेप काळया पाण्याची शिक्षा ३ वर्षें साध्या कैदेवर आणली, आणि दत्तु जोशी यास माफीचे साक्षीदार केलें, हाच पुरावा त्याबद्दल आहे. तेव्हां हे २ कबुलीजबाब सरकारनेंच, सरळ आणि अुघडच, Inducement (लालूच) दाखवून घेतले होते, आणि म्हणूनच ते सपशेल बेकायदेशीर व गैरलागू होते. बाकीच्या आरोपींनी ते बळजबरीनें घेतले होते म्हणून परत घेतलेच होते. आणि आमच्या राज्यक्रांतीच्या खटल्यांत पळशीकर-खोपकर या म्याजिस्ट्रेटांना, कबुलीजबाब घेण्याच्या पद्धतीबद्दल, याच कोर्टानें खरपूस चापले होतें, हें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां आरोपीच्या बॅरिस्टरांनी हे कबुलीजबाब जबरदस्तीनें, जुलमानें, किंवा लालूच दाखवून घेतले, आणि म्हणून त्याज्य, हा मुद्दा जो मांडला होता, तोच खरा होता. पण तरीहि या खास कोर्टानें ते ग्राह्य म्हणून दाखल करून घेतलेच !

### सरकारवर अुपकार

आरोपींतर्फे बॅरिस्टरांचा दुसरा मुद्दा असा होता कीं, "ज्या (१९०८ चा न्यू क्रिमिनल लॉ अॅमेंडमेंट अॅक्ट) कायद्याखालीं हा खटला चालला आहे त्याच्या ३ऱ्या कलमाप्रमाणें म्याजिस्ट्रेटला आरोपींच्या जबाबांवरून, त्यांचा स्वतःचा आरोप सिद्ध होअील असे, प्रश्न विचारण्याचा अधिकार नाहीं. आरोपीनें स्वखुषीनें दिलेला जबाब असेल तरच तो त्यानें दाखल करून घ्यावा." हें कलम ह्या कोर्टाला अितकें नडलें कीं, 'तें अव्याप्त आहे' (not an exhaustive enactment) अशी ह्या कोर्टाला मल्लिनाथी करावी लागली ! आणि याचा अर्थ करतांना या न्यायाधिशांनीं जे अकलेचे तारे तोडले आहेत ते पाहून हल्लींचा कोणताहि स्वतंत्र बुद्धीचा

न्यायाधीश हंसेलच. परवाच मुंबअी हायकोर्टानें, सरकारी वकिलाला, असल्याच अेका कायद्याच्या 'अव्याप्त किंवा अपुर्ते'पणाच्या मुद्यावर, सरळ सांगितलें कीं, "सरकारनें कायदा 'पुरता व्यापक' करून घ्यावा. आम्ही, सरकारवर अुपकार करून, तो पुरता व्यापक करण्यास बांधलेलों नाहीं"! पण आमच्या खास कोर्टाला सरकारला क्रांतिकारकांपासून वांचवावयाचें होतें म्हणून, कायद्यांतली अुणीव त्यानें 'अव्याप्तीच्या' मुद्यावर भरून काढली, आणि, सरकारवर अुपकार करून, आमचा कांटा सरकारच्या पायांतून काढला!

मागें सांगितल्याप्रमाणें आरोपींनीं बरीच माहिती खोटी सांगितली होती. आपल्या इतर देशबांधवांना वांचवण्यासाठीं त्यांना हें करावें लागलें होतें. त्यामुळें पोलिसांनी कोर्टापुढें जी माहिती सांगितली होती त्यावरून कोर्टानें ठरवलें कीं, हा "गुप्त कट १९०८ मध्यें अस्तित्वांत आला! तत्कालीन राजकीय वातावरणाचा तरुणांच्या मनावर परिणाम (Political influence) झाला होता. या गुप्त मंडळानें हत्यारें जमवलीं, स्फोटक पदार्थ (बाँबसाठीं) तयार केले, आणि राजकीय हेतूसाठीं ह्या खुनाचा बेत रचला" वगैरे वगैरे. मुख्य मुद्याच्याबद्दल सर्व निवाड्यांत अेवढींच वाक्यें आहेत. बाकीचें भारूड कायद्याची कसरत, व वेळीं पूर्तीहि, करून आरोपींवर गुन्हा सिद्ध कसा होतो हें दाखवण्यांत खर्च झालें आहे. त्यांतल्या २ गमती वर दिल्या आहेत. बाकीच्या आमच्या खटल्यांत ज्या घडल्या त्यांतील कांही देतों.

### सर्वांची अेकच मोट बांधली

वधाचा ७ जणांवरचा खटला चालू असतांच, पकडलेल्या अितर ४० आरोपींची चौकशी चालूच होती. त्यांपैकी रा. कोल्हटकर अटकेंतच वारले, चौघांना नुसत्या हत्यारांच्या कायद्याखालीं शिक्षा झाली. बाकी आम्ही ३५ जण अुरलों, आणि आम्हांला 'न्याय' देण्यासाठीं त्याच तीन न्यायाधिशांच्या खास 'न्याय'कोर्टांत आम्हांला पाठवून दिलें. ज्याक्सन-वधाबद्दल ७ देशभक्तांना दिलेल्या शिक्षा मागें सांगितल्याच आहेत. पुढें आमच्यानंतर पोलिसांनीं कोठूरचे देशभक्त बळवंत रामचंद्र बर्वे व अिगतपुरीचे काशीकर यांना बरेच दिवसांनीं पकडलें होतें. तरी त्यांनाहि आमच्यांतच, न्याय 'झटपट' मिळावा म्हणून, प्रविष्ट केलें होतें.

स्वातंत्र्यवीर सावरकरांनाहि, आमची चौकशी सुरूं झाल्यानंतर, हिंदुस्थानांत आणलें. पण त्यांनाहि आमच्याबरोबरच खास न्यायालयांत पाठवलें. निरनिराळ्या वेळीं जरी हे तिघे पकडले आणि त्यांची चौकशी पुकळ दिवसानंतर सुरू झाली, तरीहि आम्हां आतां ३८ जणांना न्यायाच्या सागरांत गटंगळ्या खाण्याकरितां अेकाच होडींत ढकललें. वास्तविक कांटेकोर न्यायनियमानुसार हें कायदेशीर म्हणतां येत नाहीं. पण तरीहि आम्हां ३८ जणांना अेका दावणींत गोवलें खरें. आमच्या बॅरिस्टरांनीं मागाहून आलेल्या आरोपितांच्या आरोपांनी सर्वांचेच आरोप पक्के होतात, आणि म्हणून ह्या आरोपींचे खटले अेकत्र चालवूं नयेत, या मुद्यावर खूप आक्षेप घेतले. पण न्यायाधिशांनी ते अुडवून लावले! सत्तेपुढें शहाणपण असें लंगडें ठरलें!

## शास्त्र व न्यायनीति गुंडाळली

न्यायनीतीला अनुसरून या न्यायमूर्तींनीं आमचा व सावरकरांचा नंतरचा २ रा खटला चालवणें योग्य नव्हतें. कारण ज्याक्सन-वधाचा खटला याच तिघांपुढें चालला होता. आणि त्यांत या आमच्यावरील कटाच्या आरोपाचा अुल्लेख येअून गेला होता. त्यामुळें या न्यायाधीशांचीं मनें आमच्याविरुद्ध कलुषित झालीं असणें अगदी स्वाभाविकच होतें. पण सरकारला कदाचित् अितर न्यायाधिशांबद्दल विश्वास नसल्यामुळें म्हणा, किंवा अन्य कारणानें म्हणा, हेच न्यायाधीश 'फिट्ट' वाटले. आणि याहि बहाद्दरांनीं, सर्व मानसशास्त्र व न्यायनीति गुंडाळून, आमचाहि खटला चालवण्याचें मान्य केलें! न्यायपद्धतीचा हा मुळांतच खून होता.

या अभियोगाचें काम ६९ दिवस चाललें. आमच्यापैकीं तिघांना – शंकर बळवंत वैद्य, विनायक सदाशिव बर्वे आणि विनायक काशिनाथ फुलंब्रीकर यांना – विशेष पुरावा दिसेना म्हणून, खटला सुरू झाल्या दिवसापासून ५ व्याच दिवशीं, न्यायाधीशांनीं सोडून दिलें. वास्तविक यांच्याविरुद्ध पुरेसा पुरावा नव्हता, ही गोष्ट, लाखों रुपयांच्या सरकारच्या चंदीवर चरणाऱ्या, सरकारी अॅडव्होकेट जनरल व वकील म्हणवणाऱ्या, शहाण्यांच्या कांद्यांना कळावयास हवी होती. पण न्यायाचा फार्सच करावयाचा होता. आणि अिंग्रज सरकारच्या न्यायालयांत न्याय मिळतो, हें दाखवण्यापुरताच,

त्यांच्याविरुद्ध फारसा पुरावा नव्हता तरी, यांना वर्षभर कच्च्या कैदेचा धक्का दिला होता, हें यांना खास कोर्टानें ताबडतोब सोडलें या गोष्टीवरून स्पष्टच होत आहे.

## न्यायमूर्ति का न्यायाची विभूति ?

सावरकरांनीं, त्यांची फिर्याद आंतरराष्ट्रीय न्यायालयांत प्रविष्ट केली होती म्हणून, या अभियोगांत कोणताहि भाग घेण्याचें नाकारलें होतें. तरीहि हे न्यायाधीश म्हणतातच कीं, बॅ. बप्टिस्टांनीं त्यांचें अप्रत्यक्षपणें समर्थन चालवलें होतें ! त्यांतहि विशेष विस्मयाची गोष्ट म्हणजे सावरकरांवर, आमच्या कटाच्या अभियोगानंतर, जो आणखी ‘ सरकारविरुद्ध युद्धास अुत्तेजन देण्याच्या ’ आरोपावरून १९११ त खटला भरला, तोहि याच तिघांपुढें चालला ! आणि आमच्या २ खटल्यांतल्या कारवायांनीं मनें कलुषित होणें संभवनीय असतांहि त्यांनीं तो चालवला ! त्यांतहि सावरकरांनीं भाग घेतला नव्हता. त्यावेळीं तर अेकतर्फी खटला चालू असतांहि या न्यायाच्या ‘विभूतींना’ हीहि सबब नव्हती. तरीहि त्यांनीं सावरकरांना दुसरी जन्मठेपेची शिक्षा सुनावलीच !

आमचा अभियोग खास ‘झटपट’ कायद्याप्रमाणें ( न्यू क्रिमिनल लॉ अॅमेंडमेंट अॅक्ट १९०८ ) चालला होता हें मागे सांगितलें आहेच. ही गोष्ट, व वरची न्यायाधिशांबद्दल सांगितलेली पूर्वग्रहदुष्टता ही, ध्यानांत घेतली म्हणजे आमच्यावरील सरकारी खटल्यांचे कोळसे हेच त्रिमूर्ति न्यायाधीश कसे पुनः पुन्हा अुगाळीत होते, हें वाचकांच्या ध्यानांत येअील. या न्यायाधीशांची न्यायनिष्ठा कितीहि सोंवळी असली तरी तीं माणसेच होती. आणि मानसशास्त्राच्या साध्या नियमानुसार त्यांची मनें निर्लेप राहणे शक्यच नव्हतें. पण सरकारच्या या बंद्या गुलामांनीं मानसशास्त्राची, आणि तन्निष्ठ न्यायनीतीची, पर्वा ठेवली नव्हती !

## पुराव्याच्या ग्राह्याग्राह्यतेच्या मौजा

या आमच्यावरील अभियोगाचें दैनंदिन काम कसें चालू होतें हें रा. करंदिकरांनीं सावरकरांच्या चरित्रांत वर्णन केलेंच आहे. म्हणून त्याबद्दल विशेष लिहीत नाहीं. न्यायालयांत आलेल्या खऱ्याखोट्या पुराव्यांतल्या मौजा, व खुद्द या त्रिमूर्तींनाच आढळून आलेलीं व्यंगें, हीं थोडीशीं दाखवून,

त्यांचा आजपर्यंत कोठेंहि न प्रसिद्ध होऊं दिलेला पूर्वग्रहदुष्ट निर्णय व तदनुसार आम्हांला दिलेल्या शिक्षा अेवढेंच मी येथें थोडक्यांत दर्शविणार आहें.

( १ ) आमच्याविरुद्ध पोलिसांकडून जो पुरावा मांडला गेला त्यापैकीं १ ला म्हणजे राजसाक्षींचा पुरावा. राजसाक्षी म्हणजे सरकारला फितूर होअून आमच्यावर अुलटलेले आमचेच सभासद. हे पांच होते. ( १ ) गणू वैद्य, ( २ ) दत्तात्रय पांडुरंग जोशी, ( ३ ) अंकुशकर, ( ४ ) वासुदेव रामचंद्र कुलकर्णी, आणि ( ५ ) चतुर्भुज अमीन. यांच्याबद्दल हे न्यायमूर्ति म्हणतात, " यांचा पुरावा ( substantially false ) " फारसा खोटा " दिसत नाही. त्यांनीं त्यांना माहीत असलेल्या सर्वच गोष्टी सांगितल्या नाहीत. ( वास्तविक या मुद्यावर त्यांची माफी रद्द करून त्यांच्यावर पुन्हा खटले करणें कायदेशीर होतें. पण न्यायाधिशांनी तसें सुचवलेंहि नाहीं ! ) अेकानें तर बरेंच लपवलेलें आहे. त्यांच्या पुराव्यांतली खरी अडचण म्हणजे त्यांनीं अितरांविरुद्ध फारसें खोटे सांगितलें, ही नसून त्यांनीं, स्वतःची कातडी बचावण्यासाठीं, बऱ्याचशा खऱ्या व पुऱ्या गोष्टी सांगितल्या नाहींत ही आहे. आणि यामुळें आम्हांला प्रत्येक आरोपीचा गुन्हा ठरवण्यास दुसरा पुरावा अवश्य आहे. "

खरें पाहिलें तर या खुद्द न्यायविभूतींच्याच शब्दांवरून हे राजसाक्षी, त्यांच्या स्वतःच्या गुन्ह्यापुरते तरी, अविश्वसनीयच ठरले. मग जे अेका बाबतींत विश्वासार्ह नाहींत त्यांचा पुरावा, आणि तोहि सुटण्याची लालूच दाखवून मिळवलेला पुरावा, आम्हां आरोपींविरुद्ध तरी कां विश्वसनीय मानावा ? त्यांच्या पुराव्याची साथ करणारा अितर पुरावा होता हें मानलें तर, तोहि पुष्कळसा, मागें व पुढें सांगितल्याप्रमाणे, आरोपींना किंवा साक्षीदारांना, जबरदस्तीनें मारून ठोकून, किंवा लालूच दाखवून, मिळवलेल्या कबुलिजबाबांचा. म्हणजे तोहि तितकाच अविश्वसनीय. याचा अर्थ अेका खोट्याला दुसऱ्या खोट्याचें पाठबळ. पण हेंहि या न्यायविभूतींना 'ग्राह्य' वाटलें ! आजच्या वरिष्ठ कोर्टात हें पचलें नसते असें वाटतें.

( २ ) पुराव्याचा दुसरा प्रकार म्हणजे अितर आमच्याचपैकीं बिनमाफीच्या ( unpardoned ) साक्षीदारांचा. याहि बाबतींत हेंच कोर्ट,

राजसाक्षिप्रमाणेंच, या साक्षीदारांबद्दल अविश्वास दाखवतें. तें म्हणतें कीं, " या साक्षीदारांपैकीं अेकाला तर प्रत्यक्ष पाहिलेल्या आणि अैकलेल्या गोष्टींमध्यें विवेकच करतां आला नाहीं ! या साक्षीदारांपैकीं कांहींनीं सर्वच ज्ञात असलेली माहिती सांगितली नाहीं. म्हणून या 'बिनमाफीच्या' (हा शब्द कोर्टाचाच आहे ) साक्षीदारांच्या पुराव्यांतहि, राजसाक्षींच्या पुराव्यांप्रमाणेंच, कच्चे पक्के दोष ( ( Infirmities ) आहेत. यांनीं व त्यांनीं कांहीं बाबतींत, तपशिलांत 'घोटाळा' केला असून ( Confused ), 'विपर्यासहि' (distorted) केला आहे. पण अितर पुरावा पुष्कळ असल्यानें आम्हांला 'सत्य' हुडकून काढतां आलें. "

या माफीच्या आणि बिनमाफीच्या साक्षीदारांबद्दल हेंच कोर्ट पुढें म्हणतें कीं, " **राजसाक्षी व अितर साक्षीदार हे प्रारंभीं आरोपीच होते. आणि म्हणून पुष्कळ दिवस 'पोलिसांच्या दडपणाखालीं' होते.** ( And were as much under the influence of the police. ) "

न्यायमूर्तींच्या या कबुलीजबाबांवरून याहि साक्षीदारांचा पुरावा बिनतोड खोटा किंवा अविश्वसनीय ठरतो. पुष्कळ दिवस पोलिसांच्या अटकेंत असलेले, पण पुढें साक्षीदार व्हा म्हणजे तुम्हांस सोडून देअूं अशी लालूच दाखवून, किंवा मारून मुटकून धाक दाखवून, साक्षीदार बनवलेले लोक पोलिसांच्या अिच्छेप्रमाणेंच सांगणार, हें अेखादें शेंबडें पोरहि सांगूं शकेल. या साक्षीदारांनींहि, स्वतःला बचावण्यासाठीं, खोटें सांगितलें हेंहि हें कोर्टच म्हणतें. त्यांनीं तपशिलांत "घोटाळा" केला व "विपर्यास" केला, हेंहि या कोर्टाचेच शब्द आहेत. तरीपण अितर पुराव्यावरून ( म्हणजे मागें सांगितलेले आरोपींचे कबुलीजबाब ) हा 'खोटा', 'घोटाळ्याचा', 'विपर्यस्त' पुरावाहि कोर्टानें ग्राह्य व विश्वसनीय धरला ! आणि आम्हांला 'न्याय' दिला !

( ३ ) पुराव्याचा तिसरा भाग म्हणजे झडत्या व त्यांत मिळालेला मुद्देमाल. हा पुरावा 'पुष्कळसा' substantially खरा आहे असें कोर्ट म्हणतें, पण लगेच लिहितें कीं, " यांतल्या साक्षीदारांच्या जबाबांत " तपशिलांत 'पुष्कळच' फरक आहे " ( many differences in detail appear ). पण या फरकांमुळें तो 'महत्त्वाच्या बाबतींत' खोटा आहे असें म्हणण्याला सबळ कारण नाहीं. " अेकदा कोणतीहि गोष्ट मनाशीं ठरली

असली म्हणजे मनुष्य तिला जुळतील त्याच गोष्टींवर विश्वास ठेवण्यास अुत्सुक असतो आणि बाकीच्या विरुद्ध गोष्टींकडे कानाडोळा करतो. कोर्टाचें तसेंच येथें झालें आहेसें दिसतें. कारण असें कीं, साक्षीदार या शब्दाचा अर्थच असा कीं, त्यानें त्या गोष्टी 'प्रत्यक्ष' पाहिलेल्या होत्या. मग तपशिलांत त्यांच्या पुराव्यांत 'पुष्कळसे' फरक कां यावे ? ते आले, हे कोर्टच म्हणतें आणि तरीहि हा पुरावा मान्य !

( ४ ) पोलिसांच्या पुराव्याबद्दलहि या कोर्टाचा अनुकूल ग्रह कां तर त्यांनीं 'शपथेवर' सांगितलें म्हणून. आमच्या पोलिसांना, निदान त्यावेळच्या अिंग्रज अमदानींतल्या पोलिसांना, खऱ्या-खोट्याची किती चाड असे, या-बद्दल त्यावेळच्या कैक हायकोर्टांनीं ताशेरे झाडलेले लॉ-रिपोर्टांत आढळतात. आणि अीश्वराची 'शपथ' घेअून सांगणारा अमरसिंगासारखा पोलीस-साक्षी-दार सपशेल खोटा असं या कोर्टानेंच ठरवलें होतें. तरीहि 'शपथेवर' सांग-णारे म्हणून अितर पोलीस-साक्षीदार खरेंच बोलले, असें हें कोर्ट म्हणालें ! आणि न्यायमूर्तींनीं त्यांच्या मतांचीं जीं कारणें दिलीं आहेत तीं अुभयपक्षींहि लागू पडतात, हेंहि या कोर्टाच्या ध्यानांत आलें नाहीं ! त्यांपैकी पहिलें कारण काय तर म्हणे ज्या 'तातडीनें' (rapidity) आरोपी व मुद्देमाल सांप-डला त्या त्वरेवरून असें दिसतें की, पोलिसांना माहिती "सहज मिळाली, त्यांनीं छळ केला म्हणून नव्हे " – Information was easily obtained, and was not the result of ill-treatment or coercion. " जणुं बेदम मारामुळे आरोपींकडून माहिती 'त्वरेनें' मिळणें अशक्यच आहे ? य अगडबंब ज्ञानाचे हे खंदक पुढे म्हणतात की, "आरोपी पुष्कळ होते, त्यांना अिकडून तिकडे नेत होते, ते पुष्कळसे अेकत्रच रहात होते, आणि म्हणून पोलीस तपास अुघडपणेंच चालत होता." या कारणांमुळें 'पोलि-सांनीं जुलूम केला किंवा धाक दाखवला' असें दिसत नाहीं ! जणुं कांहीं अनेक लोकांना अेकदम मारतां ठोकतां येत नाहीं ! गर्दी मोडण्यासाठीं पोलीस जमावावरच हल्ले करतात, ही साधी गोष्टहि या न्यायमूर्तींना माहीत नव्हती काय ? आणि न्यायमूर्तींचें हें म्हणणें जर खरें मानलें तर मग काय-द्याचा धाकच व्यर्थ ठरावयाचा. अुलट, बहुतेक लोक कायदा निमूटपणें पाळ-तात, ही गोष्टच पुष्कळांना अेकाच वेळीं धाकांत ठेवतां येतें, हें ठरवतें.

पण आमचें कोर्ट या साध्या गोष्टींवरून 'अुलट' अनुमानें काढीत होतें! कारण आम्हांला भरडावयाचें होतें ना ?

( ५ ) ज्याक्सन वधाच्या खटल्याप्रमाणेंच आरोपींचे कबुलिजबाब हा त्यानंतरचा मुख्य श्रेष्ठ पुरावा. त्याचें महत्त्व, याहि खटल्यांत, कोर्टाला अितकें वाटत होतें कीं, 'त्यांवाचून अितर पुराव्याला कांहीं किंमत नाहीं' ( without them ( confessions ) much of the testimony would be deficient in probative force for the purposes of the case. These statements therefore are of the *first* importance. ) असें हे कोर्टच म्हणतें. आणि आरोपींच्या वकिलांनीं हे जबाब खुषीनें दिले नसून :मारहाणीमुळें, आमिषामुळें, धाकामुळें, जबरदस्तीनें पोलिसांनीं घेतले, आणि म्हणून ते पुराव्यांत ग्राह्य मानूं नयेत असें परोपरीनें सांगितलें. ज्या म्याजिस्ट्रेटांनीं – पळशीकर व खोपकर – ते घेतले त्यांच्याबद्दल त्यांच्या अुलट-तपासणींत बऱ्याच काळ्याबेऱ्या गोष्टी कोर्टापुढेंच अुघडकीस आल्या. मागें त्याबद्दल लिहिलेलें वाचकांस आठवत असेलच. तरीहि हे त्रिमूर्ति म्हणतात कीं, "म्याजिस्ट्रेटांचें वर्तन संशयास्पद नव्हतें आणि म्हणून कबुलिजबाब पुराव्याच्या कायद्याप्रमाणें ( २४ कलम ) ग्राह्य आहेत; आणि पोलिसांच्या वर्तणुकीबद्दल आम्ही आमचें अनुकूल मत पूर्वीच दर्शविलें आहे!" आहे कीं नाही खासा न्याय ?

### सर्वच बनावट पुरावा

'बुडत्याला काडीचा :आधार' या म्हणीप्रमाणें "स्वातंत्र्यलक्ष्मी की जय" या पत्रावरील किंवा वह्यावरील शब्दांतहि या न्यायमूर्तींना आमच्या सशस्त्र क्रांतीचा हेतु दिसला! हास्यास्पदतेची ही शर्थ झाली!

पुरावा पुष्कळसा 'बनावट' होता. याचीं मुख्य कारणें दोन. अेकतर आम्ही सर्व सुशिक्षित आरोपी होतों; आणि म्हणून बऱ्याच गोष्टी आम्ही स्वतःच, मागें वर्णिल्याप्रमाणें, पोलिसांना 'बनवण्यासाठीं' विपर्यास करून सांगितल्या व पुष्कळशा छपवल्या. माफीच्या किंवा बिनमाफीच्या साक्षीदारांनीं, ते आमचेच असल्यानें, पुष्कळसें तेंच केलें. कारण आम्हांला शेंकडों लोकांना वांचवावयाचें होतें. शिवाय आमच्या गुप्त मंडळ्यांच्या नियमाप्रमाणें प्रत्येकाला सर्व गोष्टी माहीतच नसत. कोर्टहि म्हणतें कीं, "अभिनव भारताची गुप्तता

अितकी परिपूर्ण होती कीं, पोलिसांना संशय होता तरी, १९०९ मध्यें घडलेल्या ज्याक्सनवधापर्यंत पोलिस कांहींहि या संस्थेविरुद्ध करूं शकले नाहींत." बाबा सावरकरांच्या झडतींत जें १७७६ ते १८७६ पर्यंत 'युरोपांतल्या गुप्त मंडळयांच्या अितिहासाचें (फ्रॉस्टकृत) पुस्तक' सांपडलें होतें त्यांतहि "युरोपांतल्या क्रांतिकारक गुप्त संस्थांचे अलग अलग गट होते; आणि "त्या घटनेवरून आम्ही आमच्या गुप्त संस्थांचें जाळें बनवलें होतें", असें कोर्टानें लिहिलें आहे. सारांश, कोणत्याहि सभासदांस सर्व गटांची सर्वच माहिती असणें अशक्यच होतें आणि म्हणून अभिनव भारताची व अितर गटांची अित्थंभूत हकीकत सांगणे कोणालाहि शक्य नव्हतें. आमच्यापैकीं कांही हुतात्मे फांशी, किंवा अंदमानांत काळ्या पाण्यावर, गेले तरीहि त्यांनीं, त्यांना माहीत असलेली, सर्व हकीकत कधींच सांगितली नाही. जी सांगितली तीहि पुष्कळशीं 'बनावट' होती; आणि आधींच आम्ही मुद्दाम 'बनावट' केलेल्या पुराव्याला सबळ करण्यासाठीं पोलिसांनीं आणखी 'बनवलेला' पुरावा आणला. ते तरी बिचारे काय करणार ? कोठून तरी, कसा तरी पुरावा, त्यांच्या वरिष्ठांच्या हुकमाप्रमाणें, आमच्या विरुद्ध आणणें त्यांना भागच होतें आणि तो कसाबसा त्यांनी 'बनवला' आणि अेकमेकांशीं जुळता करून घेतला. आणि अशा 'दुबार बनावट' पुराव्यावर 'सत्याचा' शिक्का मारून, या खास कोर्टानें आम्हांला 'खासा न्याय' देअून शिक्षा ठोठावल्या. न्यायाचा फार्स सरकारला करावयाचा होता, आणि तेवढयासाठीं या खास कोर्टाच्या न्यायाचा देखावा त्याला करणें भाग होतें. आणि न्यायकोर्टानेंहि, वर सांगितल्याप्रमाणें "खोटा, घोटाळ्याचा, विपर्यस्त, व बनावट" पुरावा खरा धरून अिंग्रज सरकारवर, आम्हांला शिक्षा ठोठावून, अुपकार केले. 'न्याय' आणखी तो काय असतो ? असो.

## खरा पुरावा

अभिनव भारताची खरी माहिती मागेंच सांगितली असल्यानें, आणि विपर्यस्त संक्षिप्त व बनावट स्वरूपांत थोडीबहुत तीच कोर्टापुढें आली असल्यानें, त्याचें पुन्हा येथें वर्णन करीत नाही. आमच्याविरुद्ध खरा पुरावा म्हणजे अभिनव भारतानें सशस्त्र क्रांतीच्या पुरस्कारार्थ केलेलीं पदें, पोवाडे व प्रकाशनें यांचा, आणि तदनुरोधानें जमवलेल्या शस्त्रास्त्रांचा. प्रसिद्ध

केलेल्या वाङ्मयांत, विशेषतः गोविंद कवीच्या 'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळेना' या पदाचा, माझिनीच्या प्रस्तावनेचा, आणि Challenge, Oh Martyrs वगैरे विलायतेंत प्रसिद्ध करून हिंदुस्थानांत पाठवलेल्या पत्रकांचा, अुल्लेख कोर्टानें केला आहे. त्यांत अिंग्रज सरकाराविरुद्ध सशस्त्रक्रांतीच केली पाहिजे, अर्जविनंत्या शिष्टायासारख्या शांत सनदशीर मार्गानें ते स्वराज्य देणार नाहींत, असें स्पष्ट सांगितलें होतें. आणि शस्त्रास्त्रांचा अुपयोग व सांठा कशाकरितां असतो हें, या प्रचारकी वाङ्मयाच्या संदर्भानें, न सांगतांच कळण्यासारखें आहे. या दोन गोष्टी मुख्य धरून, व तदनुसार विलायतेंत हुतात्मा धिंग्रानें केलेला कर्झन वायली व लालकाका यांचे वध, आणि नाशिकास झालेला ज्याक्सनचा वध, या गोष्टीं-वरून, सशस्त्र क्रांतीचा आरोप अभिनव भारताच्या सदस्यावर सिद्ध होणें हें शक्यच होतें. कोर्टानें त्याच मुख्य आधारावर निर्णयाची भिस्त ठेवून अितर बनावट पुरावा त्याला जुळता करून घेण्याचा यत्न केला आहे. आम्ही अिंग्रज सरकाराविरुद्ध सशस्त्र क्रांतीचा प्रचार आणि प्रयत्न करीत होतों, आणि आम्हांला त्याबद्दलच अिंग्रज कोर्टानें शिक्षा दिल्या, हें अपेक्षे-प्रमाणें ठीकच झालें. क्रांतीचा प्रयत्न तेव्हां यशस्वी झाला असता, निदान आमच्या योजनेप्रमाणें देशभर क्रांतीचा डोंब अुसळला असता, आणि मग आम्हांला शिक्षा झाल्या असत्या, तर आम्हांला त्याचें वाअीट वाटलें नसतें. पण अिंग्रजांची सद्दी १९१० त संपली नव्हती म्हणून आमच्या प्रयत्नांचा अकालींच गर्भपात झाला; आणि अिंग्रजांना ३७ वर्षें, १९४७ पर्यंत, जीवदान मिळालें. पण १९४७ च्या विजयाला या आमच्या यत्नांनी थोडा-फार तरी हातभार आम्हीं लावला यांतच आम्हांला समाधान आहे. तसें पाहिलें तर १८५७ त १० मेला सुरू केलेला स्वातंत्र्य-प्राप्तीच्या युद्धाचा संकल्प १९४७ त पूर्ण झाला. त्या दरम्यानचे सर्वच प्रयत्न, आमच्याप्रमाणेंच, अपुरे पडले. पण त्याची सांगता आतां झाली आहे. त्यांतच कृतकार्यांचा आनंद आहे, शांति आहे.

मागें सांगितल्याप्रमाणें आम्ही २७ जणांनी, ज्यांच्या विरुद्ध पुरावा कमी होता त्यांना वांचविण्यासाठीं, आमच्यावर बऱ्याच गोष्टी ओढवून घेतल्या. म्हणून पूर्वी सांगितलेले ३ आणि खटल्याचे शेवटी ८ असे ११ जण

दोषमुक्त ठरवून न्यायकोर्टाने सोडून दिले. सुटलेल्या ८ जणांचीं नांवें :— ( १ ) विनायक काशिनाथ गायधनी, ( २ ) रामचंद्र बाबाजी काथे, ( ३ ) गोविंद सदाशिव बापट, ( ४ ) हरि अनंत थत्ते, ( ५ ) शंकर पांडुरंग महाजन, ( ६ ) मुकुंद पांडुरंग मोघे* ( पदटीप पहा ), ( ७ ) केशव गणेश परांजपे, आणि ( ८ ) त्र्यंबक विनायक जोग. बाकी आम्हां २७ जणांना जन्मठेपीपासून तों ६ महिने शिक्षेपर्यंतच्या शिक्षा झाल्याचें मागें सांगितलेंच आहे.

### न्यायाची घिसाडघाअी

अितर दृष्टीनेंहि या विशिष्ट न्यायासनाच्या निर्णयाला कोणतीच किंमत देतां येत नाहीं. त्यांतहि विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी व संशयास्पद गोष्ट म्हणजे या अेवढ्या ३५ आरोपींच्या विरुद्ध, ६९ दिवस चाललेल्या, खटल्याचा निर्णय, आमच्या बॅरिस्टरांचीं आमच्या बचावाचीं भाषणें संपल्यानंतर, २ दिवसांतच घिसाडघाअीनें देण्यांत आला! पुढें नाताळची सुटी होती म्हणून, अितकी तांतडी करून, हें कोर्ट आमची ब्याद वारून, मुक्त झालें. ७९ टाअिप केलेल्या पृष्ठांचा अेवढ्या मोठ्या खटल्याचा निर्णय अितक्या त्वरेने ज्या अर्थी देण्यांत आला त्या अर्थी या कोर्टानें आमच्या वकील-बॅरिस्टरांचें म्हणणें कितपत ध्यानांत घेअून त्यावर विचार केला असेल याची कल्पना व शंका वाचकांना सहजच येअील. मागें वर्णन केल्याप्रमाणे मानसशास्त्र कोळून प्यायलेल्या या न्यायमूर्तींच्या पूर्वग्रहदुष्टतेचा, ही निर्णय देण्यांतली घिसाडघाअी, हा अेक अुत्कृष्ट पुरावाच नाहीं काय? त्यांच्या निर्णयावर या झटपट कायद्यांमुळें अपील होअूं शकत नव्हतें, या गोष्टीचा तरी त्यांनीं विचार करावयास हवा होता!

### अस्सल अिंग्रजांचें स्वातंत्र्यप्रेम

या शंकास्पद घिसाडघाअीमुळें या तीन न्यायमूर्तींच्या निर्णयाला

---

* हे मोघे मागें वर्णिलेले तारमास्तर मोघे नव्हत. हे कर्व्यांच्या गटापैकीं बाँबस्चे शेल्स करणारे होते.

तारमास्तर मोघ्यांना दुर्दैवानें दुर्बुद्धि होअून लॅमिंग्टन रोड केसमध्यें ते राजसाक्षी झाले!

कें. न्यायमूर्ति शहा सारख्यांनी काय किंमत दिली होती, याचा अुल्लेख मागें आलाच आहे. या विलक्षण तांतडीमुळें म्हणा, किंवा सरकारचीच पुंगी वाजवावयाच्या स्वभावामुळें म्हणा, या निर्णयांत आमच्यासारख्या फांसावर चढण्यासहि तयार झालेल्या तरुणांच्या अुदात्त स्वराज्याकांक्षी मनोवृत्तीबद्दल, आमच्या ध्येयाच्या पावित्र्याबद्दल, अेक चकार शब्दहि नाहीं! अुलट, अलिपूर बाँब केसचा निर्णय देणाऱ्या बीचक्रॉफ्ट या अस्सल अिंग्रज न्यायाधिशाला, स्वातंत्र्याचें ध्येय दृष्टीपुढें ठेवून फांसावरहि जाण्यास हसत तयार असणाऱ्या तरुणांच्या सद्धेतूबद्दल, अनुकूल अुद्गार काढल्यावांचून राहवलें नाहीं. तो म्हणाला की, "स्वातंत्र्याचें ध्येय दृष्टीपुढें ठेवल्याबद्दल कोणताहि अस्सल अिंग्रज आक्षेप घेअू शकणार नाहीं!" बंगाली तरुणांनीं व आम्ही योजलेल्या साधनांबद्दल मतभेद असू शकेल. पण साध्याबद्दल तर तो असण्याचें कारण नाहीं. पण आमच्या अेका काळीं देशभक्त मानल्या गेलेल्या चंदावरकर न्यायमूर्तीला हेंहि निर्णयांत लिहिण्याचें धैर्य झालें नाहीं. स्वातंत्र्याबद्दलचें मुसमुसणारें प्रेम जें बीचक्रॉफ्ट अिंग्रज दाखवूं शकतो तें या त्रिमूर्तीपैकीं २ अिंग्रज न्यायाधिशांनी, व चंदावरकरांसारख्या हिंदी गृहस्थानेंहि, दाखवलें नाहीं! यावरून या न्यायाधिशांच्या मनोवृत्तींवर लख्ख प्रकाश पडतो. स्वातंत्र्याच्या ध्येयाबद्दलचें अुदात्त मनोधैर्य व्यक्त करणें हे तर राहूंच द्या, पण या निर्णयाच्या प्रसिद्धीनें, कदाकाळीं, पुढच्या हिंदी तरुणांना आमच्या देशभक्तीची कल्पना येअील, आणि ते आम्हांला कदाचित् धन्यवाद देतील, याची या न्यायाधिशांना भीति व काळजी वाटून, त्यांनीं हा निवाडा प्रसिद्धहि होअू दिला नाही! यावरूनच त्यांच्या मानसिक दौर्बल्याची आणि बौद्धिक अधःपाताची यथार्थ कल्पना येते. पण हे असे अधःपातकीच दुर्दैवानें आमच्या वांट्याला आले होते!

**परिशिष्ट तिसरें** लेखक : श्री. **नानासाहेब गोखले**

# कोल्हापूर बॉंब केस

## लो. टिळक व गंगाधरराव देशपांडे यांचे क्रांतिकारकांशीं संबंध

महाराष्ट्रांत छत्रपति श्रीशिवाजी महाराज यांचा अुत्सव सुरू करण्याची कल्पना कै. लोकमान्य टिळक यांनीं काढतांच तिचा पुरस्कार करून ती कोल्हापुरांत रूढ करण्यासाठी श्री. हणमंतराव कुलकर्णी मुरकीभावीकर यांनीं श्रीशिवाजी क्लब या नांवाची संस्था स्थापन केली, व कांहीं तरुण सहकाऱ्यांच्या साहाय्यानें कोल्हापुरांत पहिला श्रीशिवजयंत्युत्सव साजरा केला. या समारंभाचें अपूर्व यश पाहून कोल्हापुरांतील बऱ्याच तरुणांना स्फूर्ति मिळाली आणि ते शिवाजी क्लबचे सभासद झाले. राष्ट्रीय व अैतिहासिक पुढाऱ्यांचे अुत्सव वेळोवेळीं साजरे करणें, कथा-कीर्तन-प्रवचन-पुराणांच्या साहाय्यानें जनतेला राष्ट्रीय शिक्षण देणें, हे अुद्देश

संस्थेनें जाहीर केले असले तरी पारतंत्र्यांतून मुक्त होण्यासाठीं तरुणांच्या मनांत चेतना अुत्पन्न करण्याचें कार्य क्लबाच्या बैठकींतून सदैव चालू असें. या सर्व चळवळींचें कर्तेपण श्री. कुलकर्णी यांच्याकडे असून त्यांना श्री. झुंजारराव घाटगे, श्री. रं. वि. व का. वि. खानविलकर, अनंतराव लेले ( गुरुजी ) दामोदर जोशी, दामू सोनार, वामन आपटे, मणी करंदीकर वगैरे लोकांचें साहाय्य होतें. संस्थेला कांहींतरी दैनंदिन कार्यक्रम असावा, व त्यायोगें सभासदांत शिस्त संघटना निर्माण व्हावी, म्हणून संस्थेनें नित्यशः काठी, बोथाटी, दांडपट्टा व कवायत अित्यादींचें शिक्षण सुरू केलें. संस्थेच्या कार्याची प्रगति श्री. हणमंतराव कुलकर्णी वेळोवेळी पुण्यास लोकमान्यांना समक्ष कळवीत असत. वरचेवर जाण्या-येण्यामुळें श्री. कुलकर्णी यांच्या अंगची तडफ लोकमान्यांनी जाणली व त्यांचें बोलणेंचालणें होअून हणमंतरावांनी संस्थेचीं सूत्रें आपल्या सहकाऱ्यांच्या हातीं देअून कोल्हापूर सोडलें.

### सशस्त्र क्रांतीची पूर्वतयारी

छत्रपतींनीं स्वराज्यप्राप्तीसाठी जी प्राथमिक तयारी केली, तशी तयारी संस्थेच्या सभासदांनी करावी असा प्रचार सभासदांत सुरू झाला, व त्याचें पर्यवसान डाके घालण्यांत झालें. या प्रकरणी दामोदर जोशी, प्रसादे, वामन आपटे, मणी, करंदीकर वगैरे सभासदांना कारावास पत्करावा लागला. तरी पण संस्थेचें कार्य बंद पडले नाहीं. यांच्या जागीं नवे सभासद आले. त्यांनीं केवळ अुत्सवाचें ध्येय दृष्टीसमोर ठेवून छत्रपतींचा अुत्सव सुरू ठेवला. ही मंडळी चिकित्सक, सुविद्य, संयमी व कालमान ओळखून व कायद्याच्या मर्यादा जाणून, वागणारी असल्याने अुत्सव-समारंभांत विघ्नें अुत्पन्न झालीं नाहींत. मर्यादित स्वरूपाच्या साप्ताहिक सभांमधून राजकारणाचे पाठ देण्याची प्रथाहि त्यांनी तशीच नेटानें चालू ठेवली. त्यावेळीं श्री. दा. वि. गोखले, ( केसरीचे अुपसंपादक ), गंगाधर नेने, ( पुढे डॉ. आतां कै. ) गो. स. पळसुले, श्री. द. नागपूरकर, गोविंद गोखले वगैरे मंडळींच्या हातीं संस्थेचीं सूत्रें कांहीं काळ होतीं. सुमारें दहा वर्षेपर्यंत ही संस्था निरनिराळ्या लोकांनीं चालविली. मध्यंतरीं वंगभंगाची चळवळ आली व स्वदेशी-बहिष्काराची लाट अुसळली. लोकमान्यांच्या चतुःसूत्रींचा अुच्चार विद्यार्थीवर्गात होअू लागाल. तशांत ( आतां कै. ) श्री. स. खं. अळतेकर, दिगवडेकर

प्रभृति वकील मंडळींनीं कोल्हापुरांत लोकप्रतिनिधि-सभेची अुठावणी केली. ब्राह्मणब्राह्मणेतर वादाचें मूळ वेदोक्त प्रकरण अुद्भवलें. त्यानंतर लौकरच लोकमान्यांना शिक्षा झाली. या सर्व गोष्टींचे पडसाद तरुण तडफदार विद्यार्थ्यांच्या मनांत अुमटत होते.

बंगालमधील क्रांतिकारकांनीं मुझफरपूर येथें पहिला बॉंब अुडविला त्याचाहि परिणाम कोल्हापुरांतील क्रांतिकारक प्रवृत्तीवर झाला. शिवाजी-क्लबमधून बाहेर पडलेले श्री. दामोदर जोशी यांनी या प्रक्षुब्ध वातावरणाचा फायदा घेअून कांही विद्यार्थ्यांना आपलें मनोगत सांगितलें. दामोदर जोशी हे गृहस्थ साहसी, कारस्थानी व तडफदार वृत्तीचें, पण अबोल कार्यकर्ते होतें. लोकमान्यांनी नेपाळांत श्री. कुलकर्णी मुरकीभावीकर व कै. कृ. प्र. खाडिलकर यांच्यामार्फत जे अुद्योग सुरू केले होते त्यांत दामुअण्णा होते. ते बंगाल, बिहार, अुत्तर हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं हिंडून आले होते. बंगालच्या फाळणीची चळवळ जशी महाराष्ट्रांतील नेत्यांनी अुचलून धरली, तशीच तेथील 'अनुशीलन समिती'चें दहशतवादी धोरण महाराष्ट्रांतील तरुणांनी आत्मसात् करावें, त्यासाठीं घरादारांची, आप्तेष्टांची, प्रसंगी प्राणाचीहि, पर्वा न करतां देशासाठी बलिदान करावें, या अुद्देशाने कोल्हापूर व पुणें या ठिकाणीं संघटना निर्माण कराव्या म्हणून दामोदर जोशीने खूप खटपट केली व त्यांत त्यांना यशहि आले. या संघटनेंतूनच कोल्हापूरचा बॉंब-खटला निर्माण झाला.

### घटनेचें सुसंघटित कार्य

पुण्यास रा. गोविंद पांडुरंग बापट या नांवाचे आतिशय हुशार, धोरणी व दहशतवादी प्रवृत्तीचे अेक विद्यार्थी होते. त्यांनी महत्प्रयासाने बॉंब तयार करण्याची विद्या हस्तगत केली होती. दामोदर जोशींची व त्यांची योगायोगानें गांठ पडली; व मोठ्या प्रमाणावर बॉंबची निर्मिति करून त्यांचा प्रसार महाराष्ट्र कर्नाटकमध्यें करण्याचें ठरलें. कोल्हापुरासहि याची शाखा काढून तेथेहि हळूहळू बॉंबचा कारखाना अुघडण्याचे अुद्योग सुरू झाले. कोल्हापुराहून पुण्यास निरनिराळ्या शाळा-कॉलेजांत जे विद्यार्थी आले त्यांच्या अंतःकरणांत क्रांतीची ज्योत पेटवण्यांत श्री. नागपूरकर यांनी पुढाकार घेतला. लोकमान्य टिळकांना सरकाराने सहा वर्षें काळेपाण्याची शिक्षा दिल्यामुळें क्रांतिकारकांचा

नुसता जळफळाट सुरू होता. ही सारी मंडळी वेळोवेळीं निरनिराळ्या ठिकाणीं रात्री-बेरात्रीं अेकत्र येत व आवेशयुक्त भाषणें करीत व बेलभंडार अुचलून शपथा घेत असत. बंदुक व पिस्तूल कसें हाताळावें याचें शिक्षणहि त्यांना हळूहळू मिळूं लागलें. पुण्यांतील सुप्रसिद्ध कार्यकर्ते श्री. भाअूसाहेब गोखले, कै. वासूकाका जोशी प्रभृति मंडळी या संघटनेची आस्थेने चौकशी करीत. अेवढेंच नव्हे तर त्यांना अडल्या-पडल्या द्रव्यसाहाय्यहि देत असत. श्री. भाअूसाहेब गोखले हे तर असल्या प्रवृत्तीच्या लोकांचें मोठें आश्रयस्थान होतें. स्वतः झीज सोसून, पोलिसांच्या वक्रदृष्टीची पर्वा न करतां, भाअूसाहेब सर्वांना जेवूं-खावूं घालीत, व त्यांच्या प्रवासखर्चाची व्यवस्था करीत. लोकमान्यांना शिक्षा होण्यापूर्वी, होतीलाल वर्मा नांवाच्या अेका बड्या क्रांतिकारकाची ओळख त्यांनीं कोल्हापूर-संघटनेच्या सभासदांशीं करून दिली होती. पुण्यास चालू असलेल्या पिकेटिंगच्या कार्यात भाग घेण्यासाठी या संघटनेंतील विद्यार्थी त्यांच्याकडे गेले असतां त्यांनीं स्वच्छ बजावलें की, " याहिपेक्षां मोठीं कामें तुम्ही शिरावर घेतलीं आहांत. तिकडेच सर्व लक्ष केंद्रित करा. पिकेटिंग हें तात्पुरतें असून त्यासाठी भरपूर मंडळी मिळतील." हा प्रोत्साहनपर आशीर्वाद समजून श्री. बापट यांनीं बॉम्बनिर्मितीचें कार्य धडाक्यानें सुरू केलें.

### पुण्याचा बाँबचा कारखाना

पुण्यास शनवार पेठेंत, आपटे घाटावर, आपटे यांच्या वाड्यांतील मागील बाजूच्या तिसऱ्या मजल्यावर गंगाधर गोखले, विष्णु काटदरे, राजोपाध्ये वगैरे विद्यार्थी रहात होते. हे सर्वजण सायन्स कॉलेजमध्ये अिंजिनिअरिंग शिकणारे होते. यांची अेका बाजूची अेकान्तवासाची खोली बापटांनीं बाँबगोळ्याच्या निर्मितीसाठीं पसंत केली. त्याच पेठेंत राहणारे व न्यू स्कूलमध्ये शिक्षकाचें काम करीत असलेले, कोल्हापूरचे श्री. रामचंद्र बळवंत गद्रे, व शेतकी कॉलेजमध्ये शिकत असलेले श्री. नागपूरकर, हे बापटांना मधूनमधून साहाय्य करीत असत. याशिवाय गंगाधर गोखले यांचे स्नेही श्री. ग. रा. वाशीकर (मेडिकल स्कूल) हेहि रात्रीं-बेरात्रीं येअून मदत करीत. श्री. बापटांनी प्रयोग करावेत व श्री. गोखले यांनीं त्या प्रयोगाप्रमाणें नायट्रो-ग्लिसरिन, गन कॉटन वगैरे ज्वालाग्राही पदार्थ सावधानतेनें तयार करावे; नागपूरकर, गद्रे यांनीं बाँबची प्रस्फोटकता अज-

मावून पहावी; व शेवटीं श्री. बापट यांनी ( अिग्निशन ) ज्वलनशील वात तयार करून बॉंब सिद्ध करावे. हे सारे बॉंब नाशिकला मिळणाऱ्या पितळी फिरकीच्या तांब्यांत केले होते.

पुण्यास बॉंबची निर्मिति होत आहे, हें अैकून कोल्हापूरच्या कांहीं विद्यार्थ्यांनीं, तेथील प्रायव्हेट हायस्कूलमधील रसायनें व अुपकरणें चोरून, दामोदर जोशी याच्या स्वाधीन केलीं. पण दामोदर जोशी यांना तेवढ्या सामुग्रींत बॉंब तयार करतां आले नाहींत. म्हणून त्यांनीं पुण्याहून कोल्हापुरास बॉंब पाठविण्याविषयीं तातडीचे निरोप पाठविले. तेव्हां गंगाधर गोखलेनें अेका ट्रंकेंत आठ-दहा बॉंब्स घालून ती ट्रंक रातोरात पुण्याहून कोल्हापुरास नेली व ते बॉंब्स व अिग्निशन्स दामोदर जोशी यांच्याकडे दिले. कोल्हापुरास अेका समारंभानिमित्त पुष्कळ साहेब जमणार होते. त्यावेळीं त्या बॉंबचा अुपयोग करण्याचें दामोदर जोशीनें योजिलें होतें. पण, कां तें कोण जाणें, तो योग साधला नाही. दामोदर जोशी यांनीं परशुराम सुतार, पाडळकर, वडणगेकर, शेणोलीकर, अंबपकर, पाध्ये वगैरे मंडळीना क्रांतीची दीक्षा दिली होती. गंगाधर गोखले हा मधूनमधून कोल्हापुरास जाअून पुण्यांतील हालचालीची माहिती या मंडळींना देत असे. अेके दिवशीं पुण्यास आपटे यांच्या वाड्यांत, गोखले यांच्या खोलींत, संध्याकाळी ज्वालाग्राही पदार्थांची परीक्षा चालू असतां, अकस्मात् जंगी स्फोट झाला व त्या धडाक्यानें वळचणीचें छप्पर ढासळलें. सुदैव हें कीं, त्यामुळें कोणासहि अिजा झाली नाहीं. पण थोड्याच वेळांत तिथें पोलीस आले. पोलीस येणार हे अगाअू हेरून बापट व गोखले प्रभृतींनी दोनतीन भुअीनळे टाकोटाक आणून, त्यावर जाड रांजण ठेवून, ते पेटवले व रांजणाचे तुकडे अितस्ततः पसरून ठेवले. भुअिनळे अुडवण्याची गंमत करीत असतां, रांजण छपराला लागला व छपर पडलें, अशी बतावणी पोलीसांपुढें सर्वांनीं केली, व तें प्रकरण तिथेंच जिरलेसें वाटलें. पण तेव्हांपासून गुप्त पोलिसांचा पहारा या मंडळींच्या मागें सुरू झाला. पोलिसांनीं छडा लावून कोल्हापुरास दामू जोशी यांच्यावरहि पाळत ठेवली व अखेर कांहीं तरी निमित्त ठेवून, प्रथम दामू जोशी व नंतर त्यांचे सहकारी, यांना अटक करण्यांत आली. ही बातमी ताबडतोब पुण्यांतील मंडळींना कळविण्यांत आली. मुंबअीस श्री. दा. वि. गोखले यांनाहि ही

वार्ता कळतांच ते पुण्यास आले. बापट, गोखले, गद्रे, नागपूरकर यांच्याशीं खलबत करून बॉंब तयार करण्याचें सारें साहित्य नाहीसें केलें, व पोलिसांना कांहीहि मुद्देमाल मिळूं नये, अशी व्यवस्था करून ते लगेच मुंबअीस गेले. दुसऱ्याच दिवशीं गद्रे, गोखले व बापट यांना पुण्यास अटक झाली.

## कोल्हापुरास प्रयाण

त्याच रात्रीं फरासखान्यांत फौजदार रामा पांडू, कामटे, सदावर्ते, अळवणे वगैरे मंडळींनीं तीनहि आरोपींना खूप सतावले व मारहाण केली. दोन-तीन दिवसांनीं जबाबासाठीं मॅजिस्ट्रेट कारव्हालो यांच्यासमोर अुभें केलें. पण कांहीच निष्पन्न होअीना, म्हणून सर्वांना कोल्हापुरास पोलीस बंदोबस्तांत रवाना केलें. तेथें गांवाबाहेर कावळ्यांच्या बंगल्यांत दामू जोशी प्रभृतींना ठेवलें होतें. तिथेंच, पण पृथक्‌पणें, त्रिवर्गांना कोंडण्यांत आले. तेथेंहि पुनः 'पोलीस-तपास' सुरू झाला. 'समजुती'साठी अेकेकाला नेअून खूप समजूत देण्यांत आली. पण जेवढे पोलिसांनीं धरले त्या व्यतिरिक्त अितरांचीं नांवें सांगायचीं नाहींत हें सर्वांनीं ठरविलें असल्यानें फक्त दहा मंडळीशिवाय अितरांना कसलाच त्रास झाला नाहीं. या सर्व अुद्योगासाठी पुण्यास पैसा कुणीं पुरवला, कुणी अितर साहाय्य केलें, पुढारी मंडळीचा यांत किती हात होता वगैरेबाबत गोखले याला पोलिसांनीं फारच छेडलें. पण अितरांना यांत गोवावयाचें नाहीं, या निर्धारानें गोखलेनें कसलाच थांगपत्ता लागूं दिला नाहीं. कोल्हापूर-पोलिसांच्या मदतीला अिंग्रजी पोलीस आले. त्यांनींहि बरेच अुलटसुलट प्रश्न विचारले; पण सर्वांचीं अेक ठशाचीं अुत्तरें आल्यामुळें अखेर दहा जणांवरच खटले भरण्यांत आले. या कटाचे अेकंदर तीन भाग करण्यांत येअून तीन खटले कोर्टांत सुरू झाले. रीतसर साक्षीपुरावे होअून तीनहि खटले सेशन कमिट करण्यांत आले. हे खटले चालविण्यासाठीं कोल्हापूर-दरबारनें अिंग्रजींतील सेशनजज्ज सी. अे. किंकेड यांची नेमणूक केली. सरकारतर्फे बॅ. बिनिंग व पुण्याचे देशमुख वकील यांची निवड झाली. आरोपीतर्फें बॅ. बॅप्टिस्टा, काका पाटील अित्यादि वकील मंडळी आली. रासायनिक द्रव्यांची चोरी, अनधिकृतपणें ज्वालाग्राही पदार्थ व हत्यारें जवळ बाळगणें, व प्रस्फोटक बॉंब तयार करून ते ठिक ठिकाणीं पाठविणें, वगैरे आरोप या मंडळीवर ठेवण्यांत आले. गोविंद पाटोळे

नांवाचा, पाध्ये व शेणोलीकर यांचा अेक स्नेही, माफीचा साक्षीदार म्हणून पुढें आणण्यांत आला. शेवटीं सर्व खटल्याचा निकाल होअून श्री. बापट यांना सात वर्षें, गोखले याला सहा वर्षें व तीन महिने, शेणोलीकर अंबपकर यांना पांच वर्षें, पाध्ये व सुतार यांना नअू महिने, पाडळकर, वडणगेकर यांना अेक वर्ष, अशा सक्त मजुरीच्या शिक्षा देण्यांत आल्या. दामोदर जोशी व गद्रे यांना, भरपूर पुराव्याच्या अभावीं, मुक्त करण्यांत आलें. दामोदर जोशी व गद्रे यांना पुनः पकडण्यासाठीं पोलिसांची धांवाधांव सुरू झाली. तेवढ्यांत गद्रे निसटला, व दामू जोशी सांपडला. दुसरा गुन्हा शोधून त्याला पुनः अटक करण्यांत आली.

## टिळकांविरुद्ध छत्रपतींचें कारस्थान

या सर्व मंडळींनी कांहीं महिने कोल्हापूर सेंट्रल जेलमध्यें काढल्या-वर, बापट यांना साबरमती, गोखले यांना धुळें, शेणोलीकर व अंबपकर यांना येरवडा येथील तुरुंगांत पाठवण्यांत आलें. कोल्हापूर केसमध्यें अुल्लेखिलेल्या बॉंबसची निर्मिति पुण्यास झाली असतां, त्यांतील कांहीं विद्यार्थी कोल्हापूरचे होते, येवढ्यासाठीं, कै. छत्रपति शाहू महाराजांनी हा खटला कोल्हापुरास चालावा म्हणून अिंग्रज सरकारकडे खूप गळ घातली. बरेचसे सव्यापसव्य प्रयोग केले, आणि खटला कोल्हापुरांत चालविण्याची संमति मिळवली. पुण्याचे लो. टिळक, कर्नाटकचे गंगाधरराव देशपांडे प्रभृति मंडळींचें, व त्यांच्या जहाल पक्षाचें, पाठबळ या बॉंब प्रकरणीं होतें, ही गोष्ट महाराजांना सिद्ध करावयाची होती. ब्रिटिश सरकारचें राज्य अुलथून पाडण्याचा कट माझ्या प्रयत्नानें अुघडकीस आला, अशी फुशारकीहि मिरवावयाची होती. पण या कटातील लोकांनीं, पोलिसांच्या नजरेंतून जे निसटले त्यांचीं नांवें तशींच गुलदस्तांत ठेवण्याचें ठरविल्यामुळें महाराजांना भारीच रुख-रूख लागून राहिली. पुढारी मंडळींचीं नांवें आरोपींनीं घ्यावींत म्हणून त्यांना मारहाण तर झालीच, पण शेवटीं सुटकेचीं अभिवचनें खुद्द महाराजांनीं दिलीं; नोकरीचीं व बक्षिसांचींहि आमिषें दाखविलीं; पण त्यांचा कांहींहि अुपयोग न झाल्यामुळें पुनः दामू जोशीवर खटला भरून त्यांत अितरांना पकडावें हा डाव रचण्यांत आला.

## बॉम्ब कुठे गेले !

पुण्याहून जे बॉम्ब गोखले यांनीं कोल्हापुरास दामूकडे पोंचविले त्याचें काय झालें याचा तपास पुढें पोलिसांना लागला. त्यांपैकीं कांहीं बॉम्ब बेळगांवास श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्याकडे गेल्याचें समजल्यावरून त्यांनीं देशपांडे यांच्यावर पाळत ठेवली. श्री. हणमंतराव देशपांडे यांच्याकडे ते पोंचविल्याचें दामूकडून कळतांच श्री. हणमंतराव यांना पकडण्यांत आलें, पण प्रत्यक्ष बॉब हातीं आले नाहींत. परंतु ज्या पितळी तांब्यांत बॉब केले जात असत, तसला अेक तांब्या त्यांच्या घरीं सांपडला व तेवढ्यावरच त्यांच्यावर खटला भरण्यांत आला; पण लहा-नशा दंडावरच त्यांची सुटका झाली.

## गंगाधरराव मोकळेच राहिले !

ज्यांच्यासाठीं दामूला पुन्हां पकडलें ते गंगाधरराव याहि खटल्यांत गुंतले गेले नाहींत, म्हणून छत्रपतींनीं अेक नवीनच कारस्थान आरंभलें. कोल्हापूरचे श्री. गणपतराव मोडक हे मुंबअीच्या 'राष्ट्रमत' पत्रांत काम करीत असत. श्री. गंगाधररावांचा व मोडकांचा तिथें परिचय झाला होता. (तत्पूर्वींहि कोल्हापूरच्या पोलिटिकल अेजंटाला ठार मारण्यासाठीं दामूला मोडकांनीं प्रोत्साहन दिलें, ही गोष्ट गंगाधररावांना माहीत होती). कोल्हापूरच्या छत्रपतींनीं मुंबअीस मोडकांची भेट घेअून त्यांनी कोल्हापुरास यावें, त्यांच्या केसालाहि धक्का लागणार नाहीं, असें अभिवचन दिलें. त्यावर विसंबून मोडक कोल्हापूर स्टेशनवर अुतरताक्षणींच त्यांना अटक करण्यांत आली ! त्यांच्या नांवाचा अुपयोग करून, श्री. गंगाधररावांना जाळ्यांत ओढण्याचे प्रयत्न महाराज व त्यांचे हस्तक फर्नांडिस यांनीं सुरू केले. कोल्हापूरचे अेक रहिवासी व संस्थानी नोकर श्री. शालिग्राम यांच्याजवळ बॉबची कृति छाप-लेलें अेक पुस्तक महाराजांनीं दिलें. तें पुस्तक मोडकांनीं पाठविलें अशी बतावणी करण्यास सांगून, शालिग्राम यांना बेळगांवास श्री. गंगाधरराव यांच्याकडे धाडण्यांत आलें. श्री. गंगाधरराव यांना गोत्यांत आणण्याचे असले कांहीं यत्न सुरू झाले आहेत, ही कुणकुण कोल्हापुरास, फौजदारीच्या हुद्द्यावर असलेल्या, श्री. म्हैसकर यांना लागली. त्यांनीं गोडबोले नांवाच्या माणसाहातीं निरोप पाठवून गंगाधररावांना

सावध केलें. ठरल्याप्रमाणें शाळिग्राम पुस्तकासह गंगाधररावांच्याकडे आले, व, मोडकांच्या नांवाचा अुपयोग करून, पुस्तक सुरक्षित जागीं ठेवण्यास सांगितलें. "अुद्यां या, मी योग्य जागा शोधून ठेवतों" असें सांगून गंगाधररावांनीं त्याला वाटेला लावलें, व घडलेली हकीकत तेथील कलेक्टर ब्रँडन यांना कळविली. गंगाधररावांच्या सांगण्याची शहानिशा करण्यासाठीं, कलेक्टरसाहेबांनीं शाळिग्राम यांना अटक करतांच त्यांनीं सत्य हकीकत सांगितली, व पुस्तक परत पोस्टानें महाराजांकडे पाठविण्याचें कबूल केलें. कलेक्टरनीं कोल्हापूर पोस्ट मास्तरला कळवून, पुस्तकांचें पार्सल तसेंच ठेवण्यास सांगून, दुसऱ्या दिवशीं तें पुस्तक मिळविलें, व घडलेली हकीकत मुंबअी सरकारला कळवली. खुद्द छत्रपतीच याच्या मुळाशीं असल्यानें सरकारनें तें प्रकरण धसास लावलें नाहीं.

## पुनः गंडांतर

याहि सांपळयांतून गंगाधरराव निसटले, हें पाहून छत्रपतींनीं, फेरिसचा खून करण्याच्या कटांत, गंगाधररावांना ओढण्यासाठीं खूपच शिकस्तः केली. श्री. गाडगीळ या नांवाच्या अेका बेळगांवच्या लुडबुड्या माणसाशीं संधान बांधून, गंगाधररावांना पुनः पकडण्याचा यत्न झाला. परंतु गंगाधररावांनीं गाडगिळांच्याच घरीं आपला हेर पाठवून त्याचा सर्व गुप्त पत्रव्यवहार पळवून आणला, व तोहि कलेक्टरपुढें ठेवला. यानंतर बडे पोलिस अंमलदार गायडर गंगाधररावांना भेटले व त्यांनी त्यांना सुरक्षिततेची हमी देअून निर्भय केलें. गंगाधररावांनीं छत्रपतींच्या डावावर डाव करण्यांत यश मिळविलें, त्याचें पुष्कळसें श्रेय त्यांचे स्नेही व शिष्य कै. गोविंदराव याळगी यांनाच आहे. श्री. याळगी हेहि स्वभावतःच क्रांतिकारक होते व त्यांचा कोल्हापूरच्या क्रांतिकारकांना आधार होता. पोलिटिकल अेजंट कर्नल फेरिस यांना मारण्यासाठीं दामूनें जें पिस्तूल वापरलें तें बेळगांवांतून नेलें होतें.

## कर्नल फेरिस वांचले

कोल्हापूरचे पोलिटिकल अेजंट कोणत्या गाडीनें पुण्यास जाणार याची माहिती मिळवून दामू जोशी त्या गाडीनें पुण्यास गेला. आळंदी ते घोरपडी या दोन स्टेशनांच्या दरम्यान, दिवस मावळून अंधार झाल्यावर, पिस्तुल

झाडायचें असें ठरलें होतें. पण फेरिस साहेबांच्या सुदैवानें अैनवेळीं पिस्तूल अुडालें नाहीं. या सर्व प्रकरणांच्या चौकशीसाठीं खुद्द स्कॉटलंड यार्डचे हुशार अधिकारी वॉलिंजर यांनीं कोल्हापुरास तळ दिला; परंतु छत्रपतींना हवे असलेले पुढारी व चळवळे यांना या कटांत गोवणें अशक्य झालें. अुलट गायडर व वॉलिंजर यांनीं छत्रपतींनाच दोष दिला, असें अैकिवांत आहे.

दामू जोशी व त्याचे १–२ सहकारी यांना ज्या ठिकाणीं अटकेंत ठेवलें होतें, त्याच्या नजिकच कोल्हापूर जनतेकडून काढून घेतलेलीं पिस्तुलें व बंदुका होत्या. त्या मिळविण्यासाठीं दामूनें त्या अिमारतीला आग लावून दिली व त्याच आरोपावरून त्याला शिक्षा ठोठावण्यांत आली. नंतर कारा-गृहांतून दामू शिताफीनें निसटला. वऱ्हाडांत त्यानें मोटारींचा व्यापार सुरू केला; व शेवटीं ७–८ वर्षांनंतर तो पुनः पकडला वगैरे वृत्तान्त बराच रोम-हर्षक असला तरी, त्याचा कोल्हापूर-कटाशीं कांहींहि संबंध नसल्यानें, तो येथें लिहिणें अप्रस्तुत होअील.

## कोल्हापूर-कटाचे धागेदोरे

कोल्हापूर-कटांत थोडीच मंडळी सामील असली तरी त्यांचे संबंध वऱ्हाडपासून बेळगांवपर्यंत होते. गंगाधरराव, वासूकाका जोशी, बाबूराव गोखले वगैरे मोठी मंडळी जरी प्रत्यक्ष कटांत वावरत नव्हती तरी अडचणीच्या वेळीं त्यांचा सल्ला व साहाय्य घेण्यांत येत होतें. पोलिसांच्या मारहाणीला भिअून, किंवा आमिषांना लालचावून, कोणीहि अवाक्षर काढायचें नाहीं, अशा शपथा कटवाल्यांनीं घेतल्या असल्यानें, या खटल्यांत दहापेक्षां अधिकांना गोवणें पोलिसांना अशक्य झाले. येवढेंच नव्हे तर माहिती मिळून सुद्धां पुरावा अुपलब्ध न झाल्यानें पुष्कळ मंडळी तशीच सहीसलामत राहिली. श्री. गद्रे हे त्या वेळीं जे निसटले ते अद्याप सांपडले नाहींत; तरीपण त्यांचा योगक्षेम ठीक चालला आहे. लो. टिळक मंडालेहून परत आल्यावर त्यांना जेव्हां ही हकीकत समजली त्यावेळीं त्यांनीं सुटून आलेल्या तरुणांची पाठ थोपटली. त्यांच्या प्रोत्साहनपर आशीर्वादावरच आज हयात असलेली मंडळी समाधानांत आहेत, व अद्यापहि ती टिळक-तत्त्वांशीं अेकनिष्ठ राहिली आहेत.

